


श्रीरामचरित मानस

# मानस-मोती



लेखिका - प्रज्ञाशिष्या रामदासी

सौ. रेखा नी. पटवर्धन M. A.




## श्रीराम चरित मानस

# मानस-मोती




* लेखिका *

सौ. रेखा पटवर्धन

(प्रज्ञाशिष्या रामदासी) एम.ए.


मूल्य : रू. १२५/-

# श्रीराम चरित मानस

# * मानस-मोती *

**लेखिका :** सौ. रेखा नीळकंठ पटवर्धन, मिरज



**मुद्रक :**
ज. प्र. महाबळ
गजानन मुद्रणालय,
मिरज - 416 410

**प्रकाशन तिथि :**
गुरूपौर्णिमा
दिनांक : ३ जुलै २०१२

**प्रकाशक : श्री रामचरितमानसप्रेमी मंडळ. शाखा-मिरज**
सौ. रेखा नीळकंठ पटवर्धन, C/o
अक्षय रेस्टॉरंट समोर,
रेल्वे स्टेशन जवळ
मिरज 416 410
फोन : (0233) 2221083,
मोबा. : 9423036119

श्रीरामचरित मानस

# मानस-मोती

## ※ अनुक्रमणिका ※



या ग्रंथाचे मुखपृष्ठावर परांडा-राम-मंदिरातील मूर्ती आहेत.





पब्लिक ट्रस्ट नं. ए - ५३१९





# श्री स्वामी जगद्गुरु शंकराचार्य पीठ करवीर

२२१९, 'डी' वार्ड, शुक्रवार पेठ, कोल्हापूर - ४१६ ००२. ✆ ०२३१ - २५४१४५४.
E-mail : peethkarvir@gmail.com

'नंदन' १९३४
ज्येष्ठ शु. ९ बुधवार
३० मे. २०१२



श्री रामचरित मानस प्रेमी मंडळ

पीठस्थ देवतेंचे उत्तम आशीर्वाद व आमचे.

नारायण-स्मरण.

'श्रीराम चरित मानस मोती' पाहिला. फारच छान आहे. श्री संत गोस्वामी तुलसीदास यांचा 'श्रीरामचरित मानस' हा हिंदी तर त्याचा समछंद मराठी अनुवाद श्री. प.प. प्रज्ञानंद सरस्वती स्वामी यांचा.

श्री रामावतार हा मर्यादा पुरुषोत्तमाचा गणला जातो. मर्यादा पुरुषोत्तम रामाने सर्व - माता पिता बंधु प्रजाजन इतकेच नव्हे तर आपल्या कुलपुरुषाच्या बाबतीतही सर्व मर्यादा पाळल्या. तसेच प.प. प्रज्ञानंद सरस्वती स्वामींनी आपल्या आयुष्यात वर्णाश्रमाच्या धर्माच्या मर्यादा पाळल्या. त्यांचे अनुयायी म्हणणाऱ्या आपणही जर धर्ममर्यादा पाळल्या तर आपणासही ते अनुभवित असणाऱ्या आत्यंतिक सुखाची गोडी चाखता येईल.

सर्वांना सर्व संत परंपरेच्या व धर्माचा संदेश सांगायचा झाला तर 'धर्म एव हतो हन्ति। धर्मो रक्षति रक्षितः॥

पुनश्च एकदा पीठस्थ देवतेंचे अनेक आशीर्वाद व आमचे नारायण-स्मरण सर्वांस विदित व्हावे.

महानुशासनम् वरीवर्ति.
श्री. जगद्गुरु शंकराचार्य,
करवीर पीठ, कोल्हापूर

· *Swami Tejomayananda*

चेन्नई
ॐ ७ फेब्रुवारी २०१२

शुभचिन्तन

ब्रह्मलीन परम पूज्य स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी श्रीरामचरितमानसाचा समवृत्त समच्छंद केलेला मराठी अनुवाद प्रसिद्ध आहे. तो संस्कृतप्रचुर असल्याने नवीन पिढीला त्यातील अर्थग्रहण करणे अवघड होत आहे. हे लक्षात घेऊन सौ. रेखाताई पटवर्धन यांनी त्याचा सरल मराठीत अर्थ देण्याचा जो प्रयत्न केला आहे तो प्रशंसनीय आहे. ह्या कार्यासाठी त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन ! ह्या ग्रंथाने सर्व भाविक वाचकांस लाभ होईल यात शंका नाही.

प्रभु श्रीरामचन्द्रांची व सद्गुरूंची कृपा सर्वांवर सदैव राहो.

सप्रेम,

तेजोमयानंद

**डॉ. श्रीमती कमल बा. वैद्य**
एम. ए. पीएच्. डी.
'होली माऊंट,' ३५, विजयनगर,
श्री शिल्पचिंतामणी को–ऑप. हौसिंग सोसायटी,
पोस्ट – वानलेसवाडी (सांगली). पिन – ४१६ ४१४.
दूरध्वनी : (०२३३) २६०१२११

**॥ राम ॥**

रजि. नं. ए/२१३२/उस्मानाबाद
**श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ**
मु. पो. परंडा – ४१३ ५०२. जि. उस्मानाबाद.
संपर्कासाठी पत्ता : सौ. राजश्री भा. दिवाकर
'मल्हार' बंगला, समर्थनगर,
मु. पो. उस्मानाबाद – ४१३ ५०१
दूरध्वनी (०२४७२) २२४१८१

॥ श्रीसद्गुरुप्रसन्न ॥

॥ राम ॥ दिनांक ९/६/२०१२

श्रीसद्गुरु प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी 'श्रीरामचरितमानस' या गोस्वामी तुलसीदासकृत ग्रंथाचा समवृत्त-समच्छंद केलेला मूळ ग्रंथाप्रमाणेच आत्यंतिक प्रासादिक झाला आहे. पण तरी तो संस्कृतप्रचुर असल्याने बरेच वेळा असे आढळून येते की वाचकांना त्याचा अर्थ समजण्यास अडचण पडते. सौ. शामला दिवाकर आणि सौ. रेखा पटवर्धन या माझ्या गुरुभगिनींनी मराठी ग्रंथाची १११ सामुदायिक पारायणे करण्याचा संकल्प केल्याने महाराष्ट्रातच नव्हे तर महाराष्ट्राबाहेरही मराठी भाविकात या ग्रंथाचा उत्तम प्रचार व प्रसार होत असून तो लोकप्रिय होत असे. याचा सरळ सोप्या भाषेत गद्य अनुवाद प्राप्त झाला तर तो नवीन पिढीलाही समजण्यास मदत होईल असे जाणवल्याने प्रिय सौ. रेखाने परिश्रमपूर्वक तो गद्य अनुवाद लिहून काढला आहे. तो प. पू. स्वामी प्रज्ञानानंद यांच्या 'मानस गूढार्थ चंद्रिकेवर' आधारीत असल्याने तो यथार्थ झाला आहे. शिवाय सौ. रेखाचा या ग्रंथाचा व्यासंगही लक्षणीय व कौतुकास्पद आहे. ही तिची सेवा श्रीगुरुचरणी रुजू होऊन त्यांच्या कृपेने हा ग्रंथही लोकप्रिय होऊन वाचकांना अर्थ समजण्यास सहाय्यकारी ठरेल हे निश्चित! श्रीसद्गुरूंची व या ग्रंथाची कृपा सर्वांस लाभो हीच ईशचरणी विनम्र प्रार्थना!

डॉ. कमल बा. वैद्य (कमलताई)

## ❋ लेखिकेचे मनोगत ❋

॥श्री सद्गुरवे नमः॥

॥श्रीराम समर्थ॥

**मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्य देवो भव।**
**अतिथि देवो भव। राष्ट्र देवो भव।**

या भारतीय हिंदु सुसंस्कृत परंपरेनुसार माता-पित्यांनी जे मजवर सुसंस्कार केले त्याचा परिपाक म्हणजे हे 'मोती-मानस' होय. माता-पित्यांचे 'विष्णुः विष्णुर्वषट्कारो'- हे ऐकतच जाग यायची. माझा जन्म हा प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी या सद्गुरूंचा कृपा-प्रसादच आहे, असा माझा दृढ विश्वास आहे. अर्थात् त्यामुळेच बालपणीं, अजाणतेपणातच, या सद्गुरूंचा प्रभाव जो या हृदयावर सखोल रूजला तो कायमचाच. लहानपणी कै. पू. ना. भा. जोशींच्या श्रीरामचरितमानस पारायण – प्रवचनाचे बीज सखोल रूजले. अन् त्या बीजाचा हळूहळू 'सुतरू' बनविण्याचे उत्तम कार्य सद्गुरू स्वरूप- पू. कमाताईंनी केले आहे. पू. अदिनाथकाकांची सद्गुरू सेवा, पू. कमाताईंची सर्वस्व समर्पण व प्रत्येक सत्कार्यात पूर्णपणे झोकून देण्याची वृत्ती, पू. कै. भाऊ (श्रीरामजी गिल्डा) यांचे सुंदर सदुपदेश, पू. तात्यां (डॉ. वि.ना.जोशी) चे नामप्रेम, पू.कमलताई निलंगेकर, पू. मालूताई इत्यादी सर्व गुरू-बंधू भगिनींची अढळ श्रध्दा व 'व्रतस्थ वृत्ती' अन् पू. गुरूजींचा गूढार्थाचा व्यासंग अन् पू. श्यामाताईचे पारायण- प्रेम या सर्वांचा शुभ परिणाम आणि शुभाशीर्वाद म्हणजे हा छोटासा ग्रंथ आहे.

अन् सर्वात महत्त्वाचे माझे पतिराज. त्यांच्या मौनी अध्यात्मनिष्ठेच्या बळावर माझी ही भक्तीची इमारत उभी आहे याची मला पुरेपूर जाणीव आहे.

प.पू. तेजोमयानंदजी, प.पू. किशोरजी व्यास, प.पू. मुरारीबापू, प.पू. करवीर पीठस्थ जगद्‌गरू शंकराचार्य ब्रम्हलीन विद्याशंकर भारती व विद्यमान विद्या नृसिंह भारती स्वामी सारख्या अगणित संत-महंताचे शुभाशीर्वाद अन् आजवर केलेल्या अनेक पावन तीर्थस्थळांच्या अति पावन स्पंदनांचे फल, तसेच अनेकांच्या सत्संगाचा परिणामाचे फल म्हणजे ही निर्मिती आहे.

ह्या बाल सृजनाला आपण सारे उदार वाचक श्रोते बालकाचे बोबडे बोल समजून आपलेसे करालं हा विश्वास आहे. जे उत्तम ती श्रीगुरू व राम कृपा ! अन् जे चुकले–माकले गौण ते या हीन–दीन प्रज्ञाशिष्या रामदासीचे समजून पदरात घ्या.

श्री सीतारामचंद्रार्पणमस्तु।

श्री गुरूचरणारविंद परागरजार्पणमस्तु.।

* * *

विशेष सूचना -

1. **manaspremimandal.com**
2. **satangdhara.net**

या वेबसाईट आवर्जुन पहा व ऐकून अभिप्राय कळवा.

महाराष्ट्राचे तुलसीदास रामकृपांकित संन्यासी
परमहंस परिव्राजकाचार्य

# प्रज्ञानानंद सरस्वती

— सौ. रेखा पटवर्धन एम. ए
(प्रज्ञाशिष्या रामदासी)

प. पू. परमहंस परिव्राजकाचार्य प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी हे पूर्वाश्रमीचे श्री. दत्तात्रय नारायण कर्वे. यांचा जन्म कोकणात दि. १५ मे १८९३ (वैशाख अमावस्या) रोजी झाला. वडील कीर्तनकार असल्याने घरी धार्मिक वातावरण होते.

चि. दत्तू (वडिलांचे लाडके नांव) - (यांचा उल्लेख इथून पुढे आपण श्री किवा स्वामी असा करूया) वडिलांसमवेत दत्ताची गोड पदे म्हणत. स्वातंत्र्यपूर्व काळ असल्याने श्रींवर लोकमान्य टिळकांचा प्रभाव होता.

शालेय जीवनात त्यांनी विलायती साखर न खाण्याचा दृढ निश्चय केला होता पण घरच्या कोणालाही तो माहीत नसल्याने पाहुण्यांबरोबर गोड खाणे झाल्याच्या पाप - परिमार्जनार्थ श्रींनी 'सोमल' हा विषारी पदार्थ सेवन केला होता. फलस्वरूप तीन दिवस १०५° डिग्री तापाने बेशुध्द होते. पण रामकृपेने वाचले. मुरूड - जंजिरा येथे मॅट्रिक पर्यंतचे श्रींचे शिक्षण झाले. पुढे मामा बडोद्यास असलेने बी. ए. (B. A) संस्कृतचे शिक्षण तेथेच पूर्ण झाले. त्यावेळी स्त्री - मोहाच्या प्रसंगावर ऐन तारूण्यात अतिशय चातुर्याने मात केली. तर देवदर्शनास मंदिरात एका अत्यंत रूपवान स्त्रीकडे नजर जाताच स्वतःच्या डोळ्यांना तिचा ध्यास लागल्यास फोडून घेण्याची आज्ञा देताच तोही मोह रामकृपेने व दृढ निश्चयाने टळला. समर्थ रामदास स्वामींचा प्रभाव व्यक्तीमत्वावर पुरेपुर असल्याने 'ईश्वरदास रामदासी' या नावाने काव्यरचनाही करीत. अन् समर्थांप्रमाणेच बोहल्यावरून पळण्याचा बेत होता पण नातेवाईकांच्या रेट्याने तो फसला. पण एकदा गृहस्थाश्रम स्वीकारल्यानंतर (इ. स. १९१५) तो ही

उत्तम व आदर्श केला. एस. टी. सी. परीक्षेनंतर सात्विक असा शिक्षकी पेक्षा पत्करून, कांजी धरमसी हायस्कूलमध्ये शिक्षकाची नोकरी व खाजगी फक्त १० विद्यार्थ्यांच्या शिकवणीवर उपजीविका सुरू झाली.पण मूळच्या अध्यात्मिक पिंडाने उचल खाल्ली आणि **सत्पुरूष रावजीबुवा बिडवाडीकरांकडे** अध्यात्मिक प्रगती विषयी विचारणा करताच त्यांनी 'श्रीराम जयराम जय जय राम' या मंत्राचा ३॥ कोटी जप करून येण्यास सांगताच. शिक्षकाची नोकरी करीत असताना केवळ १-२ वर्षात ३॥ कोटी ऐवजी ४॥ कोटी जपसंख्या श्रींनी पूर्ण केली. जपाचे फळ म्हणून चिंचणी तारापूर किल्ल्यावर अयोध्येच्या आखाड्यातून तुलसीदासांच्या वैरागी पंथाचे **'संत बाबा गंगादास'** यांची व श्रींची गाठ पडली. दोघेही दोन वर्षे एकमेकांना पारखून घेत होते. बाबा गंगादासांच्या वैराग्याची पुरेपूर खात्री पटताच श्री त्यांचे सत्शिष्य बनले अन् त्यांच्याकडून श्रींना 'श्री रामचरितमानसा'ची गोडी लागली. इतकेच नव्हे तर बाबा गंगादासांकडून निर्विकल्प समाधी मध्ये वेदान्त व भगवद्‌गीता इत्यादिंचा हृदयात स्वच्छ प्रकाश पडला.' हृदय वि-लोचन विमल उघडति ।' हे प्रत्यक्ष घडले. अन् बाबा गंगादास मुखाने **'तुलसीदासजी तेरे मुखसे बोलेंगे'** हा दिव्य शुभाशीर्वाद मिळाला.

गृहस्थाश्रमी असून वेगळी झोपडी बांधून ब्रम्हचर्ययुक्त व्रताचरण,जप इ. निश्चयात्मक वैराग्याचरण सुरू झाले. १९३४ साली थोडेसे वैराग्य ढिले करताच 'पुत्ररत्न' प्राप्त झाले. पण आठ दिवसांत ते मरण पावले तेव्हा शाळेत पुत्र झाल्याचा एक व पुत्र गेल्याचा एक असे पेढे वाटणारे ते खरोखरच वैराग्य संपन्न नव्हते काय ? असा स्थितप्रज्ञ या कलियुगात खरोखरच दुर्मिळ !

आता मात्र त्यांची मूळची वैराग्य वृत्ती अधिक बळावली व संन्यास घेण्याची उत्सुकता शिगेस पोचली. त्यासाठी कठोर तपश्चर्येस प्रारंभ झाला. पायी सज्जनगडाची प्रथम यात्रा केली. त्यानंतर नर्मदा तटी कोटेश्वर-मंदिरात ११ दिवसांचे अनुष्ठान केले. या काळात वृध्द ब्राह्मणरूपात शिव-दर्शन व राम-चतुष्ट्य दर्शन ही घडले. त्यानंतर तीर्थयात्रा संपन्न केली.

**१८-१-१९४३ रोजी नाशिक-पुणे मार्गावरील आळे येथील परमहंस परिव्राजकाचार्य वासुदेवानंद सरस्वती (पोटे स्वामी) यांच्याकडून दंडग्रहण व योगपट्ट विधी पूर्वक श्री. द. ना. कर्वेंचे 'प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी यती' हा जणूं दुसरा नवीन जन्म मिळाला.**

अन् नावाप्रमाणे ऋतंभरा प्रज्ञा जागृत होऊन केवळ तीन महिन्यात श्रीरामचरितमानसाचा मराठीमध्ये समवृत्त, समच्छंद अनुवाद लिहून पूर्ण झाला. तो अनुवाद गुरूंना समर्पण करताच त्यांचेकडून 'धन्योऽसि कृतकृत्योऽसि पावितं स्वकुलं त्वया । अन्तः संतोषमापन्ना श्रुत्वा रामायणं वयम् ॥' असा शुभाशीर्वादही लाभला. त्यानंतर गुरूगीता-प्रबोधिनी ही प्राकृत टीका, देवीच्या ध्यानाचा श्लोक (तिचे दर्शन), बालराम दर्शनानंतरचे काव्य, हनुमान चालिसा, भगवद्गीता यांचे मराठी अनुवाद, अनेक आरत्या, अष्टके, अभंग, ओव्या, भूपाळ्या असे काव्य निर्माण झाले. त्यानंतर बाबा गंगादासांच्या आशीर्वादानुसार 'मानस गूढार्थ चंद्रिका' या नावाने रामचरितमानस या ग्रंथाची टीका वा भाष्य बृहत् ज्ञानकोश सदृश सुमारे ७००० पानी हिंदी आणि मराठीतून लिहून मुद्रण प्रतींसह तयार झाले. त्यानंतर सर्वात शेवटची त्यांची अध्यात्मिक साहित्य निर्मिती म्हणजे **'मानवतापूर्ती साधन-संध्योपासना'** हा उत्कृष्ठ ग्रंथ होय. पंचवीस वर्षांच्या संन्यासाश्रमात श्रीरामचरित मानसाची अगणित पारायणे (एक-दिन, त्रिदिन, नवदिन अशी) करून त्यावर रसाळ व भावुकतेने प्रवचने केली. अनेक सामान्य जीवांना मंत्र व दीक्षा देऊन त्यांचा उध्दार केला. त्यांना सन्मार्गास लावले. स्वहस्ते सप्तरंगी शाई तयार करून त्याने श्रीरामचरित मानस लिहून ती पोथी समर्थ चरणी सज्जनगडावर अर्पण केली. २३ मार्च १९६८ रोजी नऊ दिवसांच्या प्रायोपवेशानंतर (अन्न-पाणी वर्ज्य करून) जेथे शेवटचे वास्तव्य होते. तेथे परांडा (जि. उस्मानाबाद-धाराशीव) येथे आपले जीवन-पुष्प रामचरणी अर्पण केले. (महासमाधी घेतली)

(या लेखाव्दारे स्वामी चरित्राचा हा अतिसंक्षिप्त परिचय आहे.)

आजच्या या कलियुगातही यथाशास्त्र अत्यंत कडक असे शुचिर्भूत आयुष्य जगलेले हे स्वामी संन्यासाश्रमानंतर त्यांनी आजन्म स्त्री आणि पैसा, द्रव्य याला स्पर्शही केला नाही. २०-२० तास 'मानस गूढार्थ चंद्रिकेचे' लेखन केले तेही अत्यंत निष्काम, निस्पृह व विनयपूर्णतेने जनहितार्थ कारण या लेखनामागची त्यांची स्पष्ट भूमिका ते सांगतात- "**प्रज्ञा लिही यंत्रसा।**" आणि "**प्रेरक हृदिं रघुवंश विभूषण**"

संन्यासी असूनही इ.स.१९४६ च्या रझाकारांच्या अत्याचाराच्या वेळी "हिंदूंनो, डोळे उघडा, संघ संपन्न व्हा-"असे केसरीतून ओजस्वीपणे लेख लिहून "कोणत्याही संकटात तुम्ही साद घाला हा स्वामी तुमचाच आहे." असे अतिशय आत्मीयतेने सांगणारे हे स्वामी जनहितासाठी तितकेच प्रेमळ व करूणामयी होते. मात्र प्रसिध्दी पराङ्मुख असल्याने महाराष्ट्रालाही अज्ञातच राहिले. त्यांचे रामचरित मानस (मराठी),'मानस गूढार्थ चंद्रिका' हिंदी व मराठी वाचून आजचे थोर संत पू. मुरारी बापू, ब्रम्हलीन रामसुखदासजी, स्वामी तेजोमयानंद (विश्वव्यापी संस्थेचे प्रमुख 'चिन्मय मिशन') प्रभावित झाले आहेत.

तर 'संध्योपासना' ग्रंथ वाचून पू. किशोरजी व्यास (स्वामी गोविंददेवगिरी) हे तर इतके प्रभावित झाले की त्यांनी हा ग्रंथ त्यांच्या धर्मश्री तर्फे हिंदीतून भाषांतरीत करून जगभर वितरित केला. तसेच त्यांच्यामुळे स्वामीच्या शिष्यवर्गाने 'श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ' या ट्रस्टव्दारे प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे 'मानस गूढार्थ चंद्रिकेचे'चे १७ खंड मराठीतून प्रकाशित झाले.

आज प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती शेवटची पाच-सहा वर्षे ज्या वाडयात राहात होते तेथे त्यांचे स्मारकरूपाने '**श्रीरामविश्रामधाम**' नावाने सुरेख सुंदर संगमरवरी राम मंदिर मोठ्या डौलाने उभे आहे. तेथे राम-सीता सिंहासनस्थ, पदस्पर्श करणारे हनुमान, लक्ष्मण-भरत-शत्रुघ्नासह मुख्य राम-दरबार असून श्रीगणेश, दासमारूती, बालकृष्ण व नंदीसह शिवलिंग मूर्ती आहेत आणि मंदिरात रामचरितमानसातील (मूळ-हिंदी) तील चौपाया, दोहे, मंगलाचरणे कोरलेली

आहेत. ह्या मंदिराची प्राणप्रतिष्ठापना राष्ट्रसंत पू. मुरारीबापूंचे हस्ते २००३ साली तर शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा २००४ साली पू. किशोरजी व्यास यांचे हस्ते झाली आहे.

हे मंदिर परांडा बसस्थानकापासून चालत पाच मिनीटांवर आहे. तसेच बसस्थानकापासून पाच मिनीटावर प.पू. स्वामींची समाधी (प.पू. हंसराज महाराज स्वामी व प. पू. अनंतदास रामदासींच्या समाधींसह) एकत्रित ''हंसराज मठ'' या मठात आहे. कुर्डूवाडीपासून २० कि.मी. किंवा बार्शीपासून ३०-३५ कि. मी. वर परांडा आहे. तसेच समर्थ शिष्य-दासबोध लेखक प.पू. कल्याणस्वामी यांचीही समाधी परांडा इथेच आहे. तर डोमगांव (परांड्यापासुन पुढे सुमारे ५० कि.मी.वर) समर्थ लिखित-'दासबोध' राममंदिरात पाहावयास मिळतो.

प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी लिखित (अनुवादित) मराठी श्रीरामचरित मानसाचा प्रचार, प्रसार करण्यासाठी त्यांची शिष्या सौ. राजश्री (शामला) भालचंद्र दिवाकर हिने भारतभर महिलांसह हिंडून सामूहिक १११ पारायणे संपन्न केली आहेत. तसेच सौ. रेखा नी. पटवर्धन (प्रज्ञाशिष्या रामदासी) ह्या ही स्वामी शिष्येने सध्या १११ अशीच सामूहिक पारायणे करणयाचा संकल्प केला आहे. त्यानुसार ७० पारायणे संपन्नही झाली आहेत.

श्रीराम विश्रामधाममध्ये 'श्री अन्नपूर्णा भवन' बांधून अन्नछत्र सुरू करणे, ध्यान मंदिर, वेदपाठशाळा, गोशाळा, दवाखाना असे अनेकविध भावी प्रकल्प श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ रजि. ट्रस्टचे आहेत आणि स्वामींचे बरेचसे अप्रकाशित साहित्य ही प्रकाशित करणे हा प्रकल्प आहे. तरी या सर्व प्रकल्पांसाठी आपल्या सारख्या उदार भक्तांकडून भरघोस आर्थिक साहाय्याची रास्त अपेक्षा आहे. मानस गूढार्थ चंद्रिकेचे १७/१८ खंड मराठीतून रू.३७६० चे आजीवन सदस्य योजनेत फक्त रू. २५०० मध्ये उपलब्ध होतील. ८०/जी ची कर सवलतही देणग्यांसाठी उपलब्ध आहे. तरी या सर्वांसाठी सौ. राजश्री भालचंद्र दिवाकर, मल्हार बंगला, समर्थ-नगर, राममंदिर नजीक, मु. पो.

उस्मानाबाद. फोन-(०२४७२-२२४९८९) येथे संपर्क साधावा. तसेच सामूहिक पारायणे व प्रवचने यासाठी सौ. रेखा नी. पटवर्धन, अक्षय रेस्टॉरंट समोर, अमर टॉकीज जवळ, मिरज- ४१६४१०, जि. सांगली. फोन-(०२३३-२२२१०८३) किंवा ०९४२३०३६११९ यावर संपर्क साधावा.

"महाराष्ट्राचे तुलसीदास" असा यथोचित गौरव प्रसिध्द लेखक श्री. रा. चिं. ढेरे यांनी प्रज्ञानानंद सरस्वतींचा केला आहे. याच नांवाने सौ. अनिता प्र. केळकर यांनी स्वामींवर पी.एच.डी. केलेला प्रबंध ग्रंथ रूपाने उपलब्ध झाला आहे. तसेच स्वामींच्या अंतरंग शिष्या डॉ. कमल बा. वैद्य यांनी संतचरित्र मालेत प.पू. स्वामींचे व तुलसीदासांचे चरित्र गद्यात लिहीले आहे. तसेच 'प्रज्ञाचरित मानस' नावाने (पारायणार्थ) काव्यात लिहीले आहे.

प.पू. स्वामी गोरेपान, घारे भेदक डोळे असलेले, कोकणस्थी कडक शिस्तीचे, अत्यंत परखड पण तितकेच अतीव प्रेमळ व करूणार्द्र अंत:करणाचे होते. सत्यभाषण, परदोषचर्चा व निंदा पूर्णत: वर्ज्य, सदाचार यावर त्यांचा कटाक्ष होता. प्रेमाने व नेमाने साधन करावे ही त्यांची खास शिकवण होती तर **स्त्रियांनी पतिव्रता धर्म पाळलाच पाहिजे** असा त्यांचा आग्रह होता. **ध्यान, मानस पूजा, मंत्रजप, पारायण (रामचरितमानस) व भजन** ही त्यांची पंचसूत्री शिष्य वा साधकांसाठी होती. फाल्गुन वद्य दशमीस हंसराज मठात त्यांची पुण्यतिथी साजरी होते.

तर रामविश्रामधामात गुढी पाडवा ते हनुमान जयंती, रामोत्सव, गोकुळाष्टमी, महाशिवरात्री व गणेश चतुर्थी हे उत्सव संपन्न होतात. आपण सर्वांनी अवश्य परांड्याच्या या श्रीराम विश्रामधाम व हसंराज मठाचे किमान एकदा तरी दर्शन घ्यावेच घ्यावे ही विनंती-प्रार्थना!



अधिक माहिती —

गीता-प्रेस गोरखपूर तर्फे "मानस गूढार्थ चंद्रिका" प्रस्तावनेसह सात खंडात प.पू. रामसुखदास स्वामींचे कृपेने प्रकाशित झाली आहे. तर विद्यावाचस्पती शंकर अभ्यंकर यांच्या भक्ती कोशाच्या भारतीय संप्रदाय या तृतीय खंडात (पान ६४४ प्रज्ञानानंद) प.पू. स्वामींचा अल्प परिचय आहे. तसेच विवेक तर्फे निघणाऱ्या आधुनिक महाराष्ट्राची जडण घडण शिल्पकारचरित्रकोशाच्या धर्मखडांत प.पू.प्रज्ञानानंद स्वामींचे चरित्र व कार्य याचा समावेश असणार आहे. पू. मुरारी बापू राष्ट्रसंत यांनी २००९ मध्ये सुरू केलेल्या 'तुलसी-अवॉर्ड' योजनेत दिवंगत रामायणी म्हणून प.पू.स्वामींचा सत्कार स्वामींचे अंतरंग शिष्य श्री. श्रीरामजी गिल्डा यांनी स्वीकारला. कै. श्रीरामजी गिल्डांनी प.पू.स्वामींची गुरूसेवा म्हणून आजवर सुमारे ५०० यज्ञ कले आहेत. (हनुमान चालिसा पठण व हवन) अशा प्रकारे प.पू.स्वामींची सेवा त्यांनी केली.

२००२ चा 'कल्याणी' विशेषांक(ओंकार ट्रस्ट, पुणे) हा प.पू. प्रज्ञानानंद सरस्वतींवरचा होता.

— सौ. रेखा नी. पटवर्धन
(प्रज्ञाशिष्या रामदासी)



# ✻ ऋण निर्देश ✻

आपल्या अत्यंत व्यस्त अशा अध्यात्मिक जीवन-चर्येतून खास वेळ काढून प. पू. तेजोमयानंद स्वामीजी (विश्वव्यापी चिन्मय मिशनचे अध्यक्ष), प. पू. करवीर पीठाचे विद्यमान जगद्गुरू शंकराचार्य विद्या नृसिंह भारती यांनी या पुस्तकासाठी आपले शुभाशीर्वाद दिले ही ईश्वरी कृपाच होय.

पू. कमाताई (डॉ. कमल बा. वैद्य) या प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींच्या अंतरंग शिष्या यांनी ८७ व्या वर्षी आपल्या अध्यात्ममय दिनचर्येतून मजवरील ("सावलीच्या") खास प्रेमापोटी हा आभिप्राय दिला हा मजवर सद्गुरूंचे अव्याहत असलेले कृपाछत्रच असे मी समजते. तेव्हा या सर्वांच्या कृपाशीर्वाद रूपी प्रेमऋणातच कायम राहणे मी पसंत करते.

या पुस्तकातला बराचसा भाग गीता-भागवत व्रती श्री. दिलीप आपटे यांच्या 'धर्मयज्ञ' मासिकातून पूर्वी प्रसिध्द झालेलाच आहे तेव्हा त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे हे माझे आद्य कर्तव्य ठरते.

तसेच या पुस्तकासाठी ज्ञात-अज्ञात ज्या ज्या व्यक्तींनी तन-मन-धन पूर्वक योगदान दिले त्यांची मी आभारी आहे.

श्री. गजानन प्रिंटिंग प्रेसचे सर्व सभासद यांच्यामुळेच हे पुस्तक-रूपाने छापून आज आपल्या हाती येते आहे तेव्हा त्यांचे आभार मानणे हे सहजी ओघानेच गृहीत आहे. असेच त्यांचे सदैव योगदान लाभो व या पुढेही त्यांचा लोभ श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळावर अखंड राहो हीच रामप्रभुंना प्रार्थना.

सर्वांना

जय सियाराम

आपली सर्वांचीच स्नेहांकित

**सौ. रेखा पटवर्धन**

११/६/२०१२

✻ ✻ ✻ ✻ ✻

## मानस परिचय :

हे रामचरित्र भगवान. शंकरांनी रचून प्रदीर्घकालापर्यंत आपल्या मनात–मानसातच गुप्त ठेवले होते. जणू शंकराच्या मानस-मनरूपी सरोवराच्या तळात खोलवर जाऊन दडले होते. योग्य समयी पार्वतीने प्रेमादरपूर्वक जिज्ञासू प्रश्न विचारल्याने ते हळू हळू उलगडू लागले. त्यालाच शंकरांनी 'श्रीराम-चरित मानस' असे मोठ्या आनंदाने नाव दिले आहे. अशा प्रकारे शंकर पार्वती, याज्ञवल्क्य-भारव्दाज, काकभुशुंडी-गरूड आणि तुलसीदास व त्यांचे मन अशा चार संवाद- रुपाने हे सर्व रामचरित्र सांगितले जात आहे. जणूं मानस-सरोवराचे हे चार घाटच आहेत. ज्ञान,कर्म,भक्ती व दीन (वरील संवादानुक्रमें) अन् या प्रत्येक घाटास सात पायऱ्या वा सोपान आहेत. ती यातील सात कांडे –बाल-अयोध्या-अरण्य-किष्किंधा-सुंदर-लंका व उत्तरकांड होत. ही सात कांडे या क्रमशः सात मोक्षपुऱ्या आहेत - अयोध्या मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिका, द्वारका.

प्रत्येक कांडांचे आरंभी अनुवादकाचे व तुलसीदासांचे मंगलाचरणाचे श्लोक संस्कृतमध्ये आहेत. अन् हे नाट्य महाकाव्य आहे. चौपाई हे याचे मुख्य वृत्त तर दोहा, सोरठा व छंद ही अधून--मधून डोकावणारी वृत्ते यात आहेत. नाट्याची व महाकाव्याची सर्वच्या सर्व लक्षणे यात आपल्याला दिसतात. त्यामुळे संपूर्ण विश्वात नाट्य व काव्य यांचा एकत्रित मिलाप झालेले असे हे एकमेवाव्दितीय अभूतपूर्व असे **'नाट्यमहाकाव्य'** होय! जे जे उत्तम उदात्त उन्नत, महन्, मधुर व मंगल ते ते सारे यात आढळते. ज्ञान, भक्ती व योग यांचा सुंदर समन्वय यात साधलेला असून, सर्व समावेशकता हा याचा प्रमुख गुण आहे. 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वं' तसे 'तुलसीस्पर्शितं विश्वं सर्वं' असे म्हणणे हीच या ग्रंथाची खरी ओळख होय.

ज्ञानेश्वरी, दासबोध यांच्या इतकाच भाव-रस-भक्ती-ज्ञानपूर्ण असा हा प्रासादिक सद्ग्रंथ असून याची व्याप्तीही त्या ग्रंथांइतकीच आहे. पारायणाचे दृष्टीने यात विश्रामही असे घातले आहेत की याचे पारायण तीन-नऊ वा तीस दिवसांतही पूर्ण करता येते.

# बालकाण्ड (अयोध्या मोक्षपुरी)

अनुवादक कृत मंगलाचरण –

*श्रीराम नाम–महवित् पूजाग्र्यो विघ्ननाशको देवः।*
*तं गणनाथं वन्दे हंसारुढां च शारदां रसदाम् ॥१॥*

सरलार्थ –

सीता व राम आणि श्रीरामनामाचे महत्व जाणल्याने प्रथम पूज्य बनलेल्या विघ्नांचा नाश करणाऱ्या गणनाथ–गणपतीस आणि हंसावर बसलेल्या व रस देणाऱ्या शारदेला मी वंदन करतो.

गूढार्थ –

श्रीरामनामाला तीन प्रदक्षिणा घातल्याने गणेशांना पृथ्वी प्रदक्षिणेचे फळ मिळाले व ते शर्यतीत कार्तिकेयाबरोबर जिंकले आणि म्हणूनच त्यामुळे गणेशास प्रथम पूजेचा मान मिळाला. वेदात प्रथम विघ्नकर असणारी ही शिवगणांची प्रमुख देवता नंतर विघ्नहर्ता बनली. तसेच ही बुध्दीची देवता असल्याने प्रथम गणेश वंदन सर्वत्रच केले जाते. तसेच वाणीची देवता शारदा असल्याने ग्रंथारंभी तिला वंदन करणे हे ओघाने आलेच. हंस म्हणजे 'सः अहम्' या ब्रह्माचे अधिष्ठान असलेली ही महामाया वा आदिशक्ती कुंडलिनी होय. 'रसो वै सः' असा ब्रह्मरसाचा अनुभव ज्ञान व भक्तिव्दारे करुन देणारी म्हणून तिला प्रथम वंदन केले जाते. कारण या ग्रंथाची जी इष्टदेवता श्रीराम व त्याचे नाम (रामनामामृत) याची प्राप्ती दोन्ही देवतांच्या कृपेनेच होणार म्हणून त्यांना प्रथम वंदन !

रामदास रामाहुनि मोठे या सिध्दांतानुसार हनुमंतांच्या कृपेशिवाय रामकृपा होणेच शक्य नाही म्हणून –लगेच हनुमान वंदनाचा श्लोक

*श्रीरामभक्तवंद्यं रघुपतिभक्तार्तिनाशनं धीरम् ।*
*वंदे रघुवीरनुतं शरणागतरक्षकं महावीरम् ॥२॥*

सरलार्थ –

श्रीराम भक्तांना वंदनीय अशा रघुपतींच्या भक्तांची संकटे नाश करणाऱ्या, शरण आलेल्यांचे रक्षण करणाऱ्या, महावीर हनुमंतास मी वंदन करतो की स्वत: रघुवीरांनी ज्याची स्वमुखे प्रशंसा केली आहे.

गूढार्थ –

ज्याच्या हृदयात राम-सीता लक्ष्मण सदैव वस्ती करुन आहेत असा हनुमान सर्वांना वंदनीय असणारच। म्हणून जगात जितक्या प्रमाणात हनुमान मंदिरे आहेत तेवढी राम मंदिरे नाहीत. कारण जिथे हनुमान आहे तिथे राम आहेच. हनुमानाशिवाय राम अपूर्णच आहे. इतका हनुमान राम-चरित्र व्यापून आहे. हनुमंताशिवाय राम वा रामायण ही कल्पनाच कुणी करु शकत नाही. अशा हनुमंतांच्यामुळे सीता व राम यांचे मीलन होऊ शकले, वानर–सेनाबळावर राम रावणावर विजय मिळवू शकले. लक्ष्मणास प्राणदान देणारे, भरतासाठी प्राणदान देणारे (१४ वर्षानंतर राम सीता लक्ष्मण येताहेत ही बातमी देऊन) असे हे भक्तार्तिनाशक हनुमान आहेत. असे हे हनुमंत सर्व प्रकारची संकटे नाश करुन साधकास अध्यात्म मार्गात प्रगती पथावर नेण्यास मदत करतात इतकेच नव्हे तर राम – आत्माराम प्राप्तीचे इप्सित ध्येय मिळवून देण्यात मोलाची मदत करतात असे हे धीर,वीर नवभक्तीयुक्त 'रामप्रिय' आहेत म्हणून त्यांना वंदन हे अत्यंत संयुक्तिकच आहे.

*शरदंबराभनीलं शरत्सरोरुह सुरम्यमुखकंजम् ।*
*रामं विधिशिववंद्यं वंदे वाल्मिकिविमल वागीड्यम् ॥३॥*

सरलार्थ –

शरद ऋतूतील आकाशाप्रमाणे नील (श्याम) वर्णाचे व शरद ऋतूतील प्रफुल्ल जसे सरोवरातून नुकत्याच उमललेल्या कमलाप्रमाणे रम्य मुखकमलाचे जे राम त्यांना मी वंदन करतो. त्या रामांना ब्रह्मदेव व शंकरही वंदन करतात. अशा रामांची स्तुती वाल्मिकींच्या विमल वाणीने करण्यास ते अति योग्य वा संयुक्तिकच आहे.

गूढार्थ –

शरद ऋतूतील आकाश व कमळ हे विशेष सुंदर,प्रसन्न, आल्हाददायक असतात. आकाशाची निरभ्रता व नीलवर्ण हा विशेष विलोभनीय असा असतो. तसेच सरोरुह म्हणजे सरोवरातून नुकतेच उमललेले वा पूर्णपणे विकसित झालेले कमळ – यात रम्यतेबरोबर नित्य नूतनत्व, ताजेपणा वा टवटवीतपणा व पूर्ण विकसणे हे विशेष गुण अंतर्भूत करण्यात तुलसीदासांची अतुलनीय काव्यकला दिसते. रामांचे मुख सौंदर्य हे नित्य नूतन व परिपूर्ण आहे, हे खास सूचित करण्यात कवीची संयुक्तिक चपखलता विशेष नजरेत भरते, तर कंज--कमळ यात कं--ब्रह्म--सुख--आनंद हा अर्थ जाणवून देऊन रामांचे परब्रह्मत्व सहजपणे कवी लक्षात आणून देतात. तसेच 'विधिशिववंद्यं' शब्दाने-या परब्रह्मत्वास अधिक पुष्टीही मिळते. येथे विष्णूचा मुद्दाम उल्लेख टाळण्यात हेतू असा – राम कधी विष्णू रुपाने, कधी नारायण रुपाने तर कधी परमात्म रुपाने अवतरतात. तसेच वाल्मिकी हे वेदांप्रमाणे अपौरुषेय, पवित्र असे प्राचेतस आहेत हे ही त्यांचे वैशिष्ट्य एका 'विमल' शब्दातून वाचकांच्या ध्यानीमनी सहजपणे रुजवून देतात. रामनामाच्या अखंड अविरत अनुसंधानामुळे वाल्मिकी प्राचेतस बनले हा रामनाम महिमाही यात गूढरुपाने नकळत दृगोचर होतो. तर राम या मूळ शब्दात 'योग्यांच्याही चित्ताला रमविणारे' असा अर्थ तर गृहीत आहेच आहे.

तेव्हा रुप, गुण, शील,स्वभाव या साऱ्या साऱ्या निकषांनी आदिकवी वाल्मिकींनी ज्या रामाचे परब्रह्माचे आदर्श नरशार्दूलाचे वर्णन करुन आपली वाणीच नव्हे तर सारे आयुष्य चरित्रात परिवर्तित केले अशा 'अभिरामास' तुलसीदास वंदन करतात ते त्रिविध रुपात मूळ निर्गुण, निराकार, सगुण साकार व अवतारी राजकुमार अशाप्रकारे कोणत्याही दृष्टीकोनातून रामांकडे पाहिले असता हे सौंदर्याचे सारे निकष परिपूर्ण उतरतात. पाहणाऱ्याची जशी दृष्टी तसा त्याला अनुभव येणार. निर्गुणोपासक असो सगुणोपासक असो की आजच्या विज्ञानयुगातला देव न मानणारा वा देवास रिटायर करणारा नास्तिक असो त्याला 'आदर्श मानव' या स्तरावरही राम हा आदर्श म्हणून सर्वथैव सौंदर्याचा पुतळा मानावाच लागेल.

*आद्यकवेरवतारं भवतारक- रामचरित –विस्तारम् ।*
*कामारिप्रियभक्तं तुलसीदासं नमामि साष्टांगम् ॥४॥*

सरलार्थ –

आद्यकवीचे अवतार असलेले, संसारातून तारणाऱ्या श्रीरामचरिताचा विस्तार करणारे, शंकरांचे प्रिय भक्त किंवा जे शंकरांना प्रिय होते त्या तुलसीदासांना मी साष्टांग नमस्कार करतो.

गूढार्थ –

*श्री वाल्मिकीच झाला श्री तुलसीदास रामयश गाया ।*
*तरीच प्रेमरसाची खाणी वाणी तशीच वश गा या ॥*

– मोरोपंत

यावरून तुलसीदास म्हणजे वाल्मिकी ह्या सिध्दांतास पुष्टी मिळते. वाल्मिकींपासून तुलसीदासांपर्यंत जी जी रामायणे होती त्या सर्वातील उत्तम मंगलांचे एकत्रीकरण करुन सर्वसमावेशकता व समन्वयात्मकता करीत तुलसीदासांनी हे रामचरितमानस लिहिले. जीवनभर गायले. अर्थात त्यांनी ते 'स्वान्तः सुखाय' असे केले –गायले असले तरी त्यामुळे अगणितांचा उध्दार झाला. हे लक्षात येऊन त्याची 'भवतारकता' सिध्दच झाली. तेव्हा अशा समाजोध्दारकास साष्टांग प्रणमन करणे ही अति उचित अशी कृतज्ञताच येथे स्पष्ट होते. तसेच 'कामारिप्रियभक्त' यातून तुलसीदासांची शिवभक्ती-शिवानुग्रह-शिवप्रसाद हे सारे सारे सूचित केले आहे. शिवाय 'शंकर-भजनविना भक्ति न मम लभतात' हे रामवचन लक्षात घेता शिवभक्तीनेच रामभक्ती मिळते ह्या सिध्दांताचेही येथे दृढीकरण केले आहे. त्याचप्रमाणे 'कामारि'तून तुलसीदासांचे परम वैराग्य संपन्न जीवन सहजी सुचवून दिले आहे. किंबहुना राम व रामनामभक्तच असा कामारि होतो हे ही जाता जाता सूचित करून स्वामींनी सामान्य जनातून साधक निर्माण व्हावा अशी प्रेरणा वा प्रोत्साहनही यात ओतप्रोत भरून ठेवले आहे. रामास व रामनामास आपले समग्र जीवन समर्पित केलेल्या तुलसीदासांचा आदर्श प.पू प्रज्ञानानंद सरस्वती

स्वामींनीही अनुसरला व आपले जीवनपुष्प रामचरणी आनंदविभोर होऊन सर्वस्वभावे समर्पित केले. यांतून प्रेरणा स्फूर्ती घेऊन प्रत्येक सामान्य जीवाने आत्मारामाची प्राप्ती करून घ्यावी हा जणू दिव्य संदेशच या तुलसीदास स्तवनाव्दारे स्वामी देत आहेत.

तसेच साष्टांग नमनात जसे कायेने नमन आहे तसेच वाचा व मने नमन किंबहुना न-मन होऊन वा उन्मन होऊन प्रत्येकाने उन्नत व्हावे. प्रत्येक जीवाने उन्नयन होत होत थेट त्या रामाप्रत आपले मन--बुध्दी उंचावून नेत नेत सरते शेवटी त्या 'आत्मारामात' (परब्रह्मात-परम तत्वात) विलीन व्हावे, विरून-विरघळून जावे. अन् हे दिव्य केवळ रामनामाने शक्य आहे हे स्वामी गुरु शास्त्र व आत्म प्रचितीचे बळावर नि:संदेहपणे व सुस्पष्टपणे जणूं प्रत्येकावर बिंबविण्याचाच अथक प्रयत्न करीत आहेत. याचसाठी हा सारा अट्टाहास आहे असे म्हटल्यास ती अतिशयोक्ति होऊ नये.

*यस्याशीर्वादघनो मानसगूढार्थ वृष्टिना हृदयम् ।*
*सततं प्लावयतीदं गंगादासं नमामि भक्त्या तम् ॥५॥*

<u>सरलार्थ --</u>

ज्यांचा आशीर्वादरुपी मेघ मानसाच्या गूढार्थरुपी जलाच्या वृष्टीने या हृदयास सतत भिजवीत आहे, त्या बाबा गंगादासांना मी प्रेमाने नमस्कार करतो.

<u>गूढार्थ --</u>

रामायण-गुरू बाबा गंगादास यांचा कृपाशीर्वाद-शुभाशीर्वाद 'तुलसीदासजी तेरे मुखसे बोलेंगे;' - या मुळेच श्रीरामचरितमानसाचा मराठी समवृत्त समच्छंद अनुवाद केवळ तीन महिन्यात पूर्ण होऊ शकला आणि त्याच कृपेची अनवरत वृष्टी म्हणजे 'मानस गूढार्थ चंद्रिका' ही मराठी व हिंदी गूढार्थ सारगर्भित अर्थाने युक्त अशी टीका स्वामींकडून लिहीली गेली. अनेक योग --अध्यात्मपर गूढार्थ ऐनवेळी उस्फूर्तपणे सुचले.

श्री. रघुनाथाच्या अलौकिक अद्‌भूत चरित्राची उकल ज्यांच्या

कृपाशीर्वादाने व्यक्त केली त्यांची कृतज्ञता भक्तिपूर्ण अंत:करणाने नमस्कार करण्याशिवाय कांहीही करु शकत नाही.,बाबा गंगादासांची प्रत्यक्ष सेवा करता आली नाही ही किंचितशी अंतरीची हुरहुर जणू या भक्तीमयतेने स्वामी व्यक्त करीत आहेतसे वाटते. तर या गूढार्थाचे समग्र कर्ते करविते हे रामायण-गुरु व आपले प्रभु-गुरूच आहेत अशी स्वामींची दृढधारणा आहे म्हणून तर 'प्रज्ञा लिही यंत्रसा' आणि 'प्रेरक हृदिं रघुवंश विभूषण' हे सतत उल्लेख न राहवून पुन:पुन्हा येतात.

*यत्पादपंकज पराग पवित्र मौलिर्भूयो न पश्यति नरो जठरं जनन्या:।*
*तं वासुदेवमजमीशमनन्तबोधं श्रीमद्गुरुं शरणदं प्रणतोऽस्मि नित्यम् ॥६॥*

<u>सरलार्थ –</u>

ज्यांच्या चरण कमलांच्या परागांनी ज्याचे मस्तक पवित्र झाले आहे असा नर पुन्हा जननीचे उदर (गर्भवास) पहात नाही. जे जन्मरहित, ईश्वरस्वरुप, ज्ञानरुप व अंतरहित (अनंत) अशा शरणागतास आश्रय देणाऱ्या श्रीमान सद्गुरु वासुदेवानंद सरस्वती (पोटे स्वामी) महाराजांना मी नित्य प्रणाम करतो.

प.पू. वासुदेवानंद सरस्वती (पोटे स्वामी-पुणे नाशिक रोडवरील आळे येथील) हे प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे संन्यास-दीक्षा गुरु-सद्गुरु होत. या सद्गुरुंच्या कृपाप्रसादानेच पूर्वाश्रमीच्या दत्तात्रय-नारायण कर्वे (ईश्वरदास रामदासींचे) 'प्रज्ञानानंद' झाले. केवळ सद्गुरूकृपेने त्यांची ऋतंभरा प्रज्ञा जागृत झाली व त्या योगेच 'आपणासारिखे करिती तात्काळ' या उक्तीनुसार प्रज्ञानानंद अनेकांचे सद्गुरु बनले. गुरु साक्षात परब्रह्मनुसार सद्गुरु हे तत्त्वरुप असल्याने ते अज, ईश, अनंत व बोधरुप आहेत. हेच श्रुतीस्मृतीदिनी सांगितलेले, स्वानुभवाने सिध्द झाल्याचे स्वामी इथे प्रतिपादन करतात व अत्यंत विनम्रभावे सद्गुरु चरणांना शरण जाऊन त्यांना अखंड-अविरत –अनवरत प्रणमन करतात.' जणू या सद्गुरु ऋणांतून अंशत: मुक्त होण्याचा प्रयत्न म्हणून स्वामींनी आपली समग्र वाङमयीन कृती सद्गुरुंना समर्पित केली आहे. (मग ती गुरुगीता प्रबोधिनी असो, ब्रह्मस्तुती असो की

भगवद्गीता व हनुमान चालिसा यांचा अनुवाद असो की संध्योपासनेसारखा उत्कृष्ठ ग्रंथ असो. स्फुट काव्य, आरत्या, अष्टके, भजने इ. प्रत्येक कृती 'प्रज्ञा वासुदेव' बनली आहे.)

*तुलसी मंजरी शुध्दा रामभ्रमरभूषिता ।*
*रामाज्ञया स्वभाषायां प्रज्ञानेनाऽनुवाद्यते ॥७॥*

सरलार्थ –

रामरुपी भ्रमराने विभूषित अशा शुद्ध तुलसी मंजिरीचा अनुवाद श्री रामचंद्रांच्या अनुज्ञेनेच – आज्ञेनेच प्रज्ञानानंदांकडून स्वभाषेत म्हणजे मातृभाषेत मराठीत केला जात आहे.

गुढार्थ –

*आनंदकानने काश्यां जंगमस्तुलसीतरुः ।*
*कवितामंजिरी यस्य रामभ्रमर भूषिता ॥*

श्रीमद्आचार्य मधुसूदन सरस्वती (अव्दैतसिध्दी व भक्ती रसायन - ग्रंथकार) म्हणतात. तुलसीदास हे जणू तुळशीचे रोपटे व श्री रामचरितमानस ही त्यांची मंजरी (मंजिरी). त्यावर आकर्षित होऊन बसलेला भ्रमर – त्याचा मकरंदपान करणारा- भगवान श्रीराम प्रत्यक्ष. यावरुन हे श्रीरामचरितमानस श्रीरामांना अत्यंत प्रिय झाले आहे हेच कळते. तेव्हा अशा तुळशीच्या मंजिरीनें प्रज्ञानानंद आपल्या आत्मारामाची पूजा करण्यासाठी त्यांच्याच आदेशानुसार या तुलसीकृत हिंदी मानसाचा मराठीत अनुवाद करीत आहेत.

लौकिक तुळशीवर धूळ इ. ने ती दूषित अशुध्द बनू शकते, पण ही तुळसी-मंजिरी 'श्रीरामचरितमानस' हे अत्यंत शुध्द,परमपवित्र, अलौकिक दिव्य असे असल्याने ते रामप्रभूंना अतीव प्रिय आहे. शिवाय रामाज्ञा हे एकमेव श्रेष्ठ कारण या अनुवादाचे असल्याने ते सद्गुरु, रामायण गुरु व प्रभू श्रीरामचंद्र अशा त्रयींच्या कृपाशीर्वादाने अत्यंत दिव्य अद्भुत मंत्रमय झाले आहे. याचा आजही साक्षात् अनुभव घेणारे साधक आहेत.

गोस्वामी तुलसीदासकृत मूळ मंगलाचरण –

*वर्णानामर्थसंघानां रसानां छंदसामपि ।*

*मंगलानां च कर्तारौ वन्दे वाणी-विनायकौ ॥१॥*

सरलार्थ –

वर्ण (अ पासून ज्ञ पर्यंतची अक्षरे) अर्थांचे समुदाय, छंद, रस व सर्व प्रकारचे मंगल करणाऱ्या वाणी (शारदा) व विनायक (गणपती ) यांना मी वंदन करतो.

गूढार्थ –

आशीर्वादात्मक मंगलाचरण या दृष्टीकोनातून ग्रंथसिध्दिसाठी बुध्दि देवता व वाणी देवता म्हणुन वरवर पाहता हे गणेश – सरस्वतीचे वंदन आहे. अन् गूढार्थ दृष्ट्या वाणी सीता व वि-नायक म्हणजे ग्रंथाचा विशेष नायक म्हणून रामास वंदन केले आहे. तसेच हे दोघे मंगल – कल्याण – हित करणारे असून अर्थातच अमंगलाचा नाश करणारे असे आहेत. त्यानंतर ज्या अक्षर (शब्द) व अर्थाव्दारे रस व छंद (काव्य) यांची निष्पत्ती होते त्या सर्वांना वंदन करण्यात परम विनम्रता व कृतज्ञता दिसून येते.

त्याचप्रमाणे वर्ण म्हणजे तेज, इ. पंचमहाभूते व त्यांचे गुण यांनाही वंदन आहे. तसेच अर्थ संघ म्हणजे सर्व पंचभौतिक पदार्थांचे समुदाय हाही अर्थ इथे अपेक्षित आहे. रस म्हणजे रसौ वै सः या ब्रह्मापासून काव्यातले नवरस, अन्नातील षड्रस व गोडी आवड असे सर्व अर्थ इथे अभिप्रेत आहेत, तर छंद – मधून वेद व काव्यातील अनेक छंद असाही अर्थ आहे. सारांश ब्रह्म–वेदांपासून पंचभौतिक सर्व जगताचे मंगल करणाऱ्या सीतारामाना इथे वंदन केले आहे. अन् ते ही 'व' या अमृतबीजाने म्हणजेच हा समग्र ग्रंथ अमृतमय आहे हेच तुलसीदास याव्दारे सूचित करतात.

तर वस्तु –निर्देशात्मक मंगलाचरण कसे ते आता आपण पाहू. 'मंगलांना च कर्तारौ' मध्ये 'अमंगलानां च हर्तारौ' हे अनुस्यूत आहेच. त्या दृष्टीने बालकांडात प्रथम अमंगलाचा नाश कसा आहे हे पाहू. सती मोह, नारद मोह, प्रतापभानूचा लोभ- यांचे हरण (नाश) प्रथम करून परमात्मा (निर्गुण निराकार) मनू- शतरुपासाठी सगुण-साकार रुपाने राम-सीतारुपात साक्षात

समोर दर्शन देतात आणि आपल्या वचनानुसार दशरथ-कौसल्याचे सान्निध्यात आपल्या सर्व अंशासह प्रगट होऊन मंगलाच्या प्रादुर्भावास प्रारंभ होतो.

जन्म वा प्राकट्यानंतर माता पित्यांना प्रदीर्घकालानंतर बाललीलांचे यथेच्छ सुख प्रदान करतात. सर्व अयोध्येला सुखानंदाने परिपूर्ण सुस्नात करतात. वसिष्ठांनाही त्याच सुखाचा लाभ देण्यासाठी गुरुगृही विद्याग्रहण करुन राजकुमार बनून दशरथांना भावी ज्येष्ठ व सर्वार्थाने श्रेष्ठ अशा युवराजाचे पुत्रप्राप्तीचे उचित फळ पदरी टाकतात. माता-पित्याच्या आज्ञेचे पालन करण्याच्या टप्प्यातून विद्यागुरुच्या आज्ञापालनास सुसज्ज होऊन सानंद मनाने विश्वामित्रांसमवेत विद्येची अंमलबजावणी करण्यास अयोध्येच्या राजमहालाबाहेर पदार्पण करतात.

त्राटिका-मर्दन, सुबाहु नाश याव्दारे अविद्या, अहंकार यांचा पूर्ण विनाश करून अहिल्योध्दाराव्दारे शरणागती वा समर्पण- त्यागी वृत्ती वा एकान्ताचा गौरव करून भागीरथी गंगा सत्संगात विश्वामित्र-विद्यागुरुंच्या आज्ञेने भक्ती सीतेचे पाणीग्रहण करण्यापूर्वी परशुरामांच्या मद-मोह पटलास दूर सारतात. शिवधनुष्य भंगापूर्वी 'पुष्पवाटिका' प्रसंगातून कामविजय सिध्द करून शिव-भवचाप भंगास अधिकारी ठरल्याचे जाहीर करतात अन् त्यानंतर भक्ती वा शांतीरुपी वैदेहीचा सानंद स्वीकार करतात तो देखील विश्वामित्रांच्या आज्ञेनेच.

जनक-दशरथ-विश्वामित्र-अशा ज्ञान-वयो-तपोवृध्दांच्या आज्ञेच्या अनुसरणातच विवाह संपन्नतेनंतर राज्यभार सांभाळू लागतात. अशा प्रकारे बालकांड समाप्तीपर्यन्त 'मंगलानांच कर्तारौ' हेच सूत्र अवलंबलेले दिसते.

तसेच ह्या प्रथम अनुष्टुभ छंदानुसार सार्थ जेष्ठाज्ञा अनुसरणातच बालकांड संपते. तेव्हा मंगलाचरणासाठी वापरलेला छंद देखील अत्यंत संयुक्तिक आहे-इथे तुलसीदासांची असीम काव्यकला दिसते. तसेच यातील प्रत्येक प्रसंग वा प्रकरण नाट्यपूर्ण आहेच आहे. (अनुष्टुभ् म्हणजे वाणी किंवा सरस्वती, व्यापणे, स्तंभीत करणे, वश करणे, कोणाचे तरी अनुगमन करुन वश करणे असे अनेक अर्थ आहेत) ते सर्व अर्थ बालकांडात पूर्णांशाने सार्थ झालेले दिसतात. प्राकट्यातून विवाहोत्तर अयोध्येत येईपर्यंत रामांनी सर्वांना आपल्या रुप-गुण-शील स्वभावादिंनी वश करुन ठेवले होते. मिथीलेत सारे विदेही (सिध्द) असूनही सर्वांचे मन हरण करून घेतले होते. तर बालकांडात

संपूर्ण रामचरित माता-पिता व गुरु यांच्या अनुगमनातच व्यतीत झालेले दिसते. सीतेच्या आगमनानंतर मुळची मंगलाने समृध्द असलेली अयोध्या सर्वार्थाने-मांगल्याने अधिकच सुसंपन्न झाली. अशा प्रकारे हा प्रथम श्लोक बालकांडाचे प्रतिनिधित्व कसे करतो तेही आपण पाहिले.

*भवानी शंकरौ वन्दे श्रध्दा विश्वासरुपिणौ ।*

*याभ्यांविना न पश्यन्ति सिध्दा; स्वान्तस्थमीश्वरम॥२॥*

सरलार्थ -

ज्यांच्या शिवाय सिध्दांनासुध्दा (स्वान्तस्थ ) हृदयात असलेल्या ईश्वराचे दर्शन करता वा घेता येत नाही त्या श्रध्दा – विश्वासरुपी शंकरांना मी वंदन करतो.

गूढार्थ –

शंकर म्हणजेच विश्वास- अस्तिक्यबुध्दी व भवानी म्हणजे श्रध्दा – आदर, ईश्वर, वेद, शास्त्रे इ. सत्य आहेत. त्यानुसार आचरण केले असता सद्गगुरुकृपेने शाश्वत सुख वा आनंदाची प्राप्ती होते – ही पक्की विचारधारणा म्हणजे विश्वास होय.

असा मूळात विश्वास असेल तर या सर्वांबद्दल आदर , प्रेम भक्ती हे भाव रुजतात . अशा प्रकारे हा शं- कल्याण हित करणारा विश्वास व त्याची पुष्टीकारक श्रध्दा प्रेमयुक्त आदर असेल तरच अंतरीच्या आत्मारामाचे दर्शन घेता येते. अन् या विना अगदी सिध्दी संपन्न मनुष्यही अगदी जवळच्या आपल्या हृदयातील परमेश्वरापासून वंचित राहतो.

असा विश्वास व श्रध्दा असणारेच धर्मशील असतात. अन् अशाच साऱ्या परमात्मनिष्ठ स्वधर्माचरण करणाऱ्यांचे धर्मपालन आपल्याला या अयोध्याकांडात सर्वशः दिसते म्हणून हा दुसरा श्लोक अयोध्याकांडाचा प्रतिनिधी होय. दशरथांची सगुण भक्ती, कौसल्येचे महाराणीपण, सुमित्रेची सु-मित्रता वा विश्वसौहार्द. लक्ष्मणाची भगवंत – सेवा, भरतांचा रामस्नेह, रामांचा पुत्र व ज्येष्ठ भातृधर्म, सीतेची पतिव्रता, असे परोपरीने आपल्या स्वधर्म निष्ठेचे

पालन याच कांडात विशेषत्वाने दिसते. केवट- निषादराज गुह, चित्रकूटवासी कोळी- किरात – भिल्ल यांचे निर्लोभी, नि:स्वार्थी , निरलस प्रेम इथेच खऱ्या अर्थाने साकार होते. जनक व वसिष्ठांसारखे ब्रह्मर्षि भरताच्या रामस्नेहापढे हार पत्करतात ती याच अयोध्याकांडात अन् शेवटी रामसेवकातला असा भरत नि:स्वार्थी ठेव म्हणून राज्य प्राणपणाने सांभाळणारा राजा एकाचवेळी ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या चारी धर्माचे आचरण समतोलतेने आचरतो.

अशा प्रकारे रामाला श्रध्दा, विश्वासपूर्वक हृदयात ठेवून रामांच्या पादुकांच्या साक्षीने अयोध्येचे यथायोग्य पालन करण्यात समर्थ ठरतो- अशा अयोध्या कांडाचे प्रतिनिधित्व करणारा हा दुसरा श्लोक. हाही अनुष्ठुभ् छंदातील श्लोक रामानुमन करणारे भरत-चरित्र ठळकपणे लक्षात आणून देतो.

*वन्दे बोधमयं नित्यं गुरुं शंकर रुपिणम् ।*

*यमाश्रितो हि वक्रोऽपि चन्द्र:सर्वत्र वन्दयते ।।३।।*

सरलार्थ –

ज्यांचा आश्रित झाल्याने वाकडा चंद्रसुध्दा सर्वत्र वंद्य झाला. त्या शंकररुपी ज्ञानमय गुरू महाराजांना मी नित्य वंदन करतो.

गुढार्थ –

*अज्ञान तिमिरांधस्य ज्ञानांजन शलाकया ।*

*चक्षू:उन्मिलितंयस्य तस्मै श्री गुरवे नम: ।।*

शिष्याचे अज्ञान दूर करून त्याचा ज्ञानचक्षू उघडणारे असे ते सद्‌गुरु ‘हृदय वि-लोचन विमल उघडती।’ त्याच्या शिष्याच्या हृदयातील विशेष लोचन उघडून देऊन त्याला विमल -निर्मळ बनविणारे ते सद्‌गुरु-त्यांना वंदन. ते सद्‌गुरु ज्ञान-वैराग्य-भक्तीरुप असे जणू साक्षात शंकरच असतात. शंकर जसे महान उदारपणे वक्र चंद्राला आपल्या मस्तकी धारण करतात तसे सद्‌गुरु वक्रबुध्दीर्च्या आपल्या शिष्याला विमल बनवून त्याला गौरवास्पद बनवितात. असे गुरु ब्रह्म जाणणारे, ब्रह्मज्ञानी, ब्रह्मनिष्ठ वा श्रोत्रिय असल्याने ते नित्य, अविनाशी असेच असतात. कारण गुरु ही व्यक्ति नसून ते तत्व रुपच असतात.

अशा वक्र शिष्यालाही गुरु आपणासारिखे करिती तात्काळ असे असल्याने नंतर (कालांतराने) तो शिष्यही सर्वत्र वन्द्य होतो. (उदा. रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, रामदास-कल्याण अशी अगणित उदाहरणे देता येतील.)

हा श्लोक अरण्यकांडाचा प्रतिनिधी आहे. अरण्यकांड ही माया मोक्षपुरी असल्याने या कांडात सर्वत्र मायेचाच स्वैर संचार आहे. माया म्हणजे कपट वा नाट्य. इंद्रपुत्र जयंत, शूर्पणखा, मारिच, रावण, खर-दूषण इ. च्या कपटाचे स्वैर तांडव या अरण्य कांडात सर्वत्र दिसते. तर श्रीरामांनी केलेले नरनाट्य सर्वत्र दिसते.सामान्य कामुक राजकुमाराप्रमाणे पत्नी सीतेचा पुष्पशृंगार करणे, राजकुमार या नात्याने अत्रि-अनसूया-अगस्तींचा आशीर्वाद घेणे, सुतीक्ष्णाच्या भक्तीच्या बाललीलांचा आस्वाद घेणे, जटायूंचा पित्यासदृश्य गौरव करणे, शबरीस जनकसुतेचा माग विचारणे इ. या सर्वांवर उपाय सत्संग, महापुरुषसंश्रय सद्गुरु-संत सज्जनांचे मार्गदर्शन म्हणून या कांडाचे शेवटी नारद रामांकडून संत गुण श्रवण करतात. हा ही श्लोक अनुष्टुभ् छंदात असून गुरुचे आणि संतांचेच अनुगमन करण्यात जीवाचे कल्याण आहे हे सूचित केले आहे.

*सीताराम गुणग्राम पुण्यारण्य विहारिणौ ॥*
*वंदे विशुध्द विज्ञानौ कवीश्वर-कपीश्वरौ ॥४॥*

<u>सरलार्थ –</u>

सीतारामाच्या गुणसमूहरुपी पुण्यशील पावन अरण्यात विहार करण्याचा स्वभाव असलेल्या विशुध्द विज्ञानसंपन्न कवीश्वर वाल्मीकी व कपीश्वर हनुमान या दोघांना मी वंदन करतो.

<u>गुढार्थ :</u>

वाल्मीकींनी मरा मरा जपाने रामनामातून सीतारामांच्या गुणसमूहरूपी पवित्र अरण्यात विहार केला तर हनुमानाने अविरत सेवा व दास्य भक्तीने या सीताराम गुणसमूहारण्यात कायमचा मुक्कामच ठोकला. वाल्मीकींनी जे रामायण रचले त्यानुसार रामांना अवतार घेऊन ते प्रत्यक्ष कृतीत सादर करावे लागले तर हनुमंतांनी आपल्या सेवेने रामांना चक्क ऋणीच केले, ते इतके की

श्रीरामांना सीतेसह हनुमंतांच्या हृदयात कायमचे वास्तव्य करणे भाग पडले. हनुमंतांची कृपा झाल्याशिवाय रामांची कृपा होणे शक्यच नाही कारण हनुमंत हे रामव्दारीचे रखवालदार वा पहारेकरीच आहेत.

हा श्लोक किष्किंधाकांडाचे प्रतिनिधीत्त्व करतो. ही काशीपुरी आहे. तेव्हा रामभक्त भगवान शंकरच हनुमानाच्या रूपाने रामसेवेसाठी तत्पर होवून रामकार्य करण्यासाठी याच कांडात प्रवेशले आहेत. हा श्लोकही अनुष्टुभ् छंदातला आहे. तसेच हनुमंत रामानुगामी सतत राहिलेले आहेत, रामकार्यानुगामी आहेत.

*उद्‌भवस्थिति-संहारकारिणीं क्लेशहारिणीम् ।*
*सर्वश्रेयस्करीं सीतां नतोऽहं रामवल्लभाम् ॥५॥*

सरलार्थ –

जगाची उत्पत्ती-स्थिती व संहार करणारी, क्लेशांचा विनाश करणारी, सर्व प्रकारचे श्रेय-मंगल-कल्याण करणारी व रामास अत्यंत प्रिय असणारी जी सीता तिला मी वंदन नमन करतो.

गुढार्थ –

परब्रह्म परमात्मा राम त्यांची आदिशक्ती आदिमाया अशी ही सीता आहे. परमात्म्याच्या अधिष्ठानावर वा सानिध्यानेच ही या समस्त विश्वाचे उत्पत्ती पालन व संहारही करते. अविद्या किंवा अज्ञान, अहंकार, विषयासक्ती, व्देष व अभिनिवेश म्हणजे मरणभय असे पांच प्रकारचे प्रमुख क्लेश नष्ट करणारी अशी ही शक्ती आहे. (अविद्याऽस्मिता रागव्देषाभिनिवेशा: पंचक्लेशा:।) अशी ही आदिमाया आहे. हीच परमात्म्याची आल्हादिनी शक्ती होय. सर्व प्रकारचे श्रेय देणारी म्हणजे लौकिक व पारलौकिक सुखानंद देणारी अशी ही सीता आहे. सीताचा अर्थ सर्वकारण, सर्ववर्णात्मक, पुष्टीदायक, क्षोभ नष्ट करणारी, वाक्प्रसाद देणारी, निर्मलत्व-धनधान्यादि संपत्ती-ऐश्वर्य देणारी, मृत्युपासून सोडविणारी, सर्वव्यापक व शरणागतास जवळ ओढून घेणारी (आश्रयदायी) असा आहे. तसेच ही रामास अत्यंत प्रिय व राम तर हिला प्राणाहून प्रिय, त्यामुळे हिच्या कृपेनेच रामभक्ती मिळते हेही इथे सुचविलेले आहे.

हा श्लोक सुंदरकांडाचा प्रतिनिधी आहे. हनुमानाने हिच्या अमोघ आशीर्वादाच्या बळावरच लंका दहनाचा पराक्रम केलेला दिसतो. रामासमोर विप्ररुपाने जाणारा हनुमंत सीतेस सामोरे जाताना सूक्ष्म किंवा लघुरुपाने-स्वरुपाने प्रगट होतो अन सीतेकडून 'अजर अमर गुणनिधि सुत होशील बहुत कृपा रघुनायक करतील' हे सुंदर आशीर्वाद मिळवतो. जणू राम सीता-मीलनाचा सेतू बनलेले हनुमान ह्या सीतेच्या अलौकिक वरदानांमुळे नवविधाभक्तीतील प्रत्येक भक्तीचे शिरोमणी बनून रामस्तुत रामऋणी असे बनले आहेत.

सीता म्हणजे शांती, (ज्ञानोत्तर दृढ) भक्ती अशा निर्भरा भक्ती शिवाय राम प्राप्ती होतच नाही म्हणून या कांडाच्या मंगला चरणात 'निर्भरा भक्ती'च तुलसी दास मागताहेत.

*यन्मायावशवर्ति विश्वमखिलं ब्रह्मादिदेवाऽसुरा।*
*यत्सत्वादमृषेव भाति सकलं रज्जौ यथाऽहेर्भ्रम: ।।*
*यत्पादप्लव: एक: एव हि भवाम्बोधेस्तितीर्षवताम्।*
*वन्देऽहं तमऽशेष-कारण परं रामाख्यमीशं हरिम् ।।६।।*

सरलार्थ –

सगळे विश्व आणि ब्रह्मादिक सर्व देव व असुर सुध्दा ज्यांच्या मायेला वश होवून वर्ततात-वागतात, ज्यांच्या सत्तेवर-अधिष्ठानावर, दोरीवर सर्प भासावा तसे हे सगळे खरे असल्यासारखे वाटते-भासते आणि संसाररुपी सागर तरून जाण्याची इच्छा असणारांस ज्यांचे पायरुपी एकच एक तराफा-जहाज आहे, त्या सर्वकारणातीत असलेल्या ईशाला, राम नावाच्या हरीला मी वंदन करतो.

हे संपूर्ण विश्व परब्रह्मावरच अधिष्ठित वश असते. त्या भगवंताच्या मायेच्या तंत्राने अगदी ब्रह्मदेवापासून महेशादिपर्यंत-रावण इ. राक्षसांपर्यंत सारे त्याच्या तालावरच नाचत- वागत असतात. रामाच्या –परब्रह्माच्या पारमार्थिक-सत्य-एकमेव सत्यावरच ही सर्व विश्वातील प्रातिभासिक वा व्यावहारिक सत्ता चालते. हे सारे विश्व-त्यातले त्रिगुण, पंचभौतिकता व त्यावर आधारित सारे खरे

वाटते, दिसते, अनुभवासही येते पण ते अंतिम सत्य नव्हे. खोटे देखील सत्याच्या (खऱ्याच्या) आधाराशिवाय टिकून राहू शकत नाही या नियमानुसार त्या अंतिम एकमेव सत्यावरच ही सर्व दिसणारी-भासणारी-भावणारी सृष्टी अवलंबून आहे. म्हणून या भुलवणाऱ्या भासमान दुनियेतून पार जायचे असेल त्या अंतिम सत्याप्रत तर केवळ रामांना शरण जाण्याखेरीज दुसरा कोणताही तरणोपाय नाही. कारण ते अशेषकारणपरं-म्हणजे सर्व कारणांहून पलीकडे असलेले जे ब्रह्मादि स्थावरांत सृष्टीचे मूळ कारण असून ज्यांना काही कारण नाही असे ते स्वयंसिध्द आहेत.

हा श्लोक लंकाकांडाचा प्रतिनिधी आहे. रामेश्वररुपी सदगुरुची कृपा होताच, भगवंताची कृपा होवून अंगदाप्रमाणे जीव-शिवाची ऐक्यता घडण्यास शिष्टाईप्रमाणे प्रारंभ होतो. मेघनाद-कुंभकर्ण-रावणरुपी लोभ-मोह व अभिमान यांच्याशी युध्द करण्याची प्रबलता अंगी येते. बिभीषणासारख्या सज्जनांच्या सत्संगाने विषयासक्ती दूर होवून भक्ती शरणागतभावाने दृढावते व शेवटी षड्रिपूंवर विजय मिळवता येतो, तरीही भक्तीची प्राप्ती होण्यासाठी साधनेचे अग्निदिव्यच अत्यावश्यक आहे.ध्यान-मानस पूजा, जप, पारायण,भजन इ.ची नियमितता नित्यता चिकाटीने निभावणे हे अग्निदिव्याइतकेच अशक्यवत् कठीण आहे. हे जर साधले तरच रामप्राप्तीचे अंतिम ध्येय शक्य आहे. अशा प्रकारे शांती वा भक्तीरुपी सीतेच्या कृपेनेच रामप्राप्ती होते.राम शार्दुलाच्या विशेष क्रिडेने सारे विश्व वश होवून क्रिडा करते हे सहजपणे शार्दूलविक्रीडित वृत्ताच्या वापराने सहज सूचित केले आहे.

*नाना पुराण निगमागम संमतं यद् ।*
*रामायणे निगदितं क्वचिदन्यतोऽपि ॥*
*स्वान्तःसुखाय तुलसी रघुनाथ गाथा।*
*भाषानिबन्ध मतिमंजुलमातनोति ॥७॥*

सरलार्थ –

नाना पुराणे वेद व षड्दर्शनादि-आगम यांना मान्य असलेले जे रामायणात वर्णन केलेले आहे ते घेवून व क्वचित दुसऱ्या ठिकाणचे घेवून

तुलसीदास स्वत:च्या अंत:करणाच्या सुखासाठी अतिसुंदर रघुनाथ कथा निबंधाची अतिसुंदर रचना करीत आहे.

गूढार्थ –

तुलसीदासांनी वेद,पुराणे व वाल्मीकी रामायणांपासून त्यांच्या काळापर्यन्तच्या सर्व रामायणातील कथा अतिसुंदर, मंगल, उदात्त अशी वर्णने एकत्र करून सर्वसमावेशक सर्वसमन्वयात्मकरित्या एकत्र गुंफली. ज्ञान-योग व भक्ती यांचा सुरेख त्रिवेणी संगम साधून भक्ती कशी प्रधान आहे तेही रामांच्या सगुणलीलादि वर्णनांनी बिंबवले. नाट्य व महाकाव्य यांचे एकत्रीकरण करण्याचा अनुपम, अभिनव सुंदर प्रयोग सिध्द केला. यामध्ये कपोलकल्पित कांहीही नाही. उलट 'रचुनि महेश मानसी राखिती । सुसमय मिळतां शिवेस भाषिती। यास्तव रामचरितमानसवर हृदिं हेरुनि दे नाम हर्षि हर ।' असे श्री शंभूरचित रामायणच तुलसीदासांनी स्वभाषाबध्द केले. ते केवळ-आत्मसुखासाठी, प्रसिध्दी वा लोकप्रियतेसाठी नव्हे. हे अगदी सुस्पष्ट करून ठेवले आहे.

हा श्लोक उत्तरकांडाचा प्रतिनिधी आहे. त्यामुळे रामचरित्रानंतर यामध्ये काकभुशुंडी चरित्रांतर्गत ज्ञान-भक्ती यांची सविस्तर चर्चा आहे. वेद-पुराणे व रामायणे यांचे सारभूत असे अनेक तत्त्वज्ञानाचे संकलन इथे आढळते. बालकांडात जी जी प्रमेये वा प्रश्न आहेत त्यांची सर्व सविस्तर उत्तरे येथे मिळतात. असे यथार्थ नावही या कांडाचे 'उत्तरकांड' असे आहे.

तर या श्लोकाचे वृत्त वसंततिलका आहे. श्रीरामाची भक्ती पूजा त्यायोगे त्याचे हृदयसिंहासनावर विराजमान होणे हाच जणूं वसंत ऋतूतील उत्तम तिलक-चंदनाचा टिळाच नाही कां? ऋतूनां कुसुमाकर: असा ऋतूराज वसंत हीच भक्तीची मुकुटता शिरोधार्यता इथे सहजी गोस्वामी सिध्द करून देतात कारण तो चंदनाचा टिळा-साक्षात रघुनाथांनीच तुलसीदासांना लावल्याचा त्यांचा साक्षात आत्मानुभवही सहजपणे यात गुंफला आहे. 'चित्रकुटके घाटपर भई संतनकी भीर। तुलसीदास चंदन घिसे तिलक देत रघुवीर।

प्रदीर्घ मंगलाचरण।

संस्कृत मंगलाचरणानंतर पाच सोरट्यात अनुक्रमे गणेश, विष्णू, शेषशायी नारायण, शंकर आणि सद्‌गुरु या पंच देवतांना तुलसीदास वंदन करतात. बुध्दिदेवता स्मरणमात्रे सिध्दी प्रदान करणारा म्हणून गणेश, विष्णू वा नारायण रूपात राम अवतरतात, म्हणून त्यांना वंदन व तुलसीदासांचे माता-पिता प्रभू गुरू असे सर्वस्व असणारे म्हणून शंकरांना अन् आत्मस्थ ईश्वराचे दर्शन घडविणाऱ्या सद्‌गुरुंना ते वंदन करतात अन् लगेचच आत्मानुभवावर आधारित असा सद्‌गुरू महिमा गातात. गुरू चरण धुळीस अमृत-चूर्ण, शंकराच्या अंगावरील भस्म असे त्याचे महत्व वाढवीत त्या चरण-धुळीने आपल्या (शिष्याच्या) मनाचा आरसाही स्वच्छ निर्मल होतो असे ते सांगतात. अशा निर्मल मनाने गुरुचरण कमलांवर मस्तक नमताच त्या कमल पराग स्पर्शाने शिष्यात आमूलाग्र बदल होतो व तो ज्ञानाच्या सात भूमिका पार करून (सद्‌वासना, सुविचारणा, तनुमानसा,सत्वापत्ति, असंसक्ति,पदार्थाभाविनी व तुरिया) रामरति प्राप्त करून घेतो कारण गुरूंच्या ध्यानाने त्यांच्या पदनखाचे ठायी दिव्य प्रकाश-ज्योती दिसल्याने शिष्याचे ज्ञान चक्षू उघडतात. अन् त्या ज्ञानप्रकाशाने त्याचा समस्त अज्ञानरूपी अंधार दूर होवून त्याचे हृदय दिव्य प्रकाशाने भरून जाते. अन् आजवर गुप्त असलेले वेद-पुराणे-इतिहास इत्यादीव्दारे राम-चरिताचे गूढार्थ आपोआप उलगडत जातात.

पृथ्वीवरील देव-ब्राह्मण (वेदाचरणी) संत-सज्जन यांना वंदन, कारण हे संत म्हणजे चालते बोलते प्रयाग तीर्थराज होत. त्यांचे ठिकाणी रामभक्तीरुपी अखंड वाहणारी गंगा, विधिनिषेध पाळणारी यमुना व गुप्तरुपाने ब्रह्मज्ञानरुपी सरस्वती असून धर्मावर असणारा अढळ अटल विश्वास हाच जणू अक्षय्य वटवृक्ष आहे अन सतत मुखात असणाऱ्या हरि-हर कथा की ज्यामुळे समग्र विश्वाचे नित्य कल्याणच होत असते अशी त्रिवेणी शोभायमान असते. अशा सत्संगाचा अपार महिमा वेदांपासून सारेच गातात कारण 'विण सत्संग विवेक न

होतो । रामकृपेविण सुलभ होतो। सत्संगती मुद-मंगल मूलहि।ती फल सिध्दि साधने फुलहि।'

खल म्हणजे दुष्टांसह सर्व विश्वास गोस्वामी वंदन करतात कारण त्यांची दृढधारणा- 'सितारामय सब जग जाणुनि। करतो प्रणति पाणियुग जोडुनि।' अशी आहे. मी अल्पमती अगाध अपार अशा रघुपतीचे चरित्र गाणे हे धाडसच आहे. पण' बोल बोबडे बालक बोलति। माता पिता मुदित मन ऐकति '। या भावनेने मी हे राम-चरित्र गान मांडले आहे.' यामधि रघुपति नाम उदार । श्रुति-पुराण अति पावन सार।' हे सर्वात प्रमुख आहे. आद्यकवी वाल्मिकींपासून कलियुगातील कवींपर्यंत ज्यांनी ज्यांनी राम-चरित्र गान केले आहे त्या सर्वांना मी वंदन करतो.

## श्रीराम धाम व परिवारादिंना वंदन –

गोस्वामी तुलसीदासांच्या श्रीराम चरितमानसात अध्याय विभागणी नाही. परंतु याच ग्रंथाचा प.पू.प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींनी जो समवृत्त समच्छंद अनुवाद केला आहे त्यामध्ये अध्याय आहेत. त्यानुसार बालकांड अध्याय ३ मधील दोहा १८ अखेर हे श्रीराम धाम व परिवार यांना वंदन केले आहे.

प्रथमत: अयोध्यानगरी 'सुपावनी' म्हणजे अत्यंत परम पवित्र समजून तिला वंदन केले आहे. कारण या सूर्यवंशी सर्वही राजांची ही राजधानी होती अन् या कुळातील सर्वच राजे शूर वीर, धर्मशील व ज्ञानी आणि हरिभक्त असल्यानेही अ-योध्या म्हणून कोणालाही युध्दात जिंकण्यास अशक्य आणि पवित्र अशी असल्याने तिला वंदन करणे क्रमप्राप्तच आहे. परब्रह्म परमात्मा रामरूपात अनेक कल्पे व युगातून सगुण साकार रूपे तिथे अवतरित झाल्याने ती सु-पावनी परम पावनी अशी आहे.

त्यानंतर शरयू नदीस प्रणाम केला आहे कारण तिचा उगम 'कैलास पर्वते राम मनसा निर्मित सर: ब्रह्मरसस्रावी ' असा मानस सरोवरातून आहे. हे मानस सरोवर म्हणजे कैलास पर्वतावरील भगवान शंकराच्या मनातून परमात्मा श्रीरामांबद्दल जो ज्ञान भक्तीरसपूर्ण ब्रह्मरस स्त्रवला तेच किंवा शंकराच्या मनरुपी मानस सरोवरात ज्या रामकथेचा स्त्रोत निर्माण झाला त्यापासून उगम पावलेली

ही शरयू-सरिता! त्यामुळे ती आपल्या या कलिजन्य सर्व दोष-पाप यांचा समूळ विनाश करणारी असल्याने तिला वंदन.

अयोध्यावासी सर्व स्त्री-पुरुषांना वंदन. कारण श्रीरामांचे (व सर्वच सूर्य वा रघुकुळातील राजांचे) या आपल्या प्रजेवर, पुत्रवत् किंबहुना आपल्या प्राणांपेक्षाही प्रेम होते. त्यासाठी सीतेच्या निंदकांनाही क्षमा करून श्रीरामप्रभूंनी सर्वांचे शोकहरण करून स्वत:बरोबर या सर्व अयोध्याजनांना आपल्या साकेत-धामी प्रेमाने नेवून बसविले.

पूर्व दिशेला जसा सूर्याचा उदय होतो तसेच जणूं पूर्व दिशारुपी कौसल्या मातेच्या अंकावर (मांडीवर) श्रीरामांचे-परब्रह्मांचे सगुणरुपाने प्रागट्य झाले म्हणून राममाता असा गौरव वा किर्ती प्राप्त कौसल्येला वंदन. कारण अयोनिजा वा अनादि अशा परब्रह्माची (रामाची) माता होण्याचे परमभाग्य तिला लाभले अन त्यामुळे तिची किर्ती त्रैलोक्यात भरून राहीली आहे. विश्वाला सर्व प्रकारचे सुख, चंद्राप्रमाणे शीतलता-आल्हादकता व प्रसन्नता देणारे सुंदर रामचंद्र तिच्या ठायी प्रगट झाले आणि विश्वाला छळणाऱ्या दुष्ट रावणरुपी चंद्रविकासी कमलाचा सूर्यवंशात येवून आपल्या सूर्याप्रमाणे प्रखर (ज्ञान-शौर्य-तेजाने) किरणांनी त्याचा नाश केला.

दशरथांसह सर्व राण्यांना वंदन. कारण हे सर्व अत्यंत शुभ, पुण्यकारक व मंगल म्हणजे हितकल्याणकारक आहेत. तुलसीदास म्हणतात, काया-वाचा मनसा सर्वांना माझे दोन्ही हात जुळवून प्रणाम, त्यांनी मला आपला सेवक वा पुत्र समजून मजवर कृपा करावी. लौकीकार्थाने विचार करतां प्रत्यक्ष परब्रह्माचे माता-पिता म्हणून यांची निर्मिती करण्यात ब्रह्मदेव स्वत:स धन्य मानत असेल. असा यांचा अमर्याद महिमा आहे.

त्यातल्या त्यात दशरथांना तर खास वंदन. कारण त्यांनी आपले रामपदींचे प्रेम खऱ्या अर्थाने सिध्द केले, इतके की राम-विरहात आपली अत्यंत प्रिय असलेली ही काया (तनु-देह) गवताच्या काडीप्रमाणे-कस्पटासमान समजून त्याचा सहजी त्याग केला. असे त्या दीनवत्सल, दीनदयाल रामांबद्दलचे यांचे हे निस्सीम प्रेम होते !

विदेह राजा जनक यांचे तर रामांवर गूढप्रेम होते कारण ते निर्गुण निराकार परब्रह्माचे उपासक असलेने ते श्रेष्ठ प्रतीचे योगी-ज्ञानी होते. त्यामुळे त्यांची सगुण श्रीरामांवरील रामचरणींची रति सहजपणे कोणाला कळत नसे, कारण त्यांनी ही आपली रामप्रिती वा भक्ती राजैश्वर्यात राजयोगात गूढ रीतीने लपवून ठेवली होती. त्यांच्यासह समस्त मिथिलावासी यांचेही रामपदी अतीव प्रेम होतेच.

भरत म्हणजे रामप्रेमाची वा रामस्नेहाची सजीव (ओतीव) मूर्तीच होय! त्यामुळे गोस्वामींनी त्यांच्या भरत चरणांना प्रणमन केले आहे. कारण राम वियोगात त्यांनी जी व्रते नियम आदींचे आचरण केले होते त्याचे वर्णन करण्यास वाणी अपुरी आहे. ऋषीमुनी देखील त्यांच्या या व्रतस्थेपुढे लाजत असत. या भरताचे मन जणूं रामचरणरुपी कमळाचे आत सतत रामभक्तीरसपान करण्यात लुब्ध-मग्न-रत असते. एक क्षणही ते रामचरण सोडत नाही म्हणून भरत वंदनेत तुलसीदासांनी दोन चौपाया खर्ची केल्या आहेत.

तसेच लक्ष्मणांच्याही चरण कमलांना गोस्वामी वंदन करताना म्हणतात- ''लक्ष्मण ज्ञान,भक्ती व वैराग्याच्या ऐश्वर्याने परिपूर्ण असे शीतल व भक्तांना सुखावह असे आहेत. रघुपतींची विमल कीर्ती पताका (ध्वजा) ज्या दंडावर (काठीवर) सदैव फडकत राहते तो दंड म्हणजे हे लक्ष्मण होत.'' म्हणजे रामाशिवाय लक्ष्मण ही कल्पनाच टिकू शकत नाही. तसेच ज्या ओढीने प्रेमादरपूर्वक ध्वजाकडे लक्ष जाते, तितकेच या दंडाकडे मात्र कुणाचेच लक्ष जात नाही, असे प्रभुच्या किर्तीपुढे आपलेकडे सर्वांचे दुर्लक्ष व्हावे असा त्यांचा विनीत शरण्य व सेवकभाव असल्याने सर्व जगाचा आधार असणाऱ्या शेष अवतारी-उदार लक्ष्मणांना हे वंदन! असा हा सर्व सद्‌गुणांचे आकर (आगार-खजिना) असणारा व कृपेचा सागर अशा सुमित्रानंदन लक्ष्मणास प्रणिपात!

अत्यंत शूर, सत्शील म्हणजे चारित्र्यवान व सुस्वभावी आणि भरताचे अनुगमन करणाऱ्या शत्रुघ्नास नमन. आपला शत्रू जो अहंकार त्याचे निर्दालन केवळ यांच्या स्मरणाने होते कारण रामसेवकाचे (भरत) ही हे सेवक. त्यामुळे अशा सेवेतून सारा अहंभाव आपोआप गळून जातो म्हणून हे शत्रुघ्नांना नमन!

त्यानंतर ऋजू-विद्या-दान-कृपा-युध्द व विनय अशी श्रीरामांप्रमाणे सहाही वीरता असणारे महावीर हनुमान यांना विनयपूर्वक वंदन, कारण श्रीराम स्वत: आपल्या मुखाने यांचे कीर्तीगान करतात. हे दुष्टांचे निर्दालन करणारे, स्वत: आत्मज्ञानी आणि प्रेमादरपूर्वक आपल्या हृदयात धनुर्धारी रामांची सदैव स्थापना करणारे असे आहेत म्हणून त्यांना खास वंदन. दुसरे असे हे रामव्दारावर सदैव पहारेकरी वा रक्षक असलेने त्यांच्या कृपेशिवाय रामकृपा होतच नाही तेव्हा यांची वंदनाही अतिशय अनिवार्य आहे.

जे कपि व अस्वलादि सर्व समाजाचे स्वामी वा राजे होते त्या सुग्रीवांना वंदन. कारण ते राम-सखा होते. शिवाय माकडासारख्या अधम योनीत जन्माला येवूनही यांनी रामसेवा तन-मन-धनपूर्वक केल्याने त्यांना रामप्रद प्राप्त झाले. त्याचप्रमाणे जटायुसारखे पक्षी, मारिचासारखे पशु, सर्व देव, बिभीषणासारखे राक्षसकुळातील आणि गूहक-केवट अशा हीन मानवांनाही वंदन. कारण या सर्वांनी मनोभावे रामसेवा, रामोपासना केली तीही निष्काम वृत्तीने, म्हणून श्रेष्ठ रामभक्त वा रामसेवकांत त्यांची गणना झाली म्हणून त्या सर्वांना माझे प्रणमन!

शुकदेव, सनक-सनंदन-सनातन-सनतकुमार, नारद व अनेक पंडित, ज्ञानी-योगी –सिध्द श्रेष्ठ ऋषी इ. सर्वांना वंदन. कारण हे सारे निर्गुण-निराकार परब्रह्म तत्वरुपाने रामांना जसे जाणतात. तसेच सगुण-साकार रुपातही जाणून मोठ्या भक्तीभावाने त्यांचे पूजन-स्तवनही करतात म्हणून या सर्वांना माझे प्रणिपात, कारण अशा या ऋषी-मुनींवरांमुळे श्रीरामभक्ती त्रिभुवनात सदैव विमल यश पसरवीत आहे. असे हे ज्ञानी भक्त श्रीरामांना अतिशय प्रिय आहेत म्हणून त्यांना विशेष वंदन!

आता जी आदिमाया, आदिशक्ती वा समस्त जगताची माता अशी जनककन्या सीता तिला मी वंदन करतो कारण ती श्रीरामांना अतिशय प्रिय आहे तसेच तिला श्रीराम अत्यंत प्रिय आहेत. तिची कृपा झाल्याशिवाय आपले पंचक्लेश (अविद्या, अहं, आसक्ती,व्देष व मृत्युभय) निवारण होत नाही. अन् ते झाल्याशिवाय नि:श्रेयस वा कल्याणाचा मार्ग खुला होत नाही कारण श्रीरामांची स्थापना जेथे व्हायची ते स्थान निर्मल-विमल-स्वच्छ-सुंदर-मृदु-

मुलायम हवे नां? सीतेच्या कृपेनेच हे सारे शक्य होते म्हणून तिला वंदन. अन् त्यानंतर आता प्रभु श्रीरामचंद्रांना प्रणमन-नमन-वंदन कारण ते कमल नयन, हाती धनुष्यबाण घेणारे, त्याव्दारा भक्तांची संकटे दूर करून आपल्या कृपादृष्टीने भक्तांना सर्व प्रकारची सुखे (भुक्ती मुक्तींच) दायक असे आहेत.

किंबहुना रामाला वंदन केले की सीतेला पोहोचते अन सीतेला नमन म्हणजे रामांना नमस्कार. हे कसे तर, जसे शब्द उच्चारताच जसा अर्थ त्यात गृहीतच असतो किंवा पाणी व पाण्याची लाट यात जशी अभिन्नता असते तसे राम व सीता यांत अभेद वा एकरुपता आहे. ज्यांना हीन-दीनं असे आपले भक्त अत्यंत प्रिय आहेत अशा राम व सीता यांच्या चरण कमलांना मी नमस्कार करतो, नमन, वंदन, प्रणमन करतो. राम हे परब्रह्म व सीता ही त्यांची विद्या माया असलेने त्या दोघांत भिन्नता कशी ती नाहीच. उलट राम म्हणजेच सीता व सीता म्हणजेच राम इतकी एकरसता, एकरुपता, एकवाक्यता या दोघांत आहे. म्हणून उभयतांना माझे काया-वाचा-मने-सर्वस्वभावे समर्पणपूर्वक नमन !

रामांच्या आधाराशिवाय सीता राहू शकत नाही (विश्वनिर्मिती करू शकत नाही) तर सीतेच्या अस्तित्वाखेरीज रामांचे सगुण होणे शक्य नाही. अशा या करुणानिधान श्रीरामप्रभूंना, रामवल्लभा-प्राणप्रिया सीतेसह सादर सविनय भावपूर्ण वंदन!

शरयू वलयांकित अयोध्येतील सर्व जीव व रामस्नेहरुपी भरत, रामप्रभवांकित लक्ष्मण, भक्तानुगामी शत्रुघ्न यांनी सततच्या घेरलेल्या श्रीराम-सीतांना अखंड वंदन!

ज्या ज्ञान-भक्तीपूर्ण वातावरण व संस्कारातून श्रीराम-सीता प्राकट्य झाले त्या दशरथ-कौसल्यादि राण्या व जनक-सुनयनादि मिथिला परिवारास पुनःपुन्हा भावपूर्ण वंदन !

अयोध्येपासून लंकेप्रत जे जे राम सेवेत राम भक्तीत रत झाले त्या सर्वांना रामचरण चिन्हांकितांना सविनय सादर वंदन!

**श्रीरामनामवंदन :**

रघुकुलभूषण रामनामास वंदन, परशुरामास किंवा बलरामास नव्हे.

'राम' मध्ये अग्नि, सूर्य व चंद्र बीज असल्याने या उच्चाराबरोबर सर्व पाप दोष कुवासना जळून जातात व उच्चाराबरोबर चंद्राची शीतलता, आल्हादकता, प्रसन्नता येते. असे राम-नाम ब्रह्मा-विष्णु-महेश सर्व वेद तसेच निर्गुण वा सगुण परब्रह्माचे द्योतक आहे. म्हणून शतकोटी अपार अशा रामायणांचे रामनाम हे सार जाणून स्वतः अनुभवून 'महामंत्र' रुपाने महेशांनी याचा अखंड जप सुरु केला. हलाहल विष पिऊनही या राममंत्राने त्यांना विष + राम = विश्राम दिला. या आपल्या अनुभवाची प्रचिती प्रत्येक जीवमात्रास देण्यासाठी त्यांनी विश्वेश्वर बनून काशी हे आपले कार्यक्षेत्र निवडले अन् तेथे मरणाऱ्या प्रत्येक जीवास त्या राम-महामंत्राने मुक्ती देण्याची अव्याहत रामसेवा सुरु केली. अशा या परम सत्याची उपासना करण्यामुळे तर ते शिवशंकर, शंभू, सदाशिव म्हणून सुंदर बनले.ह्या महामंत्राचा उपदेश प्रथम आपल्या घरी समस्त परिवारावर प्रयोग सफल झाल्यामुळे हा 'विश्व-सुंदर' करण्याचा उपक्रम त्यांनी चालू केला. आपली पत्नी उमा-भवानीला पार्वतीस विष्णू-सहस्त्रनामतुल्य : (सहस्त्रनामतत्तुल्यं राम नाम वरानने! – रामरक्षा) अशा रामनामाने आपली प्रिया व समस्त पतिव्रता स्त्रियांची अग्रज बनविली तर राम-नामास तीन प्रदक्षिणा घालून पृथ्वी प्रदक्षिणेचे फल मिळाल्याने गणपती प्रथम पूज्य बनले. हे राम-नाम उलटे जपून ही वाल्या सारख्या वाटमाऱ्यास वाल्मिकी ऋषी बनविण्याची किमया या राम-नामाने केली.

जोडाक्षर-रहित साधे-सोपे, सुलभ, मधुर,मनोहर म्हणायला ऐकायला व स्मरण करायला सुंदर असे ते राम-नाम आहे. ब्रह्म व जीव, नर व नारायण याप्रमाणे अभेद्य एकजीव अशीही 'रा' 'म' ची जोडी (दोन्ही अक्षरांची) आहे. हे राम–नाम घेणाऱ्यास व ऐकणाऱ्यासही अमृतासमान मधुर शीतल स्वाद व संतोष प्रदान करते. इतकेच नव्हे तर शेष कूर्म जसे पृथ्वीचे रक्षण धारण करतात त्यानुसार हे नामधारक जीवाचे रक्षक व हितकारी बनते. म्हणून हे राम-नाम प्रत्येक राम-भक्ताला अत्यंत प्राण-प्रिय आहे. रामनाम घेताच नामी (म्हणजे हा श्रीराम) निर्गुण वा सगुण रुपाने भक्ताच्या हृदयांत विराजमान होऊ लागतो. नामधारक जितक्या तीव्र, तरल,सूक्ष्म व भावपूर्णपणे हे नाम आपल्या जीभ रुपी उंबरठ्यावर ठेवेल तितक्या प्रमाणात हा रामनाम रुपी मणीदीप किंवा भक्ती

चिंतामणी आंत व बाहेर ज्ञान वैराग्य भक्तीचा प्रकाश व ऊब द्यायला लागेल. रामनाम जपाने ज्ञान, योग, लय काय साधत नाही? सर्व काही साधते. सामान्य प्रापंचिक जीवापासून ब्रह्मसुखाचा अनुभव येण्यापर्यंत मजल मारता येते. आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू व मुमुक्षू सर्व प्रकारच्या भक्तांना, ज्याला जे हवे आहे ते देणारा हा नाम चिंतामणी आहे. निष्काम भावनेने रामप्रेमाने भक्तिरसात आकंठ डुंबून बुडून त्या नामाशी पूर्णपणे एकरुप होऊन जो हे नामामृत पान करेल, तो परम भाग्यवान, कारण त्याचे पुढे प्रत्यक्ष सगुण साकार रूपे त्या मण्याचे मूल्य देण्यासाठी श्रीरामाला यावेच लागेल.म्हणून रामापेक्षाही हे राम-नाम श्रेष्ठ आहे हे शास्त्र,गुरु व आत्मप्रचितीनुसारही सिध्द होते. कसे ते पहा – प्रत्यक्ष रामांच्या चरण-स्पर्शाने एक अहिल्या पावन झाली तर याच नामाने तेव्हापासून आजवर असंख्य जीव उध्दारले आहेत. रामाने एकाच त्राटिकेस मारले, तर या नामाने कित्येक दुष्टांचा संहार करुन त्यांचा आजवर उध्दार केला आहे. शिवधनुष्य रामांनी स्वहस्ते भंजन केले तर या भव म्हणजे प्रपंच रुपी धनुष्याचे नाम सहजी भंजन करते. रामांनी आपल्या पदस्पर्शाने केवळ दंडकारण्य पावन केले तर या नामाने कित्येकांच्या मनातील अरण्यांचे नंदनवन बनविले आहे व अजून पर्यंत हा आनंदोत्सव सुरुच आहे. त्रेतायुगात रामांनी रावणासह समस्त राक्षसी वृत्तींचा नाश लंकेपर्यंत पायी  जाऊन वानरांच्या मदतीने केला तर हे रामनाम कोणाच्याही मदतीविना अगदी सहज सुलभपणे आजही या राक्षस वृत्तींचा बीमोड करीत आहे.

अखंड रामनाम-जपाने श्रेष्ठ ठरलेल्यांची ही यादी-चिताभस्म, नरमुंडमाला, सर्प -असली अमंगलता स्वीकारलेले शंभू याच राम नामामुळे 'मंगलराशी' 'सत्यं शिवं सुंदरम्' बनले. नारद, प्रल्हाद, ध्रुव, सनकादिक, शुक इत्यादी भक्त ऋषी-मुनींची यादी अगणित आहे. **हनुमंताने तर केवळ या जपामुळेच श्रीरामाला वश-स्वाधीन करुन ठेवले आहे.**

विशेषत्वाने कलियुगात अत्यंत प्रभावी असे हे साधन साध्याची प्राप्ती करून जणू 'साध्य'च बनते आहे असे हे अनमोल अलौकिक राम-नाम आहे. कृत किंवा सत्य युगात ध्यान, त्रेतायुगात यज्ञ, व्दापारयुगात पूजा  करुन आपल्या इष्ट उपास्य देवता प्रसन्न करुन घेता येते. तर कलियुगात यज्ञ-कर्म

नको, ध्यान करण्यासाठी विवेक बुध्दिने लागणारी एकाग्रता नको की अखंड पूजेत रमणारे भक्तिमय मन नको केवळ 'रामनाम अवलंबन एकू' असा याचा महिमा आहे. हे नाम नामीमध्ये हळूहळू परिवर्तन कसे घडवीत जाते पहा. प्रथमत: ते अगदी समर्थ सुमती हनुमानासारख्या सत्वशील जीवालाही कपटाने राक्षसीवृत्तींकडे कनक-कामिनींची लालुच दाखवते. परंतु हेच अखंड रामनाम त्या जीवाला त्या हिरण्यापासून बचावून जणू हिरण्यकश्यपूसारखे त्या लोभी-कामी वृत्तीचे पोट फाडून टाकते. अन त्या क्षूद्र देवतांचे रुप घेणाऱ्या आसुरी वृत्तींचा नाश करून प्रल्हादासारखे प्रकर्षाने आल्हादित करून त्या जीवाला भक्तजन 'रामभक्त' बनून त्याचे पालन-पोषण रक्षण वर्धन करीत थेट रामरायाची भेट घडवून आणते.

समजा हा भाव-भक्तिमय प्रवास घडला नाही, कारण भयंकर अशा पापमूल कलीच्या प्रभावाने वा पूर्वजन्मांच्या कुसंस्काराने भक्तीपासून जीव दूर राहीला, तरीही कुभावाने, कुचेष्टेने, आळसाने, चिडून, रागवून, कातावून, वैतागून अगदी त्या रामाला शिव्या देत-त्या भावनेने जरी राम-नाम घेतले तरीही त्या नामातील शब्द (मंत्र शक्ती) त्या जीवाचे कल्याण-मंगल हितच करते. म्हणून या रामापेक्षा श्रेष्ठ असणाऱ्या राम-नाम महाराजांना हे वंदन प्रणमन, दंडवत!

असे हे नाम जसे उदार आहे तेच सारे गुण रामकथेचे व रामांचे आहेत. किंबहुना राम सर्व गुणांची खाण असलेनेच ते रामनाम, कथा, लीला, यश या सर्वांत उतरले आहेत हे नि:संशय! मेघांतून जसा सुखद शीतल पर्जन्य वर्षाव व्हावा तसेच हे गुण क्रमश: नाम, कथा, लीला, यशादित येतात.

मानस सरोवर रुपक –

मानस-सरोवर रुपक-श्री शंकरांच्या मनरुपी मानस सरोवरांत सदैव ही रामकथा तरंग रुपाने विहरत राहते. त्या सरोवरात राजहंस बनून विहरणारे श्रीरामपंचायतन म्हणजेच हे श्रीरामचरितमानस होय. तर हंस बनून काकभुशुंडी राम-भक्ती रुपी मोत्यांचा चारा इथे सदैव घेऊन तृप्त होत असतात.

सरोवरासाठी लागणारी विस्तृत व खोल जागा म्हणजे भक्तीची सखोल

बुध्दी व भक्ताचे उदार हृदय.वेद-पुराणे रुपी समुद्राची वाफ, संतरुपी मेघ बनून राम सुकीर्ती रुपाने भरपूर वृष्टी करते. त्यामुळे ते पाणी मधुर (गोड), मनोहर व विश्वाचे कल्याण करणारे असेच आहे. रामांच्या लीलांच्या सगुण वर्णनाने ते पाणी स्वच्छ बनते. त्यातील वासनांचा सारा मळ धुवून निघतो.भक्ताच्या हृदयातील प्रेम-रस त्यात मिसळल्यामुळे त्याला येणारी अवीट गोडी व शीतलता शब्दात कशी बरे वर्णन करता येईल?

अशा या सरोवरास चार संवादांचे चारी दिशांना चार घाट आहेत. शंकर-पार्वती संवाद--ज्ञान घाट, याज्ञवल्क्य-भारव्दाज संवाद--कर्मघाट, काकभुशुंडी--गरुड संवाद--भक्तीघाट अन् तुलसीदासांचा स्वत:शी संवाद--दीनघाट. प्रत्येक घाटास सात पायऱ्या वा सोपान आहेत. तीच यातील सात कांडे बाल, अयोध्या-अरण्य-किष्किंधा-सुंदर-लंका व उत्तरकांड. त्याच सात मोक्षपुऱ्या होत. अनुक्रमे अयोध्या-मथुरा-माया-काशी-कांची अवंतिका व व्दारावती. रघुपतींचा महिमा ही याची अगाधता खोली आहे. तर रामसीता यांची सुकीर्ती ही या सरोवराच्या पाण्याची गोडी आहे. या ग्रंथातील उपमा म्हणजे या सरोवरावर लहरणाऱ्या मनोहर लाटा होत. यातील घनदाट,सुंदर व रंगीबेरंगी कमळे म्हणजे चौपाया, छंद, सोरठा, दोहे ही वृत्ते होत. या ग्रंथाची भाषा हे या कमलांचे सुगंध,सुंदरभाव हा त्या कमळांतील मध-मकरंद, तर अनुपमेय अर्थ हे कमळांचे पराग-कण होत. सुपुण्याचा ठेवा हे त्या कमळांवर गुंजारवणारे भुंगे होत. तर या सरोवरात विहार करणारे हंस म्हणजे ज्ञान-विवेक व वैराग्य. अर्थाचे गूढार्थ, काव्यजाती व काव्यगुण हे विशेष शोभनीय असे यातील मासे आहेत. अर्थ, धर्म, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ. यातील ज्ञान विज्ञान विचार, काव्यातील नऊरस, जपतप योग वैराग्य हे सर्व या सरोवरातले अनेक प्रकारचे जलचर प्राणी होत. तर यातील संत, सत्संग व राम-नाम गुणवर्णन हे या सरोवरावरून विहरणारे पक्षी आहेत.

या सरोवराच्या चारी बाजूंनी बहरलेली, डंवरलेली, संतसभारुपी आमराई आहे. अन् या आमराईत श्रध्देचा वसंत-ऋतू सदैव वस्ती करुन राहीला आहे. यातील भक्ती, क्षमा, दया यांचे विवरण हे यातील वृक्षलतादी आहेत. आत्मसंयमन व इंद्रियदमन ही याची फुले तर ज्ञान हे या वृक्षाचे (मधुर,

पौष्टीक व फळांचा राजा असणारे) असे ज्ञान-फळ आहे. त्या फळाचा सुमधुर व दाट रस कोणता आहे सांगू? ज्ञानोत्तर भक्ती- 'रामरति' (प्रत्येक क्षणी नव्याने वाढणारी अशी ही अनुपम भक्ती).

रामकथेच्या अंतर्गत येणाऱ्या इतर कथा हे या आमराईतले शुक-पिक (पोपट–कोकिळा–शुकाचार्य–वाल्मीकीसारखे वैराग्य व ज्ञानोत्तर भक्ती संपृक्त) मनोहर रंगांचे पक्षी, अंगावर फुलणारे रोमांच या वृक्षराजीतल्या बागा-वाटिका, तर या कथेचे श्रवण-सुख म्हणजे यात विहरणारे विहंगम मार्गी संत. या बागेचा माळी आहे सु-मन (शुध्द मन), हा माळी आपल्या प्रेमाश्रूंनी ही बाग फुलवित राहतो. या सरोवराचे चतुर रखवालदार आहेत सावधपणे रामकथा गाणारे गायक. अन् सरोवराचे पाणी प्राशन करणारे अधिकारी प्रेमादर पूर्वक कथा ऐकणारे सावध श्रोते-अगदी सामान्य मानवांपासून श्रेष्ठ देवांपर्यंत सारे!

कामी, दंभी, दुष्ट असे विषयलोलुप दुर्भागी या मानस-सरोवराजवळ येतच नाहीत. कारण त्यांना आवडणाऱ्या कामी, विषयी, सुरंगी कथा यात नाहीतच. त्यामुळे अशा सात्त्विक तीर्थाप्रत यायला ते प्रथम कचरतात, भितातच कारण इथवर येणे इतके काही सोपे नाही. अतिशय अवघड कठीण आहे.ज्याच्यावर राम-कृपा असते तोच इथवर येऊन पोचू शकतो. कारण हा मार्ग अत्यंत उंच,खडा त्यामुळे अत्यंत खडतर दुर्गम असा आहे.वाटेत, वाघ, सिंह, हत्ती, सर्पासारखे (षड्विकार) अनेक भयंकर प्राणी आहेत. घरची कामे वा घराचा मोह हे मोठे जंजाळ किंवा दुर्गम पर्वतासारखे पार करुन इतक्या उंच व दूरवर येतो कोण? मोह-मान मदादिंचे घनघोर अरण्य,संशय कुतर्काच्या सारख्या तुडुंब वाहणाऱ्या हिम नद्या, या सगळया अडथळयांची शर्यत पार करून येथवर येणारा भाग्यवानच म्हटला पाहिजे.

असा भाग्यवान कोण ठरतो, तर ज्याचेजवळ श्रध्देची शिदोरी आणि संतांसारखे सहप्रवासी आणि रघुनाथाची अपरंपार प्रीती-भक्ती-ओढ आहे तोच हा इतका प्रदीर्घ उच्च प्रवास करून परमोच्चीचे मानस सरोवर व परमोच्च कैलासाप्रत येऊन पोचतो. परंतु इथे येताच निद्रा(झोप) वा थंडी त्याला जी हुडहुडी भरते त्यामुळे तो सरोवराच्या काठी पोचूनही ना त्या पाण्याला स्पर्श करु शकत, मग कुठले मार्जन, मज्जन (स्नान)! त्यामुळे तो जसा आला तसा परत जातो, उलट आपला वृथा अभिमान मात्र घेऊन परत जातो.त्यामुळे त्या

पवित्र तीर्थ इत्यादींची कुचेष्टा निंदा करुन प्रश्नकर्त्यांना थोपवितो.

म्हणून खरा मनापासून जो राम प्रेमाने न्हातो तोच या रामचरित-मानसाचे दर्शन-स्पर्श, मज्जन व पान करणारा भाग्यशाली ! (म्हणजे लौकिक मानस–सरोवराची यात्रा करणाऱ्यापेक्षा या राम चरित मानसात अवगाहन करणारा खरा ''तीर्थ यात्री'' होय.)

<u>शरयू रुपक –</u>

याच मानस-सरोवराच्या स्रोतापासून निघते, उगम पावते ती शरयू नदी होय. रामांच्या निर्मल कीर्तीरुपी पाण्याने ही नेहमी भरलेली असते. लोक-जनमत व वेदमत असे हिचे दोन किनारे होत. कलियुगातील मालिन्यरुपी वृक्षाचे समूळ नाश करुन टाकणारी अशी ही पवित्र नदी आहे. हिच्या काठी असणारी शहरे, गाव, खेडी म्हणजे उत्तम, मध्यम, नीच असा त्रिविध श्रोतृ-समाज होय. परंतु अयोध्येतून वाहताना मात्र ती जणूं अनुपम अशा सर्व मंगलांचे मूळ असणाऱ्या अशा संत सभेजवळूनच वाहते. पुढे गंगेस मिळताना रामभक्ती घेऊन मिळते त्यामुळे रामयशाने ती अधिकच मनोहारी दिसू लागते. विश्वामित्र यज्ञ रक्षणाचे वेळी राम-लक्ष्मणांनी सुबाहू-मारिचादी राक्षसांशी केलेले युध्द हा शोभिवंत महानद शोण तिला येऊन मिळतो. शरयू गंगा व शोण असा त्रिविध जलप्रवाह म्हणजे ज्ञान भक्ती व वैराग्य मिळून जणूं रामरुपी सागरास जाऊन मिळतो. मूळ मानस सरोवर हा तिचे उगम स्थान असल्याने जिथे जिथे म्हणून ही रामकथारूपी शरयू जाते तिथे तिथे श्रोत्याचे मन पवित्र करुन त्यास ती रामभक्त बनविते.

या रामकथेतल्या चित्रविचित्र अनेक कथा या हिच्या तीरावरील अनेक बागा, उद्याने आहेत. शिव-उमा विवाह प्रकरणातले वऱ्हाडी म्हणजे या नदीतले जलचर प्राणी होत. तर रामजन्म अभिनंदनोत्सव म्हणजे या नदीवरचे मनोहारी तरंग नृत्य होय. चारी बंधूंच्या बाललीला म्हणजे या सरितेतील चौरंगी प्रफुल्ल कमळे होत. (कमळांचे ताटवे). राजमाता ह्या त्या कमळांवरचे भ्रमर तर राजवाड्यातील परिजन हे नदीतील जल-पक्षी! सीता स्वयंवर कथा म्हणजे नदीत पडलेले सुंदर छबीचे प्रतिबिंब! या संवादातील उत्तम प्रश्न त्या सरितेतील

नांवा आणि त्या प्रश्नांची उत्तरे म्हणजे त्या नावेचे नावाडी, तर या प्रश्नोत्तरांची चर्चा करणारे ते या नावेत बसलेले जलप्रवासी होत. मध्येच वेगवान तीव्र लागणारी धार म्हणजे परशुरामाची वाणी होय. तर ती रोखून धरणारा मजबूत घाट म्हणजे राम-लक्ष्मणांची सुभगवाणी. त्यानंतरचा चारी भावांचा विवाहोत्सव हा शरयू नदीला आलेला आनंद उत्साहाचा महापूर होय.जे ही कथा सांगताना ऐकताना आनंदाने पुलकीत होतात ते खऱ्या अर्थाने त्या महापुरात उड्या घेणारे पुण्यात्मे होत. रामांच्या युवराज्याभिषेकासाठी जे नटून थटून सज्ज होतात, तो जणूं नदीवर पर्वकाळासाठी जमलेला जनसमुदायच! परंतु ऐनवेळी कैकयीरुपी कुमतीचे संकटरुपी बुळबुळीत निसरडे शेवाळ त्यावर साचले. पण त्या उत्पातावर नेमका उपाय काढला तो भरताच्या जप-तप-व्रती जीवनाने.या शेवाळावर त्यावेळी लोकमतांचे उलट सुलट जननिंदेचे ढोंगी, कुटील कावळे, बगळे बसलेही कलियुगातील पापांसारखे! पण त्या चौदावर्षांनंतर रामराज्याची कीर्ती दिगंत पसरत वाढतच गेली ती जणूं सहाही ऋतूमध्ये भरभरून या शरयू सरितेसह आजही वाहतच आहे.

हिमालयावरचा शंभू-गिरिजा विवाह हा हेमंत ऋतू, रामजन्मोत्साहाने नटलेला शिशिर ऋतू, रामविवाहाचा मंगलमय ऋतुराज-वसंत, तर राम-वनवासाची ती चौदा दु:खद वर्षे म्हणजे ग्रीष्म ऋतूचा शुष्क उष्ण वारा, तर देवांना सुखविणारे घनघोर राम-रावण युध्द हा वर्षाऋतु आणि शरदाचे सुखद, रम्य टिप्पूर चांदणे घेऊन येणारा विनय व सुख-समृध्दीने नटलेला रामराज्याचा सुंदर ऋतू अशा साही ऋतूत ही शरयू-सरिता रामकीर्ती घेऊन वहाते आहे.

सती शिरोमणी सीतेचे शुध्द निर्मळ पवित्र चारित्र्य हा ह्या सरितेचा मार्ग असून भरताचा शीतल सुस्वभाव हा या जलाची एकरसता सदैव जाणवून देतो. राम-लक्ष्मण-भरत-शत्रुघ्न या चारी बंधूंचे आपआपसातील प्रेम एकमेकांच्या दर्शन, भाषण व भेटीतून प्रतीत होणारे ही या शरयूची गोडी व सुंदर सुवास आहे. ग्रंथकाराची विनयपूर्वता दीनता, आर्तता हा या पाण्याचा हलकेपणा (पचण्यासाठी) आहे. तसेच ह्या पाण्याचा अद्‌भूत गुण असा की ही कथा ऐकणाऱ्याची आशा जीवनतृष्णा इ. मनोमल तात्काळ दूर करते. इतकेच नव्हे तर काम-कोपादि षड्‌विकार नाश करुन,शुध्द मनात विवेक-वैराग्य

वाढविते. जो या रामकीर्ती शरयूमध्ये प्रेमादर पूर्वक स्नान पान करतो त्याच्या हृदयात पश्चाताप करण्यास कसली ती जागाच उरत नाही ते दुर्भागी-मित्रे, कलिकालाकडून नाडविले गेलेले बिचारे! जे या शरयूकडे दुरुन बघून तसेच निघून जातात ते सूर्यवंशी राम किरणांनी अस्पर्शीत राहिल्यामुळे अत्यंत दुखः भोगित राहतात. जसे मृगजळाने तहान भागविण्यासाठी निघालेले मृग पळून पळून थकून भागून ऊर फुटून त्या मृगजळातच आपला प्राण सोडतात तसे.

म्हणून मी या भव-प्रपंच रुपी मृगजळाला न भाळता या रामकीर्ती शरयूत मनाला सुस्नात करून आता राम चरणकमलांचे हृदयात ध्यान स्मरण करुन त्याचा 'प्रसाद' रुपाने ही कथा सांगायला प्रारंभ करेन.

याज्ञवल्क्य-भरव्दाज संवादाचा उपक्रम –

तीर्थराज प्रयागात माघामध्ये खूप मोठा प्रचंड प्रमाणात कुंभमेळा भरतो. सर्वजण त्रिवेणी संगमात स्नान करतात, अक्षयवटाला स्पर्श करुन तेथील 'माधवा' (विष्णू) चे पूजन करुन एक महिना जप-तप-दान व सत्संग हरिकथा इत्यादीत रममाण होतात. आणि पर्वकाळ संपताच ऋषीमुनी आपापल्या आश्रमात व लोक आपआपल्या घरी परततात. आजही हा रिवाज चालू आहे, असेच एका कुंभमेळयाच्या शेवटी प्रयागच्या भरव्दाज आश्रमातून सर्वजण परत निघाले. सर्वात शेवटी याज्ञवल्क्य मुनी निघताना त्यांना भरव्दाजांनी रोखून धरले प्रेमाने, आदराने, विनयपूर्वक त्यांना आपल्या आश्रमात आणले. पवित्र अशा आसनावर त्यांची विशेष पूजा करुन परम विवेकी वेदवेत्ता असे जाणून त्यांचेकडून भरव्दाजांनी आपल्या मनीच्या काही शंका निरसन करुन घेण्याचे ठरविले. त्यानुसार त्यांनी विचारले, (जणू तुमच्या आमच्या सामान्य-मनात उठणारेच हे प्रश्‍न आहेत पहा) 'अयोध्येश दशरथ पुत्र राम वनवासात असताना पत्नी विरहाने दु:खी झाला आणि आपली पत्नी सीता हिचे हरण करणाऱ्या रावणाचा त्याने क्रोधाने वध केला तो राम आणि त्रिपुरारि शंकर ज्याचे सदा-सर्वदा नाम जपतात तो राम हे दोन वेगळे आहेत का?'

कृपया हा माझ्या मनातला संभ्रम दूर करा.

त्यावर याज्ञवल्क्य किंचित हसून म्हणतात, हे भरव्दाज मुने वरवर पाहता अगदी मूर्खासारखा हा प्रश्न विचारलात,परंतु यामागचे गूढवा दडलेले रहस्य म्हणजे रामगुण, रामचरित्र, रामांची प्रभूता-महत्ता-प्रभाव तुम्ही चतुराईने समग्र जाणून घेऊं इच्छित आहात. ठीक आहे-मन लावून आदरपूर्वक ऐका. ही सुंदरशी रामकथा मी तुम्हांला सविस्तर सांगतोच. फार पूर्वी भवानीने असाच प्रश्न शंकराना विचारला होता.

सतीमोह –

एकदा त्रेतायुगात शंकर सतीसह कुंभज किंवा अगस्ती ऋषींच्या आश्रमात खास त्यांचे कडून रामकथा ऐकण्यासाठी आले. ईश्वर-जगदंबा जाणून अगस्तींनी दोघांचे यथोचित अधिकारी अतिथी म्हणून पूजन केले. त्यानंतर अगस्तींनी शंकरांना भक्ती विषयक प्रश्न विचारले व अगस्तींकडून संपूर्ण रामकथा प्रेमादरपूर्वक ऐकून शंकर दक्षकन्येसह कांही दिवसांनी मुनींचा निरोप घेऊन निघाले. रामकथा उत्तम श्रोता बनून नुकतीच ऐकल्याने शंकरांना रामदर्शनाची आस लागली होती. त्यामुळे त्यांच्या हृदयाची तळमळ सतीलाही जाणवली. परंतु तिने प्रेमादरपूर्वक कथा न ऐकल्याने कनिष्ठ श्रोता बनल्यामुळे तिला शंकरांच्या तळमळीचे मर्म उमगले नाही. अशा तऱ्हेने शोकाने विवश झालेले शंकर पुढे जातात तोच त्या त्रेतायुगात सीता विरहाने विकल झालेले राम दिसले. लक्ष्मणासह ते सीता-शोध घेत, रडत वनात विचरण करताना शंकरांनी पाहिले मात्र अन् 'जय सच्चिदानंद जग पावन' असे म्हणून आपल्या सदगुरु श्रीरामांना त्यांनी मनोमन नमस्कार केला. अन् शंकरांचे अष्टसात्विक भाव उमलले अत्यंत आनंदाने सतीसह ते पुढे निघाले. परंतु सतीला सामान्य राजकुमाराला, तेही स्त्रीविरहाने रडणाऱ्याला आपल्या पतीने जगदीशाने नमस्कार करुन पुलकित व्हावे, आनंदित व्हावे हे कोडे काही उलगडेना. तिच्या त्या प्रश्नांकित चिंतित नजरेने व चेहऱ्याने शंकरांनी तिची शंका जाणली व आपले पती ज्याला वंदन करतात-तो तर सामान्य राजकुमार,त्यात रडणारा,

पत्नी शोधणारा असा दिसतो हे कसे? त्यावर शंकर तिचे संशय दूर करण्याचा बराच प्रयत्न करतात. 'आताच आपण अगस्तींच्या आश्रमात ज्या परब्रह्माचे सगुण चरित्र ऐकलं तेच हे रघुवंशी राम. वेद पुराणे, मुनी, संत ज्यांचे ध्यान, भक्ती, सेवा करतात तेच हे. ते सर्वज्ञ सर्वव्यापी ब्रह्म भक्तांच्या हितासाठी हे राजकुमाराचे सोंग घेऊन नरनाट्य करीत आहे. त्यांना कसला शोक अन् दुःख? परोपरींनी शंकरांनी सांगूनही सतीचा संशय मिटेना हे पाहताच 'रामेच्छा असेल तसे होईल' असे मनात म्हणून शेवटी नाईलाजास्तव शंकर सतीला म्हणाले 'तुमच्या मनात आत्यंतिक हा संशय जो आहे, त्याचे निवारण तुम्ही स्वतः रामांकडे जाऊन त्यांची परीक्षा घेऊनच करा. तुम्ही परत येईपर्यंत वटवृक्षाखाली मी निवांत बसतो. पण विचार विवेक पूर्वक परीक्षा घ्या हं!' असे म्हणून रामनाम जपात शंकर त्या वटवृक्षाखाली तत्काल मग्न झाले, दंग होऊन रंगले देखील!

तिकडे सतीने सीतेचे रुप घेतले अन् रामापुढे जाऊन ती उभी राहिली. लक्ष्मण एकक्षण चकित होऊन पहातच राहिले कारण आजवर रामानुगामी असलेली आपली वहिनी अशी पतीपुढे जाब विचारावा अशी पुढ्यात येऊन कशी उभी ठाकली? परंतु सर्वज्ञ रामांनी सतीचे हे कपट तत्काल जाणले आपल्याच विद्यामायेची प्रशंसा करीत अत्यंत मृदु स्वरात स्मितपूर्वक सतीपुढे हात जोडून पित्यासह आपले नाव सांगून विचारतात, 'या वनांत आपण एकट्याच कां?, वृषकेतू-भगवान शंकर कुठे आहेत?'

या रामांच्या मृदु पण गूढ प्रश्नाने सती एकदम संकोचली. अन् मनातून दुःखीही झाली. त्याचवेळी घाबरून महेशांकडे निघालीही. मनांत विचारांचे काहूर उठले. शंकरांच्या शब्दावर मी विश्वास ठेवला नाही.स्वतःचे अज्ञान रामांवर लादले. तेव्हा आता शंकरांना काय सांगू? स्वतःची ही फजिती ही मानहानी कशी सांगू ?

सर्वज्ञ सर्वांतर्यामी रामांनी सतीचे हे दुःखी मन जाणले परंतु थोडासा स्वतःचा प्रभाव प्रगट करुन तिला सर्वज्ञ असल्याची खात्री पटवून शेवटचा मात्रेचा वळसा दिला. शंकरांकडे जाताना वाटेत सतीला दाही दिशांना 'राम-सीता-लक्ष्मण' वल्कलधारी वनवासी रुपात दिसू लागले. जिथे बघेल, तिकडे

हेच दृश्य दिसू लागले. सर्व चराचरात प्रभु जाणून रामसेवेत संपूर्ण विश्व त्यांच्या सेवेत रत असलेले दिसले अगदी ब्रह्मा-विष्णू-महेशांसह. शेवटी मनातून ती अत्यंत घाबरली अन् रस्त्यातच डोळे मिटून मटकन बसली. अन् भीतीने तिची शुध्द हरपली. शुध्दीवर येवून पाहते तो ते सारे दृश्य निवळले. मग मात्र मनोमन सतीने रामचरणी अनेकवार मस्तक नमविले अन् शेवटी त्या वटवृक्षाकडे शंकराजवळ येऊन पोचली.

तिच्या गोऱ्यामोऱ्या चेहऱ्याकडे पाहून शंकर म्हणाले, ‘काय देवी ठीक आहेस ना? कशी घेतलीत आमच्या रामरायाची परीक्षा, खरं खरं सांगा हं!’

रघुवीरांचा प्रभाव नुकताच अनुभवल्यामुळे व सीतारुप घेतल्यामुळे भीतीने तिला खरे सांगवेना. शंकरांना ती भ्यायली व म्हणाली,’मी कांही परीक्षा वगैरे घेतली नाही, आपल्याप्रमाणे नमस्कार करून परत आले. तुम्ही जें जें सांगितलेत त्यापैकी कांहीही खोटे नाही यांची मला प्रचीती आली बरं! ’ परंतु खोटे बोलणाऱ्याचा चेहराच सांगतो, अन् वाणीही अस्खलित नेहमीप्रमाणे नसल्याने शंकरांनी ध्यान धरुन पाहीले तो, सतीने सीतावेष घेतलेला दिसला. त्याबरोबर रामाच्या मायेला शंकर नतमस्तक झाले अन् या मायेमुळे परम पुनीत, अनघ अशा सतीने आपल्या सद्‌गुरु पत्नीचं रुप घेतल्यामुळे ती आता माझी गुरुपत्नी-गुरुमाता बनली हे मनाशी पक्के ठरविले अन् तिच्याशी पत्नी म्हणून वागणे गैर आहे पण तिचा त्याग करणे हे ही योग्य नाही हे जाणून मनाने तिचा परित्याग केला. त्याबरोबर मनोमन केलेल्या प्रतिज्ञेस प्रतिसाद म्हणून आकाशवाणी झाली, ‘हे महेशा तुमचा जयजयकार असो, आजवर असा समर्थ रामभक्त कोणीही झाला नाही’.ती आकाशवाणी ऐकताच सतीने अनेक प्रकाराने कोणती प्रतिज्ञा केली असे विचारले परंतु ‘मौन’ हेच उत्तर शंकरांनी दिलेले पाहून सर्वज्ञ शंकरांनी माझे कपट ओळखले अन आपल्या अक्षम्य अपराधाने ती चिंतामग्न, दु:खी होऊन कैलासावर शंभू समेत पोचली.

कैलासावर पोचताच ‘स्वरुप चिंतन’ करता करता शंकर समाधिमग्न झाले ते ८७०००(सत्याऐंशी हजार) वर्षे त्या निर्विकल्प समाधीत रंगून गेले. अन् सती आपल्या अपराधाची बोच घेऊन तेवढी वर्षे मनोमनी रामांची क्षमा

मागत राहिली अन् या आपल्या पतीशी कपट करण्याच्या महा अपराधाचे शासन म्हणून हा पती अविश्वासी देह लवकरात लवकर नाश पावावा व दुसऱ्या जन्मात शिवपद प्राप्तीच व्हावी हे मागणे मागत राहिली.

एकदाचे शंकर समाधीतून जागे झाल्याचे त्यांच्या रामनामोच्चाराने सतीने ओळखले. त्याबरोबर पती चरणी तिने वंदन केले. शंकरांनी तिला आपल्यासमोर आसन दिले (वामभागी नाही) अन् तिला रसाळ अशी रामकथा (तिचे दुःख निवारणार्थ) सांगायला सुरवात केली.

त्याचवेळी तिचा पिता दक्ष हा 'प्रजापति'चा मान मिळाल्याचा आनंद व्यक्त करण्यासाठी मोठा यज्ञ करु लागला. त्या यज्ञाच्या उत्सवासाठी स्वर्गातून सर्व देव गंधर्व नाग सिध्द आपआपल्या वाहनांतून नटून थटून निघालेले जाताना दिसले. पण अगस्ती आश्रमात सतीने जी चूक केली तीच चूक पुन्हा ही रामकथा शंकरांकडून ऐकताना केली. प्रेमादरपूर्वक लक्षपूर्वक कथा न ऐकणे. म्हणून तिचे लक्ष विमानातून जाणाऱ्या त्या सर्वांकडे गेले व शंकरांकडून पितृगृहीच्या उत्सवाची वार्ता कळताच तेथे जाण्याची अनुज्ञा मागू लागली. निमंत्रण नसताना पित्याच्या मित्र-पिता-प्रभु-गुरु यांच्या घरी जावे हे ठीक परंतु अशाही ठिकाणी आपला विरोध कोणी करत असेल तर तेथे जाऊ नये असे समजावून सांगूनही सतीची माहेरची ओढ तिला गप्प बसूं देईना. शेवटी नाईलाजास्तव तिच्याबरोबर आपले गण-दास देऊन शंकरांनी तिची पाठवणी केली. पण मनातून तिची कल्याणहानी होणार हे जाणले. अन् व्हायचे तेच झाले. त्या यज्ञात शंकरांसाठी हविर्भाग नाही हा आपल्या पतीचा अपमान आहे हे जाणून सतीने सर्व शंकर निंदकांची निर्भत्सना केली व स्वतःचा देह योगाग्नी प्रकट करुन त्याच यज्ञात जाळून टाकला. **परंतु तत्पूर्वी जन्मोजन्मी शंकरच पती मिळावेत ही इच्छा रामांकडे मरताना मागितली.** त्यानंतर शंकर गणांनी यज्ञ-विनाश करुन शंकर निंदकांचा यथेच्छ समाचार घेतला.

पार्वती जन्म --

मृत्युसमयीच्या इच्छेनुसार सती हिमालय व मैना किंवा मयना यांची

पुत्री पार्वती म्हणून जन्मास आली. तिच्या जन्माबरोबर सर्व हिमालय बहरला-फुलला-फळला. अनेक ऋषी मुनींनी तेथे नव्याने आश्रमात तपस्या करण्यास प्रारंभ केला. सर्व वृक्ष-लतांवर सुंदर फळे फुले डवरु लागली. आणि हिमालय अनेक रत्ने, मणी इ.नी समृध्द झाला. पशु, पक्षी आपसांतील वैर विसरुन गुण्या गोविंदाने हिमालयावर नांदते झाले.

एकदा हिमालयाची ही समृध्दी पाहून त्याचे घरी देवर्षी नारद आले. त्यांचे यथासांग स्वागत व अतिथी पूजन हिमालयाने केले अन् नुकत्याच घरी आलेल्या कन्येस नारदांचे पायावर घालून तिचे भविष्य विचारले. त्यावर नारद म्हणाले- ''तुमची मुलगी रुप, गुण संपन्न आहे. ती अखंड सौभाग्यवती होईल. इतकेच नव्हे तर हिच्यामुळे तुम्हालाही कीर्ती मिळेल. फक्त निर्गुण अमानी, माता-पिता नसलेला, उदासीन असा पती हिला मिळेल अशी हिची हस्तरेषा सांगते. पण हे सारे दोष गुणात परिवर्तित व्हायचे असतील तर त्यावर उपाय एकच. हिने तपश्चर्या करुन शंकरास पती म्हणून प्राप्त करुन घ्यावे म्हणजे हे सर्व दोष गुण बनून सर्वांचेच कल्याण होईल.''

हे ऐकताच हिमालय व मैना यांनी एकांतात नारद वचनावर विचार विनिमय केला व हिमालयाने पत्नीस सकाळी पार्वतीस तपश्चर्या करण्याचा उपदेश करण्यास सांगितले. सकाळी उठल्या-उठल्या पार्वती आईस सांगते- ''काल (पहाटे) माझ्या स्वप्नात एक सुंदर गोरापान तेजस्वी ब्राह्मण आला होता व त्याने नारदांच्या सांगण्याप्रमाणे वनात जाऊन तपश्चर्या कर असा उपदेश केला.'' तो स्वप्न वृत्तांत ऐकून मयना आश्चर्यचकितच झाली कारण पतिवचनास अनपेक्षितरित्या पुष्टीच मिळाली. परंतु अगदी कोवळे वय व सुकुमार अतिकोमल अशा शरीर कांतीच्या पार्वतीस, बालिकेस तपस्या करण्यास पाठविण्याचे मैनेच्या जीवावर आले. साहजिकच आहे - मातृहृदयाची कळवळ्याची प्रीतीची रीतच अशी असते! वेदशिरा ऋषींनी पार्वतीचे जन्म रहस्य सांगून ती जगदंबा असल्याचे ज्ञान मैनेवर बिंबवले. तेव्हा कुठे पार्वतीची घरातून सुटका झाली.

पार्वती तपस्या -

अशा प्रकारे पार्वती तपस्या करण्यासाठी बालवयातच घराबाहेर

पडली. अन् सर्व प्रथम तिने आपले पती-प्राणपतींच्या चरणांचे स्मरण केले, स्मरणपूर्वक ध्यानी बिंबवले अन् मगच तपश्चर्येस प्रारंभ केला. पतिपदीच्या अनुरागाने तिचे मन भरुन गेले ते इतके की ती आपला देहही विसरली. अशा तऱ्हेने सर्वस्व समर्पण वृत्तीने तिचे तपाचरण सुरु झाले. एक हजार वर्षे कंदमूल फलाहार, त्यानंतर केवळ पर्णाहार शंभर वर्षे, कित्येक दिवस नुसते पाण्यावर तर त्यानंतर वायुभक्षण करुन तप केले. कित्येक वर्षे कठीण उपवास केले. नंतर फक्त पडलेली शुष्क बेलाची पाने खाऊन २००० वर्षे काढली. त्यानंतर त्याचा ही त्याग केला म्हणून तिला 'अपर्णा' हे नांव मिळाले. अशी कित्येक हजार वर्षे तपश्चर्या केल्यानंतर ब्रह्मवाणी झाली की, "आता लवकरच सप्तर्षी तुम्हांला भेटतील त्यांच्या आज्ञेनुसार पित्याचे घरी तुम्ही जावे."

इकडे सती यज्ञासाठी गेल्यापासून शंकर अधिकच वैराग्य संपन्न बनले. सर्वत्र रामांचे अभिराम रुप अनेक प्रकारांनी सेवीत राहिले. कुठे मुनींना प्रबोध करीत, तर कुठे राम-गुण-गान करीत, अशा प्रकारे आपल्या पत्नीच्या-भक्ताच्या विरहाने दु:खी झालेले शंकर रामभक्तीत आपले मन रमवूं लागले. असे आपल्या या भक्ताचे प्रेम नेम पाहून श्रीरामप्रभू शंकरांसमोर प्रगट झाले. हे विरागी पार्वतीचा स्वीकार करणार नाहीत कदाचित म्हणून रामांनी अनेक प्रकारांनी शंकरांची स्तुती केली व पार्वतीशी विवाह करण्याचे अभिवचन शंकरांकडून मिळवले. आपल्या स्वामी प्रभु गुरुचे हे वचन शंकरांनी थोडेसे मनाविरुध्द असूनही शिरोधार्य केले. परम हितकर्त्या सद्‌गुरुचे वचन पूर्ण करण्याचे आश्वासन शंकरांनी देताच कृतज्ञ,कृपाळू रुपशील तेजाने तळपणारे श्रीरामप्रभू अंतर्धान पावले. ते रुप शंकरांनी आपल्या मनीं साठवले. त्यानंतर लगेचच सप्तर्षी शंकराजवळ आले व त्यांनी रामप्रभु आज्ञेनुसार पार्वती तपस्येची वार्ता शंकरांना दिली. त्याबरोबर शंकरांनी सप्तर्षींना पार्वतीची प्रेमपरीक्षा घेऊन तिला पित्याचे घरी पाठविणेस सांगीतले.

आज्ञेनुसार सप्तर्षी पार्वतीसमोर उभे ठाकले. पाहतात तो मूर्तीमंत तपस्येच्या तेजाने तेजाळलेली ती गौरी व तिची ती तप:पूत अवस्था पाहून विस्मित झाले. अनेक प्रकारांनी शंकर कसे अगुण,अलज्ज, कुवेष, कपाली, अकुल,दिगंबर, अगृही, व्याली (सर्प धारण करणारे) आहेत अशा स्मशानात

राहणाऱ्या भणंग गोसाव्यापेक्षा सुंदर व सर्वसद्गुणराशी विष्णु तुम्हांस नवरा मिळवून देतो असे सांगूनही पार्वती बधली नाही. एकदा नारदांना सद्गुरु मानून त्यांचे वचनावर निष्ठा असल्याने प्रत्यक्ष शंकरांनी स्वत: येऊन शंभर वेळा अन्य काही सांगितले तरी मी ते मानणार नाही असे जेव्हा स्पष्ट शब्दांत सांगितले तेव्हा या सप्तर्षींच्या सारख्या चतुर ज्ञानी परीक्षकाच्या परीक्षेत पार्वती सुवर्णपदकाची मानकरी ठरली. अन् सप्तर्षींच्या सांगण्यानुसार हिमालयाने- पित्याने सन्मानाने बोलावताच घरी गेली. अन् सारा प्रेम परीक्षा वृत्तांत सप्तर्षींनी शंकरांना दिला.

त्याबरोबर पत्नीप्रेमात मग्न झालेल्या शंकरांनी तेच मन श्रीरामांकडे वळविले व त्यांचे ध्यान करु लागले. तर स्वर्ग-मृत्यु पाताळ सर्वत्र तारकासुराच्या थैमानाने देव हैराण झाले. तेव्हा ब्रह्मदेवाने सर्व देवांना या संकटातून सुटण्याचा एकमेव उपाय म्हणजे शंकर पुत्राकडून तारकासुराचा वध हा सांगितला. ध्यानमग्न शंकरांना भानावर आणवून पार्वतीशी विवाह करणे क्रमप्राप्त आहे असे सर्व देवांचे एकमत झाले. पण शंकरांना भानावर आणायचे अत्यंत कठीण काम कोण करणार? त्याचाही प्रश्न ब्रह्मदेवांनीच सोडविला. मदनाने हे काम करावे असे ठरले. देवकार्यासाठी आपला मृत्युही आनंदाने स्वीकारून हे काम मदन-कामदेवाने करण्याचा देवसभेत विडा उचलला. त्याबरोबर सर्व स्वार्थी देवांनी नेहमीप्रमाणे स्वार्थार्थ मदनाची स्तुती केली.

## शंकर समाधी भंग व कामदहन –

मदनाने सर्व विश्वभर आपले साम्राज्य स्थापन केले. त्याबरोबर पशु-पक्षी-नर-नारी सारे कामवश झाले. इतकेच नव्हे तर वृक्ष, तलाव अशा जडांवरही या कामाचा प्रभाव दिसू लागला. एका आम्रवृक्षावर त्या दाट वृक्षपल्लवात मदन दडून बसला. तेथे त्याने आपले पुष्प-धनुष्य सज्ज करुन पांच-कुसुमबाण –(पंचबाण-मदनबाण, अरविंद (लाल कमळ), नील-कमळ, आम्रमंजिरी, अशोक) शंकरावर लपून छपून सोडला. तो बाण लागताच शंकरांची समाधी भंग पावली. रागाने त्यांनी दशदिशांना समाधी भंजकाचा शोध

घेण्यासाठी नजर फिरवली. तेव्हा हा लपलेला मदन-कामदेव दिसताच शंकरांनी आपला तिसरा डोळा--ज्ञानचक्षू उघडून त्या ज्ञान-किरणांनी मदनाचे जाळून भस्म केले. मदन दहन होताच सर्व विश्व पुन्हा पूर्वस्थितीस आल्याने ऋषी-मुनी-योगी यांचे समाधान झाले.परंतु मदन पत्नी रती पतिविरहाने व्याकुळ होऊन शंकरांकडे आपल्या पतीचे प्राणदान मागू लागली. त्याबरोबर आशुतोष कृपाळूंनी रतिला पतिप्राप्ती कृष्णावतारात प्रद्युम्न .रुपाने होईल असा कृपा प्रसाद तिला दिला. त्यानंतर सर्व देवांनी प्रत्येकाने शंकरांची आपआपल्या परीने स्तुती करून विवाह करण्यास गळ घातली. त्यास शंकरांनी 'रामाज्ञा' समजून होकार दिला.

## शंकर – पार्वती विवाह –

इकडे हिमालयाने पार्वती विवाहाची तयारी सुरु केली. सर्व पर्वत – नद्या – सागर नररुपाने सुंदर सजून हिमालयाच्या विस्तृत सुंदर मंडपात आले. सगळीकडे शुभ शकुन, अत्तराचे सडे , पुष्पगंध, अक्षता, आरत्या, मंगलगान, नृत्यादि सुरु झाले.

तर शिवगणांनी वराला सजविण्यास सुरुवात केली. जटांच्या मुकुटांवर नागफणा डोलू लागला, हातात सर्पाची कुंडले अंगास ताजे चिता भस्म चर्चिले गेले, शंकरांच्या इच्छेविरुद्ध व्याघ्राजिन गुंडाळले, डोक्यावर गंगा, भाळावर चंद्रकोर, गळ्यात सर्पाचे जानवे, गळ्यात नरमुंडमाला, हातात डमरु त्रिशूळ असे हे नवरदेव नंदीवर विराजमान झाले अन् त्यांच्या समवेत समस्त विश्वातले भूत- प्रेतगण वऱ्हाडी म्हणून हिमालयाकडे निघाले. इंद्र, विष्णू, वरुणादि देवता आपआपली वाहने, स्त्रिया साजशृंगार यासह सर्वात पुढे झाल्या अन् सर्वात मागे हे उत्सवमूर्ती आपल्या गणांसह. ह्या विचित्र जावयाचे रुप व शृंगार पाहून पार्वती माता बेशुद्ध पडली अन मनातून घाबरली व दु:खी होऊन हा विवाह मी जिवंत असे पर्यंत होऊ देणार नाही असे म्हणाली. त्याबरोबर नारदांनीही जगत् जननी शिवप्रिया असल्याचे मर्म सांगताच नारदां विषयीचा राग व पूर्वग्रह दूर होऊन आनंदाने हिमालय व मैना यानीं आपल्या कन्येचा उमेचा विवाह शंकराशी आनंदाने करुन दिला. पाणीग्रहण, सप्तपदी, कन्यादान इत्यादी वेदोक्त विवाह संस्कार पार पडले अन प्रेम विव्हल होऊन

आनंद हर्ष व विरह दु;ख अशा संमिश्र भावनानी हिमालय – मैना यानी पार्वतीची पाठवणी केली. अपार धनसंपतीच्या नजराण्यासह 'संतत कर शंकरपद पूजा' हा अत्यंत महत्वाचा उपदेश कन्येला केला. तर हिमालयांनी शंकराना मला प्राणप्रिय असणारी ही माझी कन्या आपली 'गृह किंकरि–दासी' करा अशी विनवणी केली. अशा प्रकारे पार्वती परमेश्वराचे हे नवदांपत्य कैलासावर पोचले. त्याचा अनेक प्रकारचा शृंगार, त्याचा परिणाम म्हणून षडानन कार्तिकेयाचा जन्म झाला. अन् त्याने कुमार वयातच आपल्या अतुलनीय पराक्रमाने तारकासुराचा वध करुन देवांना सुखी केले.

## शंकर पार्वती संवाद –

एकदा परम रम्य अशा हिमालयाच्या कैलास शिखरावर विशाल वटवृक्षाखाली शंभु शांत रसाने देह धारण करावा असे निवांत व प्रसन्न बसले होते. अशा प्रसन्न पतींजवळ उमा जाताच शंकरांनी तिला सन्मानाने आपल्या वामभागी शुभासन दिले. त्याबरोबर तिची आपल्या पूर्वजन्मीची स्मृती चाळवली गेली अन् त्या सरशी आत्यंतिक विनयाने प्रेमादरपूर्वक स्वतःसह जगत् कल्याणार्थ श्रीरामांचे सर्व चरित्र अगदी त्यांनी अवतार घेण्याच्या हेतू पासून ते राम राज्य व रामनिर्याणापर्यंत समग्र सविस्तर सांगण्याची विनंती केली. इतकेच नव्हे तर ज्ञान, भक्ती ,विज्ञान , वैराग्य व सर्व राम रहस्ये उलगडुन सांगावीत व याही पुढे जाऊन जे मला विचारता नाही आले तेही सर्व सांगावे. आर्त दासी या नात्याने ही सारी गूढतत्त्वे मला निवेदन करावी अशी प्रस्तावना केली. हे आपल्या प्रियेचे, उमेचे अत्यंत सुंदर,मनोहर,कपटरहित व सहजसरल शिवचित्तास रुचिकर असे प्रश्न ऐकून शंकर मनापासून आनंदले. त्यांचा अत्यंत आवडता विषय, इष्ट-उपास्य-सद्गुरु अशा रघुनाथांबद्दलचे हे जिज्ञासू प्रश्न ऐकताच त्यांचे मन ध्यानरसपानात आकंठ बुडून गेले. काही वेळानंतर त्या ध्यानानंदातून भानावर येत अतिशय आनंदाने शंकरांनी उमेस हे रामचरित्र सांगायला सुरूवात केली.

शिवगीता –

रामाचे सत्य परब्रह्म स्वरुप न कळल्याने समस्त विश्व भ्रमात जणूं स्वप्नवत् जीवन जगते. जसे अंधारात पडलेली दोरी साप समजून मनुष्य त्याला भितो. त्याला दरदरून घाम फुटतो पण उजेडात दोरी पाहताच तो साप नाही हे सत्य त्याला कळते तसे निर्गुण परमात्मा दशरथावर द्रवून सगुण साकार रुपाने त्याचे अंगणात विहार करतो. तो परमात्मा असल्याने तो मंगलाचे भवन व सर्व अमंगलाचे हरण करणारा असाच आहे. सगुण व निर्गुण यात काहीही भेद नाही. पाणी व गार (बर्फ) यात जसा भेद नाही अगदी तसेच. तो सगुण असो वा निर्गुण तो सच्चिदानंद, प्रकाश रुप आहे. त्यामुळे त्याचे ज्ञान एकदा झाले की मग तेथे अज्ञानाला कुठला थारा? जसे सूर्य उगवताच अंधार आपोआपच नाश पावतो तसेच हे आहे. संपूर्ण जगताला, विश्वाला प्रकाश देणारा-चैतन्य प्रदान करणारा हा परमात्मा आहे.

शिंपल्यावर सूर्यकिरणे पडल्यामुळे ती जशी चांदी आहे असे वाटते किंवा दूर वरुन वाळवंटात भासणारे मृगजळ जसे भासमान तसे ह्या परब्रह्माच्या आश्रयाने राहणारे हे जग भासमान-मिथ्या-असत्य असले तरी दु:ख देते खरे! यावर उपाय एकच 'रामकृपा'! ती कृपा कशी मिळवायची तर कानाने सतत हरिकथा श्रवण, डोळ्यांनी प्रभु वा संतदर्शन, मस्तकास सदैव देव गुरु चरणीं नम्र होण्याची सवय, हृदयात हरिभक्तीचा कायम वाहता स्रोत, मुखात नेहमी रामनाम, ही पथ्ये तंतोतंत पाळली तर पायाविना चालणारा, कानाविना ऐकणारा, हाताविना कर्म करणारा मुखविना रसपान करणारा असा अलौकिक निर्गुण परमात्मा सगुण साकार रुपाने दर्शन देईल. सतत त्याच्याच कथा ऐकल्याने सारे संशय दूर होतील. कारण ही रामकथा कलीच्या कठोर वृक्षाला तोडणारी कुऱ्हाड आहे. या परमात्म्याची कथा ऐकताना श्रोता व वक्ता यांची आदर प्रेमयुक्त एकरुपता साधली तर सारा भ्रम दूर होईल. अन् मग त्या कृपाळू रामाच्या पूर्ण कृपेने त्याच्या नामात-कथेत-लीलेत-रस येऊ लागेल. केवळ त्याच्या नामाने सारे शोक-मोह-दु:ख मुक्त होऊन प्राणी मुक्तीचा आनंद लुटतो याचे प्रत्यंतर काशीत मीच प्रत्येक जीव जंतूला करवून देतो. विश्वव्यापक, सर्व हृदयांतर्यामी असे हे माझे रघुवर अत्यंत कृपाळू दयाळू आहेत. केवळ भक्तांचे

कोड पुरविण्यासाठी आपल्या मूळ निर्गुणातून ते सगुण साकार होऊन अवतार घेतात व अनेक लीला करुन अनेक भक्तांना रिझवतात.

त्यावर उमा विचारते आजवर ह्या परब्रह्म-परमात्म्याने कोणा-कोणा भक्तांसाठी किती अवतार घेतले ते सारे मला सविस्तर सांगा. हे परब्रह्म वेद-पुराणे शेष शारदा यांनाही 'नेति नेति' म्हणायला भाग पाडते तेथे मी त्यांचे समग्र वर्णन कसे करणार? कारण परब्रह्म हे मन-बुध्दि-तर्क-इंद्रिये यांच्या कवेत येणारेच नाही. या सर्वांच्या पलिकडचे ते आहे. तरी सामान्यत: एक सूत्र असे की, जेव्हा जेव्हा धर्म-ग्लानी होते सर्वत्र राक्षसी वृत्तीने पृथ्वी,देव,ब्राह्मण गाई या अत्यंत सैरभैर होतात, तेव्हा तेव्हा संत सज्जनांची पीडा हरण करण्यासाठी हे परब्रह्म अनेक देह धारण करून लीला करते. असे प्रभुचे आजवर अनंत जन्म झाले त्यापैकी काही प्रमुख अवतारांचे वर्णन मी करुन सांगेन. हरिचे जय-विजय नावाचे दोन व्दारपाल ते ब्राह्मण शापाने हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु बनून सर्व पृथ्वीला भार बनले तेव्हा प्रभुंनी वराह रुप घेऊन हिरण्याक्षास तर नरसिंहावतार घेऊन हिरण्यकशिपुस संपवले. अन् भक्त प्रल्हाद हा अग्रगण्य हरिप्रेमी म्हणून कीर्ती पावला. तर कुंभकर्ण व रावण बनून हेच पुन्हा रामांकडून उध्दरले तर पुढे जालंधरच पुन्हा रावण बनला त्याला पुन्हा रामांकडून परमपद मिळाले तर मनु – शतरुपाच्या वरदानामुळे दशरथ कौसल्याचे पुत्र बनून प्रभूंनी अवतार घेतला. तर एकदा नारदांनी प्रभुंना दिलेल्या शापामुळे त्यांना अवतार घ्यावा लागला.

विष्णूभक्त नारदांचा असा काय प्रभूंनी अपराध केला की नारदासारख्या ज्ञानी ब्रह्मर्षीने शाप द्यावा? ज्ञानी नारद कसे मोह ग्रस्त झाले असे पार्वतीने साश्चर्य विचारले. त्यावर शंकर म्हणाले या जगात कोणी ज्ञानी नाही की कोणी मुर्ख नाही, राम जसा बनवेल तसा प्राणी होतो बरं!

### नारद मोह कथा –

पवित्र असा हिमालय, त्यातील एक पवित्र गुहा त्या गुहेतील परम पवित्र व सुंदर आश्रम, जवळून वाहणारी पुनीत गंगा नदी, आसपासची सुरेख वनराई हे सारे पाहून नारदांचे मन तेथे रमले अन् ते त्या आश्रमात विष्णू

चरणाचे ध्यान करण्यात जे निमग्न झाले तो त्यांची समाधीच लागली. हरि स्मरणामुळे सदैव विचरण करण्याच्या शापातून ते तेवढा काळ आपोआपच मुक्तही झाले. ती त्यांची अविचल समाधी पाहून इंद्राला आपल्या इंद्रपदाची काळजी वाटू लागली अन् त्यांनी मदनास नारदांची समाधी भंग करण्यासाठी पाठवले. परंतु मदन हार मानून परत फिरला, उलट नारदांची स्तुती गाऊन त्यांची क्षमा मागून परत फिरला अन् इंद्रसभेत नारदांची विष्णूभक्ती व एकाग्रतेचा गुणगौरवच करु लागला. त्या प्रसंगानंतर नारद शिवाकडे गेले व मोठ्या अभिमानाने आपला मदन विजयाचा वृत्तांत त्यांना ऐकवला. तेव्हा शिवांनी त्यांना सावध करुन हे वृत्त विष्णूला न सांगण्याचा सदुपदेश दिला. पण 'अभिमान' नारदांना कसला स्वस्थ बसू देतो? उलट स्वत:हून हा आपला कामविजय सांगण्यासाठीच खास ते क्षीरसागरी नारायणाकडे गेले अन् ही सारी हकीकत त्यांना ऐकवली. ते ऐकून करुणानिधी भगवंतांनी आपल्या या लाडक्या भक्ताचे परम हित करुन त्याला अभिमान मुक्त करण्यासाठी एक विशेष लीला नाट्य करण्याचे ठरवले.

नारद तेथून निघाले तो वाटेत त्यांना अतिशय सुरेख अशी नगरी लागली. उत्सुकतेपोटी ते राजवाड्यात गेले तो शीलनिधी राजाने त्यांचे 'अगदी योग्यवेळी आलात' असे म्हणून आपल्या बल तेजानुसार थाटामाटात त्यांचे स्वागत व अतिथी सत्कार केला. त्या राजाची कन्या 'विश्वमोहिनी' हिच्या स्वयंवराची तयारी चालल्याने तिला नारदांपुढे आणून तिचे भविष्य नारदांना विचारले. नांवाप्रमाणे तिच्या रुपावर नारदांसारखे विरक्त ज्ञानी देखील मोहित झाले. अन् त्यांनी काही खरे काही बनावट असे तिचे भविष्य सांगितले.''हिचा पती रुप गुणशीलवान असेल त्याला कोणीही जिंकू शकणार नाही असा तो अजय व अमर असलेने सारे विश्व त्याच्या सेवेत राहील इ.इ.'' हा भविष्य कथनाचा कार्यक्रम उरकून बाहेर पडताच तिच्याशी लग्न करण्याचा विचार पक्का निर्णयात बदलला देखील. त्यामुळे 'कन्या वरयते रुपं' नुसार सुंदर रुप स्वत:ला मिळावे यासाठी विष्णूस्मरण केले. नारदांसारख्यांनी स्मरण करताच विष्णू प्रगटही झाले. त्याबरोबर त्यांनी सुंदर रुपाची मागणी केली. परंतु,

भगवंतांनी **'तुमचे परमहित आम्ही करु'** असे अभिवचन दिले. त्यातील खोच त्यावेळी नारदांना तिच्या प्राप्तीच्या लालसेपुढे कशी कळणार? आपल्याला अत्यंत सुंदर रुप मिळाले आहे असे समजून ते त्या स्वयंवरात जाऊन बसले. विश्वमोहिनी जयमाला घेऊन येताच पुन:पुन्हा उठून तिचे लक्ष वेधून घेऊ लागले. पण तिने त्यांचेकडे ढुंकूनही न पाहता विष्णूंच्या गळ्यात माळ घातली. अन् ते तिला घेऊन निघूनही गेले. नारदांच्यामागे बसलेले दोन विप्र नारदांकडे पाहून कुत्सित हसले. त्याबरोबर नारदांनी मला मुनीला हसता काय ? जा दोघेही राक्षस व्हाल असा शाप दिला. त्यानंतर बाहेर जाऊन पाण्यात पाहतात तो स्वत:चे 'मर्कट मुख' ! ते पाहताच त्यांच्या तळपायाची आग मस्तकास पोचली अन् पुढे जातात तोच नववधूसह विष्णू भगवान पाहिले. ते नवपरिणित पाहताच नारदांचा आणखीनच तीळपापड झाला अन् त्यांनी वाक्ताडन करण्यास सुरवात केली. ''तुम्हांला दुसऱ्याचे वैभव पाहवत नाही. तुम्ही अत्यंत कपटी, कुटील व व्देष्टे आहात. समुद्र मंथनाचेवेळी सर्व चांगल्या वस्तू लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजात इ. वस्तू स्वत:कडे घेतल्या आणि बिचाऱ्या भोळ्या महादेवाला हलाहल दिलेत. असे तुम्ही स्वार्थ व संधीसाधू आहात. मला माकड बनविलंत काय ? या माकडांच्या मदतीशिवाय तुमची कार्यपूर्ती होणार नाही आणि मला जसा स्त्री वियोग दिलात तोच स्त्री विरह तुम्हालाही सहन करावा लागेल.'' ही शापवाणी प्रभुंनी स्वीकारली अन् भगवान विष्णूंनी आपले नाटक संपविले. त्याबरोबर नारद भानावर आले. ना तिथे विश्वमोहिनी ना नवपरिणिता! स्मित करणाऱ्या शंख चक्र गदा पद्मधारी भगवंताना समोर पाहताच नारदांना अतीव दु:ख,पश्चाताप, लाज यांनी घेरले. माझा शाप खोटा ठरो व या अपराधास प्रायश्चित काय असे विचारताच विष्णू म्हणाले, हे मुने, तुमचा शाप कधीही खोटा ठरणार नाही. उलट तो माझ्या अवतार कार्यास पूरकच आहे. अन् तुमच्या सारख्या देवर्षी-ब्रह्मर्षींना या अपराधाचे प्रायश्चित म्हणजे फक्त शंभर वेळा **शिवनाम जप करा** अन् परत **विश्राम मिळवा**. कारण **मला शंकराइतके प्रिय इतर कोणीही नाही**. अशा या नारदांच्या शापामुळे रामावतार झाला व त्या दोन विप्ररूपातील रुद्रगुणांमुळे ते रावण व कुंभकर्ण बनले.

मनु शतरुपाख्यान –

त्यानंतर दुसरा हेतु रामावताराचा ती कथा अशी– मानव ज्यांच्यापासून निर्माण झाले ते मनु व शतरूपा हे प्रथम मानवी जोडपे. अत्यंत सात्विक, धर्मशील पुत्र कर्ता सवरता योग्य दिसताच या दोघांनी पुत्राच्या अनिच्छेने त्याचेवर राज्यभार सोपविला व वानप्रस्थ स्वीकारून दोघेही नैमिषारण्यात पोचले. त्या अत्यंत सिध्द व पवित्र तीर्थ क्षेत्र निवडण्यात हेतू असा की आपल्या तपश्चर्येचा हेतू सत्वर सफल व्हावा. या धर्मशील राजाच्या दर्शनार्थ अनेक ऋषीमुनी तेथे आले. या दोघांनी त्या सर्वांच्या साक्षीने मुनीवस्त्रे परिधान केली. तत्पूर्वी गोमतीत स्नान करुन बरोबरची सारी संपत्ती दान केली. अन् श्रवण-मंत्रजप-ध्यान या क्रमाने दोघेही निराहार राहून तपस्या करू लागले. अन् शेवटी निर्विकल्प समाधी अवस्थेत अनेक वर्षे गेली. अनेक देवदेवता त्यांना दर्शने-वरदानांची आमिषे घेऊन आल्या तरीही हे ढळले नाहीत की त्यांनी साधे डोळे उघडून त्यांचेकडे पाहीलेही नाही. शेवटी ज्या भगवंताला डोळे भरून पहावे अशी त्यांची इच्छा, तपस्येचे ध्येय होते ते पूर्ण झाले. भगवंतांनी आपल्या आगमनाची सूचना आकाशवाणीव्दारे उभयतांना देताच त्यांना विशिष्ट तेजस्वी कांती व दिव्य चक्षू प्राप्त झाले अन् त्याव्दारे त्यांनी प्रभुंचे सुंदर रुप पाहीले.

**सरोवरातून नुकत्याच उमललेल्या नीलकमलाप्रमाणे, नीलमण्याप्रमाणे तेजस्वी व श्यामवर्णी मेघाप्रमाणे कृपा बरसणारे श्रीराम व सीता समोर दिसले.** त्यांचे रूप व तेज कोट्यवधी मदनांच्या शोभेला लाजवेल असे होते. यापेक्षा वर्णन ते काय करु शकणार? त्यांना पाहताच दोघांनी आपल्या इष्ट दैवतास मनोभावे नमस्कार केला. प्रभूंनी आपला कृपाहस्त मनूंचे मस्तकावर ठेवला अन् स्मित करणाऱ्या प्रभूंनी दोघांनाही वर मागायला सांगितले. त्याबरोबर संकोचत दोघेही म्हणाले, ‘‘हे प्रभो, आपल्या सारखा पुत्र आम्हाला मिळावा’’ त्यावर प्रभु ‘तथास्तु’ तर म्हणाले पण म्हणाले, या संपूर्ण विश्वात माझ्यासारखा दुसरा शोधून कोण मिळणार ! तेव्हा मी स्वत: माझ्या अंशांसह तुमच्या पोटी जन्म घेईन. अन् मी येणार म्हटल्यावर माझी ही शक्ती महामाया सीता येणारच. मनु अत्यंत ज्ञानी होते. त्यांना भक्तीची अविरत

ओढहोती म्हणून त्यांनी प्रभूंकडून पुत्राविषयीची अपार ओढ मुद्दाम मागून घेतली इतकी की पाण्याविना मासा जगू शकत नाही तसे माझे जीवन पुत्राविना अशक्य असे करावे. तर शतरुपा ही साक्षात भक्ती. मूर्तीमंत भक्तीच असल्याने तिने भगवंताकडे ज्ञान-विवेक मागितला. त्यावरही प्रभूंनी 'एवमस्तु' ची मोहर उठवली अन् योग्य वेळी तुम्ही जेव्हा अयोध्येत दशरथ-कौसल्या म्हणून याल तेव्हा मी अंशासह तुमचा पुत्र होईन असे सांगितले.

प्रतापभानू आख्यान –

रामावताराचा तिसरा प्रमुख हेतु व त्याची ही कथा. सत्यकेतू नावाच्या राजाचा हा प्रतापभानू नावाचा मुलगा व धाकटा मुलगा अरि मर्दन. या जेष्ठ पुत्रास राज्यावर बसवून सत्यकेतू वनात तपस्या करण्यासाठी गेला. प्रतापभानूने दिग्विजय करुन सर्व पृथ्वीचे राज्य मिळवून तो 'सम्राट' अतिशय उत्तम आदर्श बनला. न्यायी व समृद्ध असे त्याचे राज्य होते. दिग्विजयाचे वेळी अनेक राजे आनंदाने त्याचे मांडलिक बनले.परंतु, एक राजा मात्र याचे बळ ओळखून नाईलाजाने, अनिच्छेने सूडाने याचेविरुध्द मनात वैरभावना धरुन योग्य संधीची वाट पहात बसला. जेव्हा एकदा प्रतापभानू शिकारीसाठी गेला तेव्हा त्या राजाने संधी साधली व त्याला स्वत; 'एकतनू' नामक तपस्वी असल्याचे भासवून त्याला 'अजर अमर' बनविण्यासाठी ब्राम्हण–वरदानाचे आमिष दाखवले पण प्रत्यक्षात ब्राम्हणाचा शापच प्रतापभानूला मिळेल अशी व्यवस्था केली. त्या शापामुळे प्रतापभानू दुर्बळ ठरल्यामुळे तो पराजित झाला व विप्रशापानुसार तो रावण व त्याचा धाकटा भाऊ कुंभकर्ण बानला. पण त्याचा जो सचिव होता तो धर्मशील व हरिभक्त असल्याने बिभीषण बनला. पण त्यांच्या अन्नावर पोसल्याने या दुष्टांच्या राज्यात राहाणे त्याच्या नशिबी आले.

रावणावतार व त्याचे साम्राज्य –

रावण जन्मातही त्याची पूर्वजन्माची अजर अमर होण्याची तीव्र वासना तशीच होती. त्यामुळे त्याच्या प्राप्तीसाठी रावणाने घोर तपश्चर्या केली. मग त्याचे बरोबर कुंभकर्ण, बिभीषणानेही केली. ब्रम्हदेवाने सृष्टीनियमानुसार अजरामर होण्याचे वरदान नाकारताच तुच्छ मानव व कपि यांचे शिवाय

कोणाकडुनही मृत्यू येऊ नये असे वरदान रावणाने मिळवले. तर कुंभकर्णाचा अजस्त्र महाकाय देह पाहून शारदेने त्याच्या वाणीत बदल करुन सहा महिन्याची निद्रा मिळण्याचे वरदान मिळवले. तर बिभिषणाच्या पूर्व संस्कारांना तपाने अधिकच उजाळा मिळाल्याने त्याने भगवंत चरणांविषयी विमल अनुराग मिळावा हे मागितले.

आता या वरदानाच्या बळावर रावण बलिष्ट असा राक्षसाचा राजा बनला त्याला भिऊन मयाने आपली परम सौंदर्यवती कन्या मंदोदरी त्याला दिली आणि सागरातील त्रिकूट पर्वतासारखा दुर्गम प्रदेश निवडून तेथे लंकेची रत्नजडीत सोन्याने मढवलेली राजधानी त्याने आहेर म्हणून सजवून रावणास दिली. रावण- दशानन बनून दहाही तोंडांनी (इंद्रियांनी) तो सुखोपभोग भोगू लागला. अगणित राण्यांनी अंत:पुर व अनेक पुत्रांनी त्याचे कुल जणू वटवृक्षासारखे विस्तार पावूं लागले. त्या सर्वांत मेघनाद हा अति पराक्रमी इतका, की त्याने इंद्रासही जिंकून घेतल्याने 'इंद्रजित' असे त्याला नांव पडले. हळूहळू संपूर्ण विश्वावर रावणाने आपले साम्राज्य गाजवायला सुरुवात केली. स्वत:चे प्रचंड बळ, सैन्य, पुत्र पौत्रादि व वरदान यामुळे त्याने देवधर्म तर सोडलाच, उलट जो कोणी भजन-पूजन यज्ञादी करेल त्या सर्व देव,ऋषी, मुनी यांना छळू लागला. सर्व देवांना त्याने आपले बंदी किंवा दास बनवले. अशा प्रकारे सारी पृथ्वी त्याचे भीतीने अत्यंत त्रस्त,व्याकुळ,दु:खी, दीन बनली. अन् बिचारी गायीचे रुपाने ब्रह्मदेवाकडे स्वत:च्या रक्षणाची, रावणापासून मुक्त होण्याची विनवणी करु लागली. परंतु ब्रह्मदेवांनी ही गोष्ट आपल्या कक्षेबाहेरची आहे असे सांगितले. यासाठी केवळ परब्रह्म, परमात्माच सर्वसमर्थ आहे असे सांगितले. त्याबरोबर प्रभुंची विनवणी करण्यास वैकुंठात जावे की क्षीरसागरात असे सर्व देवांमध्ये विचार मंथन सुरु झाले. त्याबरोबर शंकर म्हणाले, **तो परमात्मा सर्वव्यापक आहे. त्यामुळे तो सर्वत्र आहेच. अणूरेणूत तो भरलेला आहे. फक्त प्रेमाने, भक्तीने भावपूर्ण होवून त्याची प्रार्थना केली, सर्वस्व समर्पणभावे त्यास शरण गेले की तो लगेच प्रगट होतो हा माझा अनुभव आहे.** हे शंभूमत ब्रह्मदेवांसह सर्वांनाच आवडले. अन् ब्रह्मदेवांनी सर्व

देवांच्या उपस्थितीत शंकर वचनाची कृती साकारली. अन् सात्विक भावयुक्त होऊन परमात्म्याची स्तुती करायला प्रारंभ केला. ''हे सर्व देवांच्या अधिपते, शरणागत वत्सल,सुखदायक अशा भगवंता तूं गो, व्दिज, सुर यांचा हितकर्ता, लक्ष्मीरमण असा या पृथ्वीचा पालक आहेस, तू नारायण रुपे निर्गुण निराकार, सच्चिदानंद,अविनाशी आहेस तसा भक्तांसाठी सगुण साकार होऊन भक्तांचे भय संकट हरण करणारा आहेस. तेव्हा हे प्रभो, मनु शतरुपांना दिलेल्या वचनानुसार लवकर प्रगट व्हा. अन् त्या पृथ्वीसह सर्व ऋषी मुनी संत सज्जनांना भयमुक्त करा. त्या पृथ्वीचा भार हलका करा.'' ही स्तुती संपताच परमात्म्याने आकाशवाणीव्दारे सर्वांना आपल्या शक्ती व अंशांसह लवकरच प्रगट होण्याचे आश्वासन दिले. लगेच ब्रह्मदेवांनी पृथ्वीचे सांत्वन केले अन् प्रशांतमन झालेल्या देवांना ताबडतोब पृथ्वीवर वानर, वृक्ष, लता, कोळी, किरातादी रुपांनी परमात्म्याची सेवा करण्यासाठी जाण्याची आज्ञा दिली. सर्वांनी लगेच ती आज्ञा पाळली देखील.

रामजन्मोत्सव –

आता अयोध्येमध्ये रघुकुलाचे भूषण बनून दशरथ राजे राज्य करीत होते. धर्मशील, ज्ञानी,गुणी, शूर असून भक्तीपूर्ण अशा हृदयाचे होते. कौसल्या, सुमित्रा व कैकयीसह सर्व (सुमारे ७००) राण्या त्यांना अनुकुल असे प्रेमादरपूर्वक आचरण करणाऱ्या असून अत्यंत पवित्र व मुख्यत:राजांप्रमाणे भक्तीपूर्ण हृदयाच्या होत्या. सर्व राज परिवार ज्ञानी-भक्त व विनयी असा आदर्श होता. सर्व सुखे समृध्दी हात जोडून राजमहालात त्यांच्या सेवेत तत्पर होती. फक्त शांता नावाची एक कन्या सोडली तर इतक्या पवित्र कुलाचा वारसदार व राज्याचा उत्तराधिकारी असा एकही पुत्र मात्र नव्हता. अन् ही हृदयात सतत सलणारी बोच शेवटी दशरथांनी आपले गुरु वशिष्ठ यांचे कानी घातली. त्याबरोबर त्यांच्या सल्ल्यानुसार ऋषशृंग ऋषींच्या अध्यक्षतेखाली पुत्रकामेष्टी नावाचा यज्ञ राजाने अत्यंत भक्तीपूर्ण अंत:करणाने संपन्न केला. त्या श्रध्देचा गौरव करण्यासाठी प्रत्यक्ष अग्निनारायण हातात चरु किंवा पायस कुंभ घेऊन प्रगट झाले. तो प्रसाद दशरथाचे हाती देताच अग्निदेव अंतर्धान पावले. अन्

वसिष्ठादिंच्या साक्षीने दशरथाने आपल्या प्रमुख तिन्ही राण्यांना तो यज्ञीय प्रसाद दिला.त्या यज्ञीय प्रसादाचा शुभ परिणाम हळूहळू दिसू लागला. तिन्ही राण्या गर्भवती झाल्या. सर्वजणी विशेष अशा तेजस्वी, सात्विक, सौंदर्ययुक्त अशा दिसू लागल्या. पाहता पाहता प्रभु प्रगट होण्याच्या सर्व खाणाखुणा शुभ शकुन आसमंतात दिसू लागले.

चैत्र शुध्द नवमीचा दिवस उगवला. सर्वत्र शीतल,मंद,सुगंधी वारे वाहू लागले. देवांना आनंद व संत-सज्जनांत उत्साह भरला. सर्व वने अचानक प्रफुल्लीत झाली. पर्वतांवर रत्नांच्या खाणीतून टपाटप रत्ने, माणके यांचा सडा पडू लागला. शरयूसह आसपासच्या नद्यांचे पाणी अचानक अमृत-स्वाद घेऊन वाहू लागले. आकाशात देव-गंधर्व-यक्ष-किन्नरांची दाटी झाली. आकाशात दुंदुभीचे स्वर निनादु लागले. हळूहळू पंचांगातील लग्नवेळ, वार, तिथी,योग, करण ग्रह हे सर्व शुभ अनुकूल झाले हे पाहताच प्रभू प्रगट होणार हे जाणून प्रभूंच्या नरदेहात त्या त्या अवयवांचे ठिकाणी त्या त्या विशिष्ट देवतांनी आपले ठाण मांडले.

अन् कौसल्येच्या महालात अद्‌भूत चमत्कार घडला. तिचा महाल एका निळसर शांत सात्विक दिव्य प्रकाशाने उजळून निघाला. अन् तिच्या पुढे शंख चक्र गदा पद्म धारी असे चतुर्भुज विष्णू-नारायण प्रगट झाले. भगवंताचे ते मनोहारी रुप पाहताच कौसल्येचे हात आपोआप जुळले अन् तिच्या मुखातून स्तुती सुमनांनी प्रभूचे पूजन सुरु झाले. ''वेद-पुराणे देखील आपली स्तुती करताना थकतात कारण आपण ज्ञान-गुण माया यांच्याही सीमा पार आहात. तेथे मी एक सामान्य स्त्री आपली स्तुती कशी करु? समस्त ब्रह्मांडाचे पती (अनंत कोटी ब्रह्मांड नायक) असे आपण माझे हित करण्यासाठीच प्रगट झालात खरे. अशा त्या सर्व व्यापक प्रभूला मी माझ्या उदरात धारण करते असे म्हटले तर सारे विश्व माझी चेष्टा करेल'' हे म्हणताच प्रभुंनी मृदु-मंद स्मित केले अन् आपल्या विद्या मायेकरवी तिला पूर्व जन्मीची स्मृती देवून मातेच्या वत्सलतेने आज्ञा देण्यास प्रेरित केले त्याचबरोबर तिची भाषा तात्काळ बदलली. ती म्हणते. ''हे प्रभो, आपले हे रुप टाकून नवजात शिशूचे रुप धारण करा आणि टाहो फोडून रडा.'' या मातेच्या आज्ञेनुसार प्रभुंनी स्वेच्छेने गो-

विप्र-सुर संत हितार्थ चिदानंदमय देह धारण करुन नवजात शिशुरुपाने रडण्यास प्रारंभ केला. 'बालरुप रामचंद्र पूर्ण उगवला.'

शिशुच्या त्या रुदन स्वराने दशरथांची पूर्वजन्मस्मृती जागी होऊन हा परमात्माच आपल्या पुत्र बनून आला आहे हे जाणून दशरथ परमांनदाने तृप्त झाले व त्यानी अनेक शुभ वाद्यांचा गजर करण्याची आज्ञा दिली. त्याबरोबर सर्व राण्या, दास-दासी इतकेच नव्हे तर सर्व अयोध्येत एकच आनंद अभिनंदनोत्सव सुरु झाला. सारी अयोध्या गुढ्या, तोरणे, मंगल कलश, अक्षता, सडे, रांगोळ्या, मंगलारतींनी नटून थटून दशरथ पुत्राच्या स्वागतास सज्ज झाली. राजाचे भाट गाऊ लागले, सर्वत्र अत्तरांच्या सड्यांमुळे सुगंध आसमंतात दरवळू लागला. त्यात राजस्त्रियांसह सर्व शृंगारित युवतींच्या अंगउटींचाही सुगंध मिसळला. आकाशातून कल्पतरुच्या पुष्पांची वृष्टी होऊ लागली. अन् त्या आनंदात आणखी तीन शिशुंच्या जन्माची भर पडल्याने तो आनंद द्विगुणीत त्रिगुणीत होता होता चौपट झाला. वेदोक्त धार्मिक ज्ञान संस्कार व शांतीपाठांचे सुमंगल असे विप्रांचे पठण सर्वत्र निनादू लागले. अशा प्रकारे अयोध्येतील सर्व घरांचा जणू राजमहाल बनून प्रत्येकाकडे जन्मोत्सव सुरु झाला. प्रभुदर्शनासाठी राज स्त्रियांसह इतर सर्व स्त्रिया सर्वात भाग्यवान ठरल्या कारण त्यांना स्त्री देहामुळे बाळाना घेणे, कुरवाळणे, दृष्ट काढणे, ओवाळणे यामुळे जवळून स्पर्श सुखाचा आनंद लुटता आला. आपल्या वंशांची कीर्ती वृध्दी करणारा प्रभू आला आहे. हे जाणून सूर्य अयोध्येत महिनाभर होता तिथेच थबकून राहीला. मग हळूहळू संध्या व रजनी (रात्र) यांनी त्याला तेथुन हाकलून लावून आपली वर्णी लावली अन् प्रभू मुखावलोकनाचा आनंद लुटला.

त्यावेळी भविष्य सांगण्याच्या बहाण्याने शंकर व त्यांचा शिष्य बनून काकभुशुंडी यांनीही प्रभू -- दर्शन स्पर्शनाची सुवर्ण संधी नेमकी साधली. त्यावेळी जी जी व्यक्ती प्रभू – दर्शनासाठी आली त्या प्रत्येकास उदार दशरथ राजांकडून काही ना काही बक्षिस – नजराणा व भेट म्हणून मिळाले. प्रत्येकाने आपल्या आवडी नुसार हत्ती, घोडे, सुवर्ण, रथ, हिरे माणिक, जड जवाहिर गायी इ. हवे ते घेतले अन् प्रत्येकाने मनापासून बाळांना शुभाशीर्वाद दिले.

बारसे (नामकरण) मोठ्या थाटात झाले. वशिष्ठ कुलगुरुंनी

कौसल्येचा मुलगा ज्येष्ठ रघुकुलातला पुत्र त्याचे नांव 'राम' म्हणजे सर्वांना सुखानंद देणारा म्हणजेच विश्राम देणारा असे ठेवले. कैकेयीच्या पुत्राचे भरत म्हणजे संपूर्ण विश्वाचा (प्रेमाने) भरण पोषण करणारा असे नांव ठेवले. तर सुमित्रेच्या मोठ्याचे 'लक्ष्मण' म्हणजे सर्व शुभ लक्षणांनी युक्त उदार व साऱ्या पृथ्वीचा भार घेणारा म्हणून उदार (शेषावतारी) असे ठेवले. तर सर्वात धाकटा सुमित्रानंदन त्याचे नाव ठेवले शत्रुघ्न की ज्याचे स्मरण करताच 'अहंकार' या शत्रूचा नाश व्हावा. रामांची हुबेहूब प्रतिकृती म्हणजे भरत, तर लक्ष्मणांची तंतोतंत छबी म्हणजे शत्रुघ्न अशी श्यामवर्णाची एक जोडी- राम, भरत, तर गौर वर्णाची जोडी लक्ष्मण व शत्रुघ्न ही बालके हळूहळू महालातून बाहेर दुडूदुडू धावू लागली. वृध्दपणी झालेली रुप-शील-गुण खाणी असलेली ही बाळे सर्वांचीच लाडकी बनली. प्रत्येकालाच यांचे किती लाड़ कौतुक कोड करुं असे झाले! कौसल्या, सुमित्रा व कैकेयी यांना तर आभाळ ठेंगणे झाले कारण या बाळांना पाजवणे, न्हाऊ माखू घालणे, अंगाई म्हणून जोजवणे यात त्यांना दिवस कमी पडू लागला.

बालरामरुपवर्णन –

नीलकमलाप्रमाणे किंवा नीलवर्णी मेघाप्रमाणे अशा त्या घनश्याम रामांची अंगकांती कोट्यवधी मदनांना लाजविणारी अशी होती. कोमल,लाल पावलांवरील नखांतून ज्योतीचा प्रकाश असा झळकत होता की जणूं नीलकमलावर मोती ठेवलेले असावेत.तळपायांवरील ध्वज, ऊर्ध्वरेखा, वज्र इ. भगवत् चिन्हे सहज दिसत होती तर प्रभु कुशीवर वळतांना त्यांच्या पायातील वाळ्यांचे, घुंगरांचा मधुर रव (नाद) ध्यानस्थ मुनींचे ही मन मोहित करेल असा मधुर सुखद होता. त्यात करदोटा त्यांना लावलेले छोटे घुंगरु आपला सुमधुर नाद मिसळत होते. पोटावर तीन वळ्या आणि गंभीर खोल अशी नाभी. यांचे मर्म ज्यांना कळले ते भाग्यवंत होते! हातातल्या मनगट्या, बिंदल्या, बाजूबंद प्रभू स्पर्शाने शोभीवंत झाले होते. तर नेमके हृदयावर रुळणारे वाघ-नख प्रभु सौंदर्यात एक आगळीच भर घालीत होते. छातीवर रुळणाऱ्या मोत्यांच्या हारातील पदक तर सर्वांचेच मन आकर्षून घेत होते. त्याखाली लपलेले भृगुचरण चिन्ह हळूच मधूनच डोकावून दर्शन देत होते. सुंदर सौष्ठवपूर्ण मान,

गळा अन् हनुवटी कशा कशाचे अन् किती किती वर्णन करावे तितके कमीच! सुरेख श्रुती (कान), भव्य कपाळ, सरळ नासिका, नुकतेच उगवणारे दोन-दोन दात अन् या सर्वांची शोभा वाढवणारा तो चंदन तिलक अहाहा! काळे कुरळे कोवळे लुसलुशीत जावळ, त्याची तिन्ही मातांनी रोज वेगवेगळी केलेली आकर्षक केशरचना, अंगावरचे झिरझिरीत पारदर्शी पिवळे झोळदार, झोकदार कशिदा काढलेले झबले, दुडुदुडु रांगत अन् बोबड्या बोलांनी सारा राजवाडा दिव्य दृश्याच्या विविध रंगाने आणि नादाने जणू वेडावून गेला होता.

श्रीरामाच्या बाललीला -

एकदा रामांना न्हाऊ माखू घालून कौसल्येने त्याला पाळण्यात झोपवले अन् ती स्नान करून देवपूजेत मग्न झाली. पूजा संपल्यानंतर नैवेद्य दाखविण्यासाठी खाद्यपदार्थ आणण्यासाठी स्वयंपाकघरातून देवघरात येवून पाहते तो काय आश्चर्य ! राम नैवेद्य खाताना दिसला. म्हणून धाबरून पाळण्याकडे तिने धाव घेतली. बघते तो पाळण्यात गाढझोपेत गुलाम गालातल्या गालात हसताना दिसला. म्हणून परत देवघरात पाहते तो तेच दृश्य! असे एकाच वेळी दोन राम-रुपे पाहून तिला घेरीच आली. तिची ती व्याकुळता पाहून राम मधुर स्मित हसले अन् त्या हास्यातून विश्वव्यापक अशा आपल्या विश्वरुपाचा एक नमुना मातेला चुणूक म्हणून दाखविला. राम त्या नंतर थोडे खिन्न झाले व हात जोडून मातेला म्हणाले, माते ही गोष्ट कोणालाही सांगू नकोस हं, हे फक्त तुझ्या माझ्यातले गौप्य समज. त्यावर तिनेही राग सोडून विश्वपित्याला आपला पुत्र मानण्याच्या अपराधाबद्दल खेद व्यक्त केला आणि हे प्रभो, आता यापुढे तुझ्या या मायेने मला इतःपर भुलवू नको असे मागणे मागितले.

चारी गोंडस राजबिंडी बाळे आपल्या छोट्या मित्रपरिवारासमवेत विविध खेळ खेळण्यात गुंग होत असत. इतके की प्रत्यक्ष पिता बोलावू लागले तरी जेवायलाही येत नसत. कौसल्या माता बोलवायला आली की तिलाही ठुमक ठुमक पळत चुकवत असत. मातीत खेळून धूळ भरल्या अंगाची तमा न बाळगता सम्राट दशरथ त्यांना कडेवर घेई. उचलून आणून जेवायला घालत.

जेवता जेवता दहीभात भरल्या मुखाने तसेच पुन्हा ते सवंगड्याकडे खेळायला पळत. अशा त्यांच्या या अत्यंत सरळ (ऋजू) व मनोहारी बाललीलात गुंगलेल्या राजमहालास ते कुमार केव्हा बनले हे कळलेच नाही. इतके हे सुखानंदाचे दिवस झर्रकन उडून गेले.

हे चारी कुमार वसिष्ठांच्या आश्रमात मुंजीनंतर विद्याग्रहणासाठी गेले. अत्यंत अल्प काळात ते सारेच जण १४ विद्या ६४ कलांत पारंगत होऊन परतले.

राजमहालात आता या चारी कुमारांचा दिनक्रम असा होता. उष:काली शरयूवर स्नान-संध्यादि आन्हिके उरकून दररोज माता-पिता-गुरुजन यांना नमस्कार करायचा. फलाहार घेऊन राजांबरोबर दरबारात दररोज वेद-पुराण श्रवण करायचे. सायंकाळी त्या ऐकलेल्या कथेतील मर्म वा शंका निरसन राम लहान भावांना करायचे. तत्पूर्वी राजांबरोबर दरबारातील वा अन्य कामात पित्यास हातभार लावायचा. सर्व भाऊ व मित्रांसमवेत भोजन करुन पुन्हा माता-पिता व गुरुजन यांच्या आज्ञा अनुसरायच्या तर कधी राजाज्ञेनुसार शिकारीस जायचे. अशा प्रकारे हे चारी भाऊ राजकारभारातही हळू हळू निपुण होऊ लागले.

विश्वामित्र-प्रसंग –

एकदा विश्वामित्रांसारखा ज्ञानी महा-मुनी राजदरबारात प्रवेशतो हे कळताच मोठ्या सन्मानाने दशरथ विप्रपरिवारांसह त्यांचे स्वागत करुन त्यांना महालात घेऊन येतात. त्यांची अर्घ्य आसनादिंनी पाद्यपूजा, भोजन असा अतिथी सत्कार केल्यानंतर दशरथ त्यांना विचारतात. "हे मुनीवर, आपण इथवर येण्याचे कष्ट कां बरे घेतलेत? काही विशेष प्रयोजन?" नमस्कार करणाऱ्या चारी कुमारांपैकी रामांवर नजर रोखत विश्वामित्र राजाला म्हणतात, "राजन, मी आपल्याकडे आज याचक म्हणून आलो आहे. माझ्या यज्ञ सत्रात अनेक राक्षस बाधा आणीत आहेत. त्यांचा वध करुन धर्मकार्यात मला मदत म्हणून निर्विघ्नपणे माझे यज्ञसत्र पार पाडण्यासाठी हे तुझे दोन ज्येष्ठ पुत्र राम व लक्ष्मण यांची मी मागणी करीत आहे. तेव्हा पुत्र-मोहासारखे अज्ञान दूर सारुन या दोघांना मजबरोबर देण्यात तुझ्या कुळाची किर्ती व परम लाभ, तुझेच यात कल्याण आहे." इतके स्पष्ट सांगूनही दशरथ पुत्र-मोहाने कधी नव्हे ते

विश्वामित्रांना 'अविचारी' म्हणाले व वृध्दपणी झालेले हे दोन पुत्र सोडून भूमी-गायी-धनकोष किंबहुना माझे प्राणही मी देईन, पण राम-लक्ष्मण देणे शक्य नाही. ओठ पिळले तर दूध निघेल इतकी ही माझी कोवळी मुले कुठं आणि ते महाभयंकर क्रूर,धिप्पाड महाकाय राक्षस कुठं ?

जवळच असणाऱ्या हे सारे ऐकणाऱ्या कुलगुरु वसिष्ठांनी राजांची समजूत काढली आणि शेवटी आपल्या काळजावर दगड ठेवून दशरथांनी आपले प्रति प्राण असे राम-लक्ष्मण विश्वामित्रांबरोबर पाठवले. शरयू तीरापर्यंत स्वत: त्यांना निरोप देताना राजा विश्वामित्रांना म्हणतो, ''आता इथून पुढे तुम्हीच यांचे माता-पिता बनून काळजी घ्या हं! तुमच्या पूर्ण भरवंशावर या दोघांना तुमच्याकडे सोपवित आहे. ही माझी अनमोल ठेव मला अशीच परत करा हं !''

खांद्याला धनुष्य,पाठीला बाणांनी भरलेला भाता असे पितांबर कसून अगदी सदैव सज्ज सावध असे राम-लक्ष्मण विश्वामित्रांसमवेत अनवाणी निघाले. वाटेत त्राटिका किंवा ताटिका नावाची महाभयंकर राक्षसी सामोरी आली. त्याबरोबर विश्वामित्रांच्या आज्ञेबरहुकुम रामांनी तिला एकाच बाणात संपविली. पण दीनानाथ या आपल्या ब्रीद रक्षणार्थ प्रभुंनी तिला निजधामास पाठवले तेव्हा हे परब्रह्मच आपले नाथ ही खूणगाठ विश्वमित्रांना पटली. त्यानंतर मुनींनी दोघांनाही तहान भूक न लागता देहबल व तेज वाढवणाऱ्या बला व अतिबला या विद्या अर्पण करुन जणू त्या विद्यांचाच गौरव केला, त्या नंतर रामप्रभुंना आपल्या आश्रमात आणून महान अतिथी या नात्याने त्यांचा प्रथम सत्कार केला. मोठ्या भक्तीने प्रभूंना कंदमुळे-फळे भोजन म्हणून अर्पण केली. तसेच सर्व शस्त्रास्त्र विद्याही.

दुसरे दिवशी आपली आन्हिके उरकून राम-लक्ष्मण यज्ञ रक्षणार्थ धनुष्यबाण सज्ज करुन मुनींना म्हणाले, ''हे मुनीराज, आपण अगदी निर्भयपणे आपले हे यज्ञ सत्र करावे'' होमाचा धूर आकाशात दिसताच आलेल्या मारीच राक्षसास रामांनी एक बोथट बाण मारुन शंभर योजने दूर समुद्र किनारी फेकून दिले. अन् त्याच्याबरोबर आलेल्या सर्व सैन्याचा फडशा एकट्या

लक्ष्मणाने सहज पाडला. तर एकाच अग्निबाणाने सुबाहू राक्षसास रामांनी भस्म करुन टाकले. अशा प्रकारे विश्वामित्राचे हे यज्ञकार्य निर्विघ्नपणे पूर्ण झाले. त्यानंतर विश्वामित्रांसमवेत अनेक दिवस राम-लक्ष्मण त्यांच्या आज्ञेनुसार तेथेच त्या आश्रमात राहिले. दररोज मुनींकडून पुराणातील कथा वगैरे हे दोघे कुमार श्रवण करीत असत. त्याचवेळी विश्वामित्रांना मिथिला नगरीच्या जनक राजाची एक निमंत्रण पत्रिका आली. त्यासाठी राम-लक्ष्मणांसह विश्वामित्र मिथिलेकडे निघाले धनुष्य-यज्ञ पाहण्यासाठी.

वाटेत एक आश्रम लागला पण तो अगदी निर्मनुष्य इतकेच नव्हे तर त्या आश्रम परिसरात एकही प्राणी-पक्षी-जीव-जंतू काहीच नव्हते. परंतु फार पूर्वी आश्रम असल्याच्या साऱ्या खाणाखुणा तर दिसत होत्या. तेव्हा साहजिकच राम-लक्ष्मणांनी त्या विषयी विचारताच विश्वामित्र म्हणाले गौतम व अहिल्या यांचा हा आश्रम. अहिल्येचा पातिव्रत्य-भंग इंद्राने कपटाने केला. परंतु रागाच्या भरात गौतमांनी तिला शिळा होण्याचा शाप दिला. नंतर आपली चूक ध्यानी येताच उ:शाप दिला की, 'रामांच्या चरणरजाने तू पूर्ववत होशील' तेव्हा हे रामा, हिचा उध्दार करावा. ही तुमचीच वाट पहात गेली कित्येक वर्षे तुमच्याच ध्यानात मग्न आहे. ही प्रश्नोत्तरी संपताच एका वाऱ्याच्या झुळुकीसरशी रामांची चरणधुली त्या शिळेला स्पर्शताच तप:पुंज अशी अहिल्या समोर प्रकट झाली. अन् तिने रामांची हात जोडून भरल्या नेत्रांनी स्तुती करायला सुरुवात केली- 'हे प्रभो, माझ्यासारख्या अपावन स्त्रीला आपण आज पावन केलेत. पतींचा हा शाप म्हणजे आज हा आपला कृपानुग्रहच ठरला. कारण त्यामुळे (मी एकांतात आपल्या ध्यानात निमग्न राहून अखंड आपलेच अनुसंधान करीत राहिले. प्रार्थना करीत राहिले.) आपणास प्रत्यक्ष पाहण्याचे भाग्य मला लाभले. शंकरांना प्रिय आणि गंगेला ज्याचा परम लाभ मिळाला तो आपल्या चरण स्पर्शाचा आज मला लाभ घडला. तेव्हा हे रघुवीरा, मला माझ्या पतीचे प्रेमच परत मिळावे हा वर द्या.' त्याबरोबर रामांनी दिलेल्या वरदानानुसार ती पतिलोकाकडे गेली देखील.

पुढे हे तिघे गंगातीरावर पोचले. गंगेचे दर्शन, मार्जन, मज्जन (स्नान) दान पान करुन राम-लक्ष्मण संतुष्ट झाले. रामांनी तर मनोमन त्राटिका व

अहिल्या या दोन स्त्री स्पर्शाबद्दल गंगेकडे क्षमापराधन केले. तेव्हा कुठे ते मनाने शांत झाले. विश्वामित्रांनी सूर्यवंशी भगिरथ राजाने अपार तपस्या करुन गंगा स्वर्गातून पृथ्वीवर आणल्याची सविस्तर कथा राम-लक्ष्मणांना ऐकवली. मजल दरमजल करीत हे त्रिकूट मिथिला नगरीच्या अगदी जवळ येऊन पोचले.

## मिथिलानगरीचे सौंदर्य –

मिथिलेत प्रवेश करताच त्या नगरीच्या रमणीयतेने रामांसह लक्ष्मणांनाही विशेष आनंद झाला. कारण नगरात ठिकठिकाणी तलाव, विहीरी इ. होत्या. त्यातील पाणी स्वच्छ-शीतल-मधुर होतेच शिवाय त्यांच्या पायऱ्या रत्नजडित होत्या. त्यात विविध रंगी सुवासिक कमळे फुललेली असून त्यावर भुंगे गुंजारव करीत होते. त्यावरुन येणारा वारा सारे वातावरण सुंदर बनवित होता. ठिकठिकाणी बागा,उद्याने यांची रचना अतिशय मनोहारी होती.सुंदर, स्वच्छ रस्ते, आकर्षक बाजार, चौक लहान रस्ते, गल्ली, बोळ सर्वत्र स्वच्छता व सौंदर्य यांचेच दर्शन घडत होते. सर्वच स्त्री पुरुष सुसंस्कृत दिसत होते. राजवाडा, त्यातील अधिकाऱ्यांची घरे, हत्ती, घोडे, रथ यांची व्यवस्थाही अशीच सुरेख होती. धनुर्भगा करता येणारे व आलेले विविध देशातील राजे नगराबाहेरील विविध जलाशयांच्या काठी उतरले होते. – जनकांनी तशी खास व्यवस्थाच केलेली होती. एकूणात संपूर्ण सर्वच टिकाणी सोने, रत्ने अशा जड जवाहिरांची खैरात दिसत होती. यावरुन नगरीची समृध्दी व रसिकता सहजपणे नजरेत भरत होती. अशा प्रकारे नगराच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकाशी येताच तेथे सुंदर आमराई दिसली. विश्वामित्रांनी राम-लक्ष्मणांना तिथेच उतरण्याची आज्ञा केली.

## जनकांकडून विश्वामित्रासह राम लक्ष्मणांचे स्वागत –

विश्वामित्र महामुनी नगरात प्रवेशल्याचे कळताच राजा जनकाने अनेक ब्राह्मण व उत्तम अधिकाऱ्यांसह त्यांचे स्वागत केले. वारंवार कुशल विचारले. तोपर्यंत जवळची फुलबाग बघायला गेलेले राम-लक्ष्मण तेथे आले. त्यांना पाहताच ज्ञानी-विरागी जनक विदेह बनले अन् आजवर योगात लपलेल्या भक्तीने डोके वर काढले. राम-दर्शन होताच त्यांचे अष्टसात्त्विक भाव प्रगट

झाले. चकोर जसा चंद्रकिरणपान करण्यात पूर्ण गुंगतो तसे विदेह रामांना पाहताच मग्न झाले. विश्वामित्रांकडून राम-लक्ष्मणांचा परिचय होताच जनक राजांनी विश्वामित्रांसह त्या दोघा सम्राट राजकुमारांना घेऊन एका खास सुंदर, सर्व प्रकारे सुखद अशा महालात घेऊन गेले व त्या सर्वांची राहण्याची व्यवस्था त्या महालात केली. राजाने त्या महालात गेल्यानंतरही पुन्हा विश्वामित्रांचे पूजन केले. सर्वांच्या भोजन व विश्रामाची उत्तम व्यवस्था ठेवली.

## राम-लक्ष्मणांचे नगर दर्शन –

राजकुमारांच्या जिज्ञासेने उत्तम नगरीचे प्रत्यक्ष दर्शन त्यांना स्वस्थ बसू देईना. लक्ष्मणांची सर्व नगरी आतून पाहण्याची उत्सुकता जाणून मुनींच्या आज्ञेने राम-लक्ष्मणांना मिथिला दाखवायला बाहेर पडले. तर या अतीवं सुंदर सुकुमार राजपुत्रांना पाहण्यासाठी सर्व नगरजन हातातली कामे टाकून धांवू लागले. स्त्रियांनी गच्चांवर गर्दी केली. अन् प्रत्येकीच्या मनात सीतेच्या उद्याच्या स्वयंवरात हा सावळा रामच तिला शोभून दिसतो. स्वयंवराचा पण बाजूस सारून राजे याचीच अचानक जावई म्हणून निवड करोत असे आपआपल्या इष्ट दैवतास विनवूं लागल्या. शिवाय त्राटिका-वध, अहिल्योध्दारामुळे यांच्या शौर्याबद्दलही सर्वांना विश्वास वाटू लागला. त्यामुळे स्त्री वर्गाने तर सीता-रामांची जोडी पक्की जमवूनच टाकली. नगरशोभा पहात पहात दोघे नगरीच्या पूर्वेस जेथे खास धनुर्मख मंडप केला होता, त्याचे बारकाईने निरिक्षण करु लागले. मोठ्या शामियान्याच्या बरोबर मध्यभागी पांढऱ्या शुभ्र फरशीच्या वेदिकेवर (स्टेज) ते धनुष्य ठेवण्याची जागा नियोजित केली होती. त्यामुळे कोठूनही ते स्पष्टपणे दिसेल अशीच सर्वत्र बैठक व्यवस्था होती. खास राजे लोकांसाठी सुवर्ण मंचक, त्या मागे थोडे उंच मंडलाकार सर्व नगरजन, त्याच्या जवळ स्त्रियांचा कक्ष, वर्णव्यवस्थेनुसार व अधिकारानुसार उचित अशी सर्व बैठक व्यवस्था अत्यंत शिस्तबध्द होती. लहान बालकांनी या राम-लक्ष्मणांना अगदी घेरून टाकले होते. नगर दाखविणेचे निमित्ताने त्यांना स्पर्श करीत, क्वचित त्यांचे उपरणे, पीतांबर याला हात लावीत होते. प्रभु दर्शन व प्रत्यक्ष स्पर्शाचे बाबतीत ही बाल-चमू अतिशय भाग्यवान ठरली खरी !

<u>पुष्पवाटिका –</u>

नगर दर्शनानंतरचा दिवस उजाडल्यानंतर विश्वामित्रांच्या आज्ञेनुसार राम व लक्ष्मण राजाच्या खास फुलबागेत मुनींच्या पूजेसाठी फुले आणायला गेले. प्रथम सर्वत्र फिरुन त्यांनी सारी बाग पाहिली. मध्यभागी असलेले सुंदर तळे, त्याच्या रत्नजडित पायऱ्या, तळ्यातले स्वच्छ सुंदर पाणी त्यातल्या विविध प्रकारच्या कमळांनी सुवासिक बनलेले. सभोताली अनेक प्रकारच्या फळ-फुलांनी लगडलेले वृक्ष, त्यावर चढलेल्या सुंदर आकर्षक व सुगंधी फुलांच्या वेली, अनेक ठिकाणी लताकुंज बनवलेले त्या आसमंतात अनेक प्रकारच्या पक्ष्यांचे कूजन. या साऱ्या दृश्य,परिमल व नादाने दोघेही अत्यंत आनंदित झाले.तेथील माळ्यांच्या परवानगीने पूजेसाठी फुले तोडूं लागले. तेथीलच पानांचा सुरेख द्रोण करुन त्यात आकर्षक रचना करीत फुले,तुळस,बेल,दुर्वा ठेवू लागले. फुले तोडण्याच्या श्रमानेही रामाच्या भव्य कपाळावर घामाचे बिंदू चमकूं लागले पण तेही त्यांच्या सौंदर्याची शोभा अधिकच वाढवू लागले.

<u>सीता प्रवेश –</u>

त्याचवेळी आईच्या आज्ञेनुसार कुलपरंपरेस अनुसरुन सीता आपल्या सखी-परिवारासह त्या बागेत गौरी पूजनासाठी आली. त्या सुंदर तळ्याजवळच पार्वतीचे ते रम्य मंदिर होते. प्रथेनुसार त्या तळ्यात सीतेने स्नान केले अन् गौरी दर्शनासाठी ती निघाली. तोच तिच्या बरोबरच्या सख्या इकडे-तिकडे विखुरलेल्या, तिच्याजवळ येवू लागल्या. तो प्रत्येकीचे चेहरे विशेष आनंदाने फुललेले, काही शुभ समाचार देत होते. त्या सख्यांनी फुले तोडणाऱ्या या दोन राजकुमारांना पाहीले. पण त्यांचे त्या सख्यांना यथोचित नेमके वर्णन करता येईना कारण दोघांचेही रुप-तेज-कांती सारेच शब्दातीत होते. त्यामुळे सीतेचीही उत्सुकता शिगेस पोचली. सखींच्या सांगण्यावरुन सीताही लाजून-लपून त्या दोघांकडे पाहू लागली. लताकुंजा आडून डोकावणाऱ्या सीतेच्या नुपूर व कंकणांच्या मधुर किणकिणाटाने रामांची दृष्टी तिकडे वळली अन् सीतेच्या अलाकिक सौंदर्याने त्यांचे मन क्षुब्ध झाले. **सौंदर्यालाच सौंदर्य बहाल**

**करणाऱ्या महालात शांत तेवणाऱ्या दिव्याच्या मंद ज्योतीप्रमाणे सात्विक तेजाने दिव्य प्रकाशणारी सीतेची छबी पाहून राम तिच्याकडे एकटक पहातच राहिले. जणूं तो सौंदर्याचा अपार असा ठेवा आपल्या डोळ्यात ते साठवीत राहिले.** सीतेचीही तशीच अवस्था झाली. परंतु स्त्री सुलभ लज्जेमुळे ते सौंदर्य तिने आपल्या मिटल्या डोळ्यांनी अंतःचक्षूत साठवून, अगदी भरुन ठेवले. म्हणजे ते हवे तेव्हा हवे तितका वेळ न्याहाळता येईल हे ओळखून!

सावळ्या रामचंद्रांनी तर प्रेमाचीच शाई करुन आपल्या हृदयाच्या भल्या मोठ्या भिंतीवर (कॅनव्हास) तिचे चित्र हुबेहूब कायमचे कोरून सजवून ठेवले. अशा प्रकारे ब्रह्म-माया यांची प्राचीन प्रीती अबोलपणे दोघांनीही एकमेकांकडे जपून साठवून ठेवली. वेळेचे भान राखून राम-लक्ष्मण तेथून निघाले अन् सीताही सखींसह गौरी-पूजनासाठी मंदिराकडे वळली.

सीतेचे गौरी पूजन -

गौरीचे दर्शन सीतेने घेतले अन् तिच्या पायी आपले मस्तक नमवून हात जोडून सीता तिला प्रार्थना करु लागली. 'हे गिरीवर राजकुमारी तू जशी महेशांच्या प्राप्तीसाठी आसुसली होतीस तशीच मी या आता पाहिलेल्या सावळ्या रुपावर भाळले आहे. तू केवळ गजानन, षडानन यांचीच नव्हे तर जगताची माता आहेस. तेव्हा या आपल्या कन्येचा मानस तू सर्वज्ञ सर्वांतर्यामी असलेने जाणतेसच. तेव्हा हे वरदायिनी, शिव प्रिये माझे एवढे हे मनोरथ पूर्ण कर''. असे गौरीस विनवून सीता विदेह (देहभानरहित) बनली.

विनवलेले मस्तक वर उचलताच गौरीच्या गळ्यातली माळ सीतेच्या गळ्यात पडली.त्याबरोबर सीतेने चमकून गौरीकडे पाहिले तो ती स्मितहास्य करीत असलेली दिसली. यापुढे जाऊन प्रत्यक्ष वाणीनेही गौरीने सीतेस आशीर्वाद दिला. गौरी म्हणते. – ''ज्या सुंदर सावळ्याचा तुला ध्यास लागला आहे ना तो तुला मिळेल बरं! नारदांनी तुला बालपणीच तो आशीर्वाद देऊन ठेवला आहे. त्यांचा आशीर्वाद खरा होणारच.'' अशा गौरीच्या या कृपा

प्रसादाने सीता आनंदाने भरून पावली. इतकेच नव्हे तर तिचे डावे अंग स्फुरण पावून शुभ--शकुनही झाले.

रामांनी केलेली सीता सौंदर्य स्तुती –

तर तिकडे रामांनी आपल्या मनीचे सारे भाव लक्ष्मणाजवळ अतिशय सरळपणे प्रगट केले आणि तसेच विश्वमित्र महामुनींजवळहा रात्री खिडकीतून डोकावणाऱ्या चंद्राकडे पाहून झोपताना राम लक्ष्मणास म्हणतात, 'हा उगवलेला पूर्ण चंद्र सीतेच्या सुंदर मुखासारखा दिसतोय, नाही का? पण सीतेची चंद्राशी तुलनाच होऊ शकत नाही. कारण हा खाऱ्या पाण्याचा समुद्रातून आलेला, विष याचा भाऊ, शिवाय यात असणारा कलंक अन् त्याहीपेक्षा हा पौर्णिमेपर्यंत वाढतो तर नंतर कमी कमी होतो. राहू याला ग्रासतो आणि सर्वात वाईट म्हणजे विरहीजनाना हा अतिशय दुःख देतो.' त्यानंतर उत्तररात्री थोडा वेळ सीतेच्या सुख स्वप्नातच रामांची रात्र संपली.

धनुर्यज्ञ –

उजाडण्यापूर्वी राम-लक्ष्मणांनी आपली आन्हिके उरकली. तोवर जनकांकडून खास आमंत्रण आलेच. मग विश्वामित्रांसह राम-लक्ष्मण या धनुर्यज्ञ मंडपाकडे निघाले. त्या स्वयंवराच्या रंगभूमीत या त्रयीने प्रवेश करताच सर्वांच्या नजरा राम-लक्ष्मणावर खिळून राहिल्या. **ज्याची जशी भावना तसे त्यास राम दर्शन** असा अद्भूत चमत्कार घडला.

रणशूर राजांना राम 'मूर्तीमंत वीररस' दिसले. जे कुटीलबुध्दी होते. त्यांना रामांना पाहून भीतीच वाटली. तर जे राक्षस कपटाने राजांचे रुप घेऊन आले होते, त्यांना राम म्हणजे आपला मृत्युच वाटला. मिथिलेतील सर्व नगरजनांना दोन्ही राजकुमारांना पाहून आज आपले नेत्र कृतार्थ झाल्याचे सुख झाले. तर मिथिलेतील स्त्रियांना वाटले हे तर 'मूर्तीमंत शृंगार!' जे ज्ञानी होते त्यांना रामांचे विराट पुरुषरुपात दर्शन घडले. तर जनक राजाला हे आपल्या अगदी जवळचे सगे–सोयरे असल्यासारखे भासले. तर तेच जनक सुनयना म्हणजे पत्नीसह जेव्हा या श्यामल-गोऱ्या जोडीकडे पहात तेव्हा त्यांना लहान बालकाप्रमाणे त्यांच्याबद्दल वत्सल ओढ वाटे. तेथे जमलेल्या ऋषी-मुनी

योग्यांना हे शांत-शुध्द-स्वयंप्रकाशी आत्मतत्त्व असल्याचे जाणवले. तर त्यापैकी भक्तीत सदैव रमलेल्यांना त्यांच्या त्यांच्या इष्ट दैवताचे त्यांच्यात दर्शन घडले. सीता जेव्हा हळूच लाजून सर्वांची नजर चुकवून रामाकडे पहात असे तेव्हा तिला भावलेला तो स्नेह, ते सौख्य शब्दांत कसे बरें वर्णन करावे – ते केवळ अवर्णनीयच ! ती स्वत:देखील ते शब्दबध्द करणे अशक्य कारण तो तिचा 'भावानुभव' असल्याने तिची ही अशी भाव विवश मूक–दशा तर कोणता कवी त्याचे वर्णन करूं शकेल?

## स्वयंवर मंडपात राम-लक्ष्मण कसे शोभून दिसत होते –

राम व लक्ष्मण सहज सुंदर होते म्हणून ते सर्वांचे मन वेधून घेत होते. शरद पौर्णिमेला वा चंद्रालाही लाजवेल असे त्यांचे मुख होते. मेघ जसा पाण्याने भरलेला असावा तसे यांचे नेत्र कृपेने भरलेले असे तेजस्वी, टपोरे होते. त्यांची दृष्टी ज्याचे ज्याचेवर म्हणून पडेल त्या त्या जीवाला अत्यानंद होई. कानांत डुलणाऱ्या कुंडलांच्यामुळे कान व गालांची आभा अधिकच सुंदर दिसत होती. रेखीव हनुवटी, व लाल चुटुक सुंदर ओठांवाटे बाहेर पडणारे मृदु बोल, ओठ विलगून ते हसले की जणू चंद्रकिरणांनाही लाज वाटावी इतके आल्हादक सुहास्य! बाकदार भुवया व सरळ नाक भव्य कपाळावर अधिक शोभून दिसणारा चंदन-तिलक केसांकडे पाहून भुंग्यांनीही लाजावे असे काळेभोर मुलायम केस त्यावर पीतवर्णी चौरंगी टोपी अन् त्यात मध्ये खोवलेले पुष्पगुच्छ वा फुलांच्या कळ्या. शंखाकृती गळ्यावर सुंदर तीन रेघा. त्या गळ्यात शोभणारे गजमुक्तांचे हार, हृदयावर रुळणारी तुळशीची माळ, पुष्ट बैलासारखे भरदार खांदे, सिंहासारखी चालण्याबोलण्याची ऐटबाज ढब, आजानुबाहू (गुडघ्याखालपर्यंत असणारे हात), कमरेला पीतांबर, डाव्या खांद्यावर धनुष्य व हातात बाण, खांद्यावरुन ओघळणारे वा रुळणारे पिवळसर जानवे, असे सुंदरतेचे सर्वच्या सर्व निकष या दोन्ही राजकुमारांत एकवटलेले पाहून सर्वांची नजर सतत त्यांचेवर खिळून राहीली होती. इतकी की पापणी लवली तर तितकाही विरह नको म्हणून सर्वांनी पापणी न लवता पाहण्याचा छंद लावून घेतला. तेव्हा साऱ्यांची दर्शन लोलुपता जाणून प्रभूंनी एक सहज लीला केली.

त्यामुळे प्रत्येकाला राम आपल्या समोरच बसले आहेत असे दृश्य दिसू लागले.

स्वयंवर मंडपातील सीता –

सखींच्या मंडलाने वेढलेली सीता नवीन सुरेख साडी नेसून अनेक प्रकारच्या दाग-दागिन्यांनी नटून, हातात जयमाला घेऊन जेव्हा स्वयंवर मंडपात प्रवेशली तेव्हा तिच्या त्या सौंदर्याच्या प्रभेने- चैतन्याने सारा मंडप उजळून निघाला. तिच्या त्या मोहक सौंदर्याने सर्व पुरुषच नव्हे तर स्त्रियासुध्दा मोहित झाल्या. रुप-गुणांची खाण असलेली ही जगज्जननी. तिला देण्यायोग्य उपमाच नाही. कारण आजवरच्या सर्व काव्यांत सुंदर-युवतीस देऊन देऊन साऱ्या उपमा उष्ट्या शिळ्या झाल्या आहेत. अशा उपमा सीतेस देणे म्हणजे तिच्या सौंदर्याचा अपमानच करणे नाही कां? भवानी, लक्ष्मी, देहधारी परम सुंदरता छे! कुठलीच उपमा चपखल बसत नाही. प्रत्येकात काही तरी न्यून हे आहेच. तेव्हा सौंदर्यालाच सौंदर्य बहाल करणारी, सुंदरतेचे-बीजरुप अशी ही सीता-सीतेसारखीच आहे. बस्स यापेक्षा काय सांगावे? लज्जेने तिच्या त्या नैसर्गिक सुंदरतेस आणखीनच शोभा आणली होती. कोट्यवधी स्त्रीयांना लाजवेल अशी ती सीता. पुष्पवाटिकेत पाहिलेले रामरुप डोळ्यात साठविलेले पुन:पुन्हा आठवून सर्व देवांना मनोमन रामच पती मिळावेत ही प्रार्थना करीत होती. तर त्या स्वयंवर मंडपात प्रत्येकाचा नजरबंदीचा बदलता अभिनव खेळ सुरु झाला. एकदा नजर राम-लक्ष्मणांवर तर एकदा त्या सौदर्यवती सीतेवर!

धनुर्भंग –

मध्यभागी ठेवलेल्या त्या शिवधनुष्याकडे अंगुली निर्देश करीत जनकाच्या बंदीजनांनी घोषणा करविली. ''ह्या शिवधनुष्यास जो प्रत्यंचा लावेल, त्याच्या गळ्यात ही आमच्या जनक महाराजांची राजकुमारी जयमाला घालेल''.

त्याबरोबर एकेक शूर-वीर सज्ज होवून सरसावून मोठ्या थाटात, दिमाखात ऐटीने पुढे येवू लागले. पण ते धनुष्य जागचे हलेना. रावण,सहस्त्रार्जुन यासारखे महाबलाढ्य, पराक्रमी राजे पराभूत होऊन खाली

मान घालून परतू लागले. दहा हजार राजांनी एकत्रपणे उचलण्याचा प्रयत्नही विफल ठरला. साऱ्या मंडपात निरव शांतता पसरली. कोणी आपल्या आसनावरून उठण्याचेही आता धाडस करेनासे झाले. बराच वेळ वाट पाहून शेवटी जनक राजे स्वत: आपल्या आसनावरून उठून म्हणाले, "या पृथ्वीतलावरचे सारे शूर-वीर संपले काय? हा पण करुन जणू आज मला पश्चाताप होतो आहे. माझे सारे पुण्य संपुष्टात आल्यासारखे वाटते. माझी कन्या कुमारीच राहणार असे दिसते. आज ही सारी पृथ्वी वीर-विहीन झाल्याचे मी घोषित करतो".

हे जनकांचे भाषण ऐकले मात्र, अन् लक्ष्मणांचे डोळे रागाने लालीलाल झाले. भुवया चढल्या आणि ओठ रागाने थरथरु लागले, उठून ते म्हणाले- जनकांसारख्या सुजाण-ज्ञानी राजास हे बोलणे शोभत नाही. ज्या सभेत रघुवंशी (श्रीराम) आहेत अशा सभेला वीर विहीन म्हणणे हा रघुवंशाचा अपमान आहे. या जीर्ण धनुष्याची बातच सोडा, मी गर्वाने म्हणून बोलत नाही, पण गुरुजनांची आज्ञा झाली तर कमळदेठापासून कमळ अलग करावे तितक्या सहजपणाने हे जीर्ण धनुष्य हाती घेऊन पृथ्वी प्रदक्षिणा करुन येईन. सारे ब्रह्मांड चेंडूसारखे उचलून कच्च्या मडक्याप्रमाणे फोडून टाकीन, मेरुपर्वताचे राई राई एवढे तुकडे करीन. हे लक्ष्मणांचे क्रोधांगार फुललेले पाहून व त्यांचा तो रुद्रावतार पाहून सारे सभासदच नव्हे तर सारी पृथ्वी भयाने डोलू लागली. हळूच रामांनी डोळ्याच्या खूणेने लक्ष्मणांना आपल्या जवळ प्रेमाने बसविले. पुन्हा सर्व मंडपात निरव शांतता पसरली. त्या शांततेचा भंग केला विश्वामित्रांनी, म्हणाले "हे रामा, आता आपण उठा अन् या शिवधनुष्याचा भंग करुन, जनकांचा परिताप (पश्चाताप) चिंता इ. सारे दूर करा." ही गुरुवाणी ऐकताच राम सहज उठून उभे राहीले. त्या उठण्यात, उभे राहण्यातही सिंहाची ऐट होती पण ती अगदी सहज, त्यात अभिमानाचा लेशही नव्हता. हळूहळू रामांची पावले जशी धनुष्याप्रत जाऊं लागली तशी प्रत्येकाच्या मनात प्रार्थना सुरु झाली कारण तिथल्या सर्व सुजनांनी राम-सीता यांची जोडी मनोमन जमवलेलीच होती. तो प्रत्येकाचा मनोरथ आता रघुवीरांच्या पावलागणिक भरधांव दौडू लागला.

## सीता मातेची व्याकुळता –

सीता माता सुनयना हिच्या नजरेत राम-लक्ष्मण सुकुमार, सुकोमल बालकेच होती. त्यामुळे अति स्नेहाने तिच्या हृदयाची घालमेल सुरु झाली. ती आपल्या जवळच्या सखीला म्हणते, ''रावणासारखे महापराक्रमी सुध्दा ज्या शिवधनुष्याला जागचे हलवू शकले नाहीत, तिथे या बालकांकडून हे प्रचंड कार्य अपेक्षणे म्हणजे राजहंसाच्या पिलाने मंदार पर्वत उचलणेच आहे. इतके ऋषीमुनी-ज्ञानीजन इथे बसले आहेत, जनकांच्या या वेड्या राजहट्टामुळे या कोवळ्या बालकांना बळी देण्याचा हा क्रूर खेळ त्यांना थांबवायला कोणीच कसे सांगत नाही?'' त्यावर महाराणीची सखीच ती, मोठ्या चतुरपणे राणीस निरुत्तर करुन तिचे समाधान करते. ती म्हणते, ''देवी, ही बालके म्हणजे मूर्ती लहान पण कीर्ती महान अशी आहेत. ते सहजी हे शिवधनुष्य पेलतीलच. अहो, अगस्तींसारखा एवढासा मुनी पण अफाट समुद्र प्यायलाच नां? उगवणारे सूर्यबिंब एवढेसे बचक्यात मावेलसे दिसते पण त्रिभुवनाचा अंधार उदयाबरोबर नष्ट करते नां? मंत्र अगदी छोटासाच एकाक्षरी ॐ सुध्दा ब्रह्मा-विष्णू-महेशांसह सर्व देवांना वश करतो की नाही? महाकाय हत्ती, पण एवढासा अंकुश त्याला वठणीवर आणतो की नाही? यांच्यासारखे अति सुकोमल उदाहरण सांगू ? म्हणजे तुम्हांला नक्की खात्री वाटेल. पुष्पांच्या कोमल धनुष्यबाणाने मदन सारे त्रिभुवन वश करतो नां?'' या शेवटच्या उदाहरणाने महाराणीस थोडा दिलासा मिळाला.

## सीतेची मानसिक आंदोलने –

हे शंकरा - शिवा मजवर कृपा करा अन् या धनुष्याची जडता कमी करा. हे भवानी, वरद विनायका तुम्हा सर्वांना विनविते, हा धनुष्याचा जडपणा हलका करा. हे तात् (बाबा)! कसा असा भयंकर पण तुम्ही ठरविलात? आपण इतके ज्ञानी, आपले दरबारातील सर्व पंडीत मंडळी कोणालाही या सुकुमार कोमल श्यामलगात्री राजकुमारांना पाहून हा पण रद्द करावासा कसे वाटले नाही? हे शिव-धनुष्या, मी तुलाच विनंती करते, तूं आपले जडत्व या सर्व लोकांवर टाक अन् अगदी हलका हो, अन् शेवटी रामांकडे पाहून लाजून

आपल्या पृथ्वी-मातेकडे पहात, डोळ्यातले अश्रू कसेबसे आवरुन धरीत रघुवीरांच्या चरण कमलांना मनोमन वंदन करुन म्हणते, अत्यंत व्याकुळ होऊन विकलतेने म्हणते हे नाथ! काया-वाचा-मने आपल्या चरणीं माझे प्रेम सत्यत्त्वाने रुजु झाले असेल तर, हे भगवंता, हृदयांतर्यामी , मला आपली दासी बनवून आजीवन सेवेची संधी द्या. मनापासून स्नेह आपला ज्याच्यावर असतो त्याची प्राप्ती होतेच. हे अगदी नि:संशय हा निसर्ग-नियमच आहे नां?

तोपर्यंत तिकडे राम त्या धनुष्याच्या अगदी जवळ जाऊन पोचले देखील! ते पाहताच आता तर समस्त मिथिलावासींसह तेथे जमलेल्या सर्व ऋषी-मुनी-संत सज्जनांनी रामांनी हे शिव-धनुष्य पेलावे यासाठी आपआपले आजवरचे सर्व पुण्य पणास लावले. सर्व जणांनी आपआपल्या देवतांची प्रार्थना करण्यासाठी कांही क्षण डोळे मिटले. तोच त्रिभुवनभेदी प्रचंड आवाज झाला अन् वीज चमकावी तसा एकदम प्रकाशझोत पडला सर्वांना काही कळण्यापूर्वीच रामांच्या हातचे ते शिव-धनुष्य प्रत्यंचा लावण्यासाठी वाकवताच त्याचे दोन तुकडे होऊन ते भूमीवर पडले.

सारे विश्व त्या धक्क्यातून सावरुन भानावर येऊन पाहते तो रामांनी शिव-धनुष्याचा भंग केलेला दिसला. संपूर्ण त्रिभुवनात श्रीरामांचा जयजयकार निनादूं लागला. आकाशात दुंदुभीची नौबत झडूं लागली. देव गंधर्वांनी मंगल गानासह पुष्पवृष्टीस प्रारंभ केला. त्याचबरोबर मिथिलेतही सर्व मंगल वाद्ये वाजू लागली.

विश्वामित्र,लक्ष्मण, सीता, सुनयना यांना विशेष आनंद झाला. तर जनक मनोमनी लाजले. त्यांची काळजी दूर झाली. तर जे या स्वयंवरात पण जिंकण्याच्या इच्छेने आले होते ते तेजहीन झाले, हिरमुसले पण त्यातही जे सुजन होते ते मनातल्या मनात म्हणाले, सीतेला हाच अनुरुप शोभेसा वर आहे हं!

## सीता स्वयंवर -

शतानंदांची आज्ञा होताच सीता सलज्ज मुद्रेने हातात जयमाला घेऊन मंगलगान करणाऱ्या सखींसह रामाकडे निघाली. मनातला आनंद, उत्साह

तिच्या अंगप्रत्यंगातून फुललेला जाणवत होता. रामांसमोर जाऊन हातीची जयमाला उंचावून हातातल्या सुवर्णकंकणात दिसणारी राम छबी खाल मानेने पाहण्यातच इतकी दंग झाली की सखीने तिला माळ घालण्यास कानात सांगताच ती भानावर आली. मग सीतेने रघुवरांच्या गळ्यात जयमाला घातली. हा जणू विश्वविजयच होता ! त्यानंतर सखीने रघुवीर-चरण स्पर्श करण्यास सुचविले. तेव्हा सीतेची उडालेली गडबड, अत्यंत घाबरत तिने केलेला निसटता चरण-स्पर्श, पाहून रघुवरांनी मनोमन स्मित केले. अहिल्येप्रमाणे आपली गती होणार नाही ना ही सीतेच्या मनातली घालमेल रामांनी अचूक जाणली.

पुन्हा एकदा वाद्य गजर, मंगल-गान, वेद-पठण, पुष्पांजली, नृत्य, रामांचा जयजयकार व शुभाशीर्वाद या सर्वांचा एकत्रित गजर झाला.

तर दुष्ट प्रवृत्तीचे राजांमध्ये कुजबूज सुरु झाली. ''सीतेला पळवा अन् ह्या दोन्ही राजकुमारांना बांधून घाला. जनकासह त्याच्या साऱ्या सैन्याशी दोन हात करुन चला रे चला!''

परशुराम प्रसंग –

जमदग्नि पुत्र परशुराम रागाने ताड ताड पावले टाकीत त्या स्वयंवर मंडपात प्रवेशले. त्यांचे रागाने लालभडक झालेले डोळे चढलेल्या भुवया पाहून साऱ्यांच्या तोंडचे पाणी पळाले. व्यर्थ कुजबुजणाऱ्यांची तोंडे शिवून टाकल्याप्रमाणे बंद झाली. जो तो आपले नांव-गोत्र-पित्यांचे नांव सांगून साष्टांग दंडवत घालून तेथून काढता पाय घेऊं लागला. संपूर्ण मंडपात एक भीतीदायक वातावरण पसरले. जनकांनी स्वत: त्यांना नमस्कार केला. सीतेनेही प्रणाम करताच चतुर सख्यांनी तिला पटकन दूर राणीवशात नेले.त्यानंतर विश्वामित्रांनीही राम-लक्ष्मणांसह नमस्कार केला. रामांना पाहताच क्रोधी परशुरामांचे नेत्र त्यांच्यावर मोहित होऊन स्थिरावले. तोच आपल्या शिवधनुष्याचे दोन तुकडे, त्यांनी पाहिले, कारण आपल्या जनकाजवळ ठेवलेल्या त्या शिवधनुष्याचा तो प्रचंड ध्वनी ऐकूनच ते आले होते. धनुष्य कोणी मोडले याबद्दल जनकांना विचारताच त्यांनी थोडक्यात स्वयंवर वृत्तांत सांगितला.

आपले गुरु शंकर, त्यांचे धनुष्य भग्न झालेले पाहून त्यांचा राग अधिकच वाढला. जनकांना परशुराम म्हणाले, "हे धनुष्य भंग करणारा कोण आहे त्याला त्या सभेतून बाजूला नेऊन माझ्यापुढे उभा करा अन्यथा मी सर्वांनाच मारुन टाकेन". त्यावर राम पुढे होऊन म्हणाले, "हे नाथ! शंभु-धनुष्य भंग करणारा कोणी आपलाच सेवक असेल, त्याच्या साठी काय आज्ञा आहे?" लक्ष्मण त्यांना डिवचून, चिडवून परशुरामांचा राग वाढवित होते तर राम आपल्या मृदु-मधुर वाणीने त्यावर फुंकर घालीत होते. बराच वेळ ही शाब्दिक झटापट चालली. शेवटी परशुरामांच्या मनावरचे अभिमानाचे पटल दूर झाले अन् राम परब्रह्माचा अवतार ही खूण पटताच त्यांच्यातल्या भक्तिरसाला उधाण आले आणि राम-लक्ष्मणांची क्षमा याचना स्तुती व नऊ वेळा जयजयकार करीत ते तेथून तपस्या करण्यासाठी निघून गेले.

## राम-सीता विवाह तयारी –

हे स्वयंवराच्या उत्साहानंदावर पडलेले भयाचे विरजण, सावट दूर होताच, पुन्हा सर्वांच्या आनंद उत्साहास उधाण आले. विश्वामित्रांनी जनकांना सांगितले, स्वयंवर झाले परंतु वैदिक विधीयुक्त दोघांचा विवाह करुन दोन्ही कुलांचा स्नेह संबंध जुळणे अत्यंत आवश्यक आहे. तेव्हा सम्राट दशरथांना रीतसर पत्राने आमंत्रण पाठवा. अन् ते येईपर्यंत विवाहाची सारी तयारी करा.

जनक दूतांकडून दशरथांना पत्राव्दारे स्वयंवर वृत्तांत व विवाहाचे आमंत्रण मिळताच अयोध्येतही आनंदोत्सव सुरु झाला. सम्राटाच्या इतमामात वऱ्हाड सजू लागले. हत्तीवर अंबाऱ्या, मेणे, पालख्या, उत्तम घोडेस्वार, श्यामकर्ण अगणित घोडे सजले. सोने, रत्ने,जडजवाहीर, खाद्य पदार्थ, शिधा, सामान उंची वस्त्रे सर्वांचा अक्षरशः खच पडला. खेचरे, उंट, बैल यांवर अगणित पदार्थ लादले गेले. सर्वांत पुढे रघुवंशाचा ध्वज, त्याच्या रक्षणार्थ चतुरंग सैन्य, त्यानंतर वेगवेगळ्या तलवार, दांडपट्टे इ. चे खेळ करणारे, त्यासोबत अनेक प्रकारची वाद्ये, त्या तालावर खेळ व घोडे वगैरे डौलाने दौडत होते. त्यामागे वसिष्ठ आपल्या अग्निसह एका रथात, त्याचे जोडीला दुसऱ्या रथात दशरथ व भरत-शत्रुघ्न अन् त्यावर अमाप धनसंपत्ती व पुन्हा त्याचे

रक्षणार्थ मागे सैन्य अशी वरात अयोध्येतून मिथिलेकडे निघाली. निघताना जे जे म्हणून शुभ शकुन होते ते सर्वच्या सर्व या वरातीस आले.

जनक राजानेही सम्राटांच्या स्वागताची जंगी तयारी केली होती. अयोध्या ते मिथिला या संपूर्ण रस्त्यावर उत्तम खाणे, पिणे, झोपणे, मुक्काम याची उत्तम व्यवस्था प्रत्येक मुक्कामस्थळी केली होती. मिथिला नगरीजवळ येताच जनक स्वत: अनेक मंत्री, सचिवांसह सम्राटाचे स्वागत करायला धावले. आणि मोठ्या सन्मानाने राजासह सर्व प्रमुख मंडळींचे स्वागत करुन त्यांना सर्व सुखसोयींनी उत्तम असे महाल जानोसे म्हणून दिले. सीतेनेही ऋध्दि-सिध्दिंना सम्राटांच्या समस्त वऱ्हाडाच्या दिमतीस पाठवले.

बऱ्याच दिवसांच्या प्रदीर्घ विरहानंतर दशरथ आपल्या जीव की प्राण असणाऱ्या राम-लक्ष्मणांना भेटले. चौघा भावांचीही फार दिवसांनी गाठभेट झाली. रामांची प्रतिकृती भरत, अन् लक्ष्मणांची प्रतिकृती शत्रुघ्न या चौघांच्या दर्शनाने मिथिला वासींच्या सुखानंदात अधिकच भर पडली.

तर अयोध्यावासीयांना जनकाने केलेल्या विवाहाच्या तयारीकडे पाहून अतिशय आनंद झाला. कारण अयोध्या सम्राट पुत्रांना साजेसे असे जनकाचे राज वैभव, समृध्दी व उदारता पाहून त्यांचेही समाधान झाले.

## विवाहासाठी सजविलेली मिथिला नगरी –

संपूर्ण मिथिला नगरीभर मांडव घातला. सोन्याचे केळीचे खांब, त्याची पाने व केळीचे घड पाचूचे, तर केळफुले पराग मण्यांची बनविली. पाचूचे बांबू अगदी गाठींसह त्यावर सुंदरसे नागवेल (विड्याच्या पानांचे) सोडलेले व मध्ये–मध्ये त्यास मोत्यांच्या लड्या वा हार सोडले होते. तर माणके, नीलमणी, हिरे व पिरोज याची रंगीबेरंगी हुबेहुब कमळे बनवून त्यावर नाना तऱ्हेचे भुंगे व पक्षीही बनवून बसविले होते.सुवर्णाच्या खांबात देवदेवतांच्या मूर्ती कोरलेल्या होत्या.सोन्याच्या आम्रपल्लवांत नीलमणी कोरलेले होते. त्याला सोन्याचाच मोहोर व मंजरी झळकत होते. त्याला पाचूच्या कैऱ्या लटकत होत्या. अशा आंब्याच्या या डहाळ्या रेशमी दोऱ्यांनी ठायी ठायी

बांधलेल्या दिसत होत्या. रस्ते-वाटा-बाजार-चौक गजमण्यांच्या रांगोळ्यांनी सजलेले होते. सर्वत्र तोरणे, पताका फडकत होते तर सोन्याचे मंगल कलश अन् रात्री प्रकाशणारे रत्नदीप अशी नगरी शृंगारलेली पाहून इंद्रालासुध्दा मोह होत होता. प्रत्येक घर आणि सर्व मंदिरेही रसिकतेने शृंगारलेली होती. केशर अत्तरांचा घमघमाट वाऱ्याने दूरपर्यंत पसरत होता.

तरुण स्त्रिया व सौभाग्यवती साऱ्या षोडश शृंगार करुन हाती मंगल आरती घेऊन मंगल-गान करीत सर्वत्र वावरत होत्या. पुरुषांनीही नवी वस्त्रे व आभूषणे घातली होती, नगराभर नववस्त्रांची सळसळ, स्त्रियांच्या नुपूरादिंच्या घुंगरांचा मधुर नाद, तर राजमहाल व राजरस्त्यावर हत्ती,घोडे,अंबाऱ्या, रथ, मेणे पालख्या यांची गर्दी व तऱ्हेतऱ्हेच्या मंगल वाद्यांच्या निनादात, विप्रवृंदाचे वेद पठण व शांतीपाठाचे स्वर असा सर्वांचा संमिश्र आवाज घुमत होता.

## प्रत्यक्ष विवाह समारंभ –

जनकाच्या ज्योतिषीने उत्तम मुहूर्त काढल्याची प्रत्यक्ष ब्रह्मदेवानेच ग्वाही दिली. मार्गशीर्ष महिन्यातील शुध्द पंचमीची सायंकाळ, गोरज मुहूर्त होता. जनक आपले कुलगुरु शतानंद,सचिव यासह दशरथांच्या जानोश्याकडे गेले आणि मोठ्या सन्मानाने दशरथांसह राम-लक्ष्मण-भरत-शत्रुघ्नांना मंडपाकडे घेऊन येवू लागले. त्यावेळी दशरथांचे राजवैभव पाहून जनकांचेच नव्हे तर सर्वही देवांचे डोळे दिपले. ते सारे देव नरवेषात आपल्या पत्नींसह आले होते. दशरथांसमवेत हे चौघे चार पुरुषार्थांसारखे शोभून दिसत होते. तर कांहीना वाटले चारी वेदच जणूं यांचे रुपाने येत आहेत.

सर्वात पुढे वर वेषातले श्रीराम उठून दिसताहेत. श्यामवर्णावर पीतांबर वीजेप्रमाणे शोभत होता. त्याची शोभा बाल सूर्य व वीज यांच्या शोभेस तेजासही मागे टाकणारी आहे. विशेष विवाह भूषणांनी नखशिखान्त नटलेले राम शारदीय पौर्णिमेच्या चंद्राला मागे टाकीत होते. तिन्ही भाऊ श्यामकर्णी घोड्यावरुन त्यांच्यासह निघाले आहेत. प्रत्यक्ष मदनानेच वररामांच्या घोड्याचे रुप घेतले आहे. त्यामुळे हा घोडा सर्वच बाबतीत सर्वांपेक्षा वय-रुप-गुण-गती यातून उठून दिसतो आहे. त्यावरचे जीन जडावाने जडवलेले, मोती माणके यांनी

सजवलेले व मधुर निनादणाऱ्या किंकिणी (घुंगरे) यामुळे सारे थक्क होऊन ही शोभा डोळ्यांनी पिऊन घेत आहेत. त्यावेळी इंद्राचा सारे हेवा करु लागले, कारण तो हे सारे सौंदर्य एक हजार डोळ्यांनी एकाच वेळी आस्वादत होता.

दुसरीकडून सुनयना वधू वेषात सजलेल्या, सखींच्या गराड्यातील सीतेला घेऊन येत होती. सीतेची साडी, आभूषणे (दाग-दागिने) यांनाच मुळी तिच्या नैसर्गिक सौंदर्याने शोभा प्राप्त झाली होती. सर्व सुंदर सजलेल्या नटलेल्या सखींच्या मेळाव्यात सीता मनोहर चित्तवेधक अन् इतकी मोहक दिसत होती ते वर्णन कोणत्याच लालित्यपूर्ण शब्दाने परिपूर्ण होणारे नाही. सर्व देवस्त्रिया देखील मोहित होऊन तिच्याकडे एकटक पाहू लागल्या.

वरपक्षाचे वसिष्ठ तर वधूपक्षाचे शतानंद या दोन्ही वेदोनारायणांनी विवाह विधीस प्रारंभ केला तो गुरु-गौरी पूजनाने. मधुपर्क झाला अन् समोरासमोर रत्नजडित सुवर्णसिंहासनावर राम व सीता विराजमान झाले. दोघेही एकमेकांकडे प्रेमाने लाजून पहात होते, त्यामुळे त्यांच्या सौंदर्यास एक आगळी वेगळी झळाळी येत होती.

जनक व सुनयनांनी रामांचे पाद प्रक्षालन सुरु करताच दोघांच्या अंगी रोमांच दाटले. उभयता स्वत:ला अत्यंत भाग्यशाली मानू लागले. साहजिकच आहे. जे चरण-कमल शंकरांच्या हृदयरुपी मानसात नित्य विराजतात, ज्यांच्या पद-कमलांचा स्पर्श अहिल्येने अनुभवला, ज्या चरणांपासून निघालेली गंगा शंकरांनी अतीव प्रेमाने आपल्या मस्तकावर धारण केली ते पद कमल प्रक्षाळण्याचे भाग्य मिळणे ही केवढी गौरव सन्मानाची गोष्ट नाही कां? रामांनी आपल्या कोमल हातात सीतेचा थरथरता सुकोमल हात घेतला, पाणीग्रहण झाले अन् त्यानंतर अग्निसाक्षीने सप्तपदी विधीही पार पडला. त्याबरोबर वेदोच्चार,बंदीजनांचा जयजयकार व वाद्यांचा गजर यांचा एकच सूर साऱ्या मिथिलेभर निनादला. सुवर्णाच्या रत्नजडीत खांबामध्ये सगळीकडे राम-सीता यांची प्रतिबिंबे चमकू लागली.

सप्तपदीनंतर आहेरांची जी देवाण घेवाण झाली. तेव्हाचा तो सोने-रत्ने-हिरे-माणके-मोती अशा जडजवाहिरांचा ढीग पाहून कुबेराने आपली बोटे

तोंडात घातली.मुनींच्या आज्ञेनुसार रामांनी सीतेच्या भांगात शेंदूर भरला. ते दृश्य म्हणजे कमळाने आपले लाल पराग कण अत्यंत प्रेमभरे चंद्रात भरावे असे दिसत होते. नंतर वसिष्ठांच्या अनुज्ञेने वर वधू एकाच सिंहासनावर बसले ते सुमनोहर दृश्य पाहून दशरथ-जनक सुनयनांसह सर्वांच्याच डोळ्यांचे पारणे फिटले. आज लोचन सफल झाल्याचा कृतार्थ-भाव प्रत्येकाच्या चेहऱ्यावर चमकत होता. राम-सीता विवाह परिपूर्ण होताच भरत-मांडवी,लक्ष्मण-उर्मिला आणि शत्रुघ्न-श्रुतकिर्ती यांचेही त्याच थाटामाटात विवाह संपन्न झाले.अशा प्रकारे ही चार नवदांपत्ये त्या विवाह मंडपात शोभूं लागली. वर–वधू पक्षाने एकमेकांचा सुंदर यथासांग विपुल असा आहेर नजराणे देऊन मान सन्मान केला.

विवाहप्रीत्यर्थ ब्राह्मण व याचक यांना त्यांच्या त्यांच्या आवडीनुसार क्रमशः दान म्हणून गायी-घोडे-सुवर्ण याचकांना हवे ते मिळाले. दशरथांसह सर्व वऱ्हाडी नगरात प्रवेश करुन अगदी परत जाईपर्यंत जो पायघड्यांचा ढीग जमला होता. ती रेशमी वस्त्रे नेता नेता बलुतेदार त्यांचे बैल, खेचरे इ. थकून गेले. तीच तऱ्हा बक्षीस म्हणून मिळालेल्या वस्तूंची!

त्यान्नंतर अगणित पक्वान्नांनी सजलेले षड्रसपूर्ण भोजन सुवर्णाच्या पत्रावळीच्या आकाराची ताटे व त्याला सोन्याच्या बारीक खिळ्यांनी जडवलेले माणिक मोती) अशा खाश्या पंगती किती उठल्या याची गणतीच नव्हती. सर्वत्र अन्नाचा सुवास, पाने सुशोभित केलेल्या सुवासिक धूपादिं मध्ये केशर-कस्तुरीचा सुगंध असा सर्व संमिश्र परिमल दरवळत होता. चटण्या,कोशिंबीरीपासून भाज्या पक्वान्नापर्यंत इतके पदार्थ होते की त्यांची यादीच संपायची नाही. जेवताना उखाण्यांच्या फैरी झडत होत्या. तसेच दोन्ही पक्ष एकमेकांची मनमुराद चेष्टा करीत होते. त्यामुळे सर्वत्र हास्याचे फवारे उडत होते. जेवणानंतर प्रत्येकाच्या हातावर गरम पाणी घालण्यासाठी नोकर सज्ज ठेवले होते. त्याबरोबर सर्वांना उत्तम,तऱ्हेतऱ्हेचे विडे दिले गेले अन् सर्वजण महाली विश्रांतीसाठी गेले.

दुसरा दिवस उजाडताच जनकाने नजराणे सादर केले त्यात कामधेनू प्रमाणे सुलक्षणी अशा सालंकृत सजविलेल्या गायी,रथ, हत्ती, घोडे, उंची रेशमी वस्त्रे व सुवर्णासह अनेक जडजवाहीर अशी अगणित संपत्ती दशरथांना दिली.

दशरथांनी देखील परत आहेर यास साजेसा किंबहुना त्याहून सरस तर केलाच. शिवाय अयोध्येतील निम्मी संपदा ब्राह्मणांना दान व याचकांना वाटून संपविली. असे बरेच दिवस सुखानंदात व्यतीत होते. दररोज दशरथ जाण्याची अनुज्ञा मागत अन् जनकांचे पाणावलेले नेत्र व सर्वांचे प्रेम पाहून त्यांचे मन राखण्यासाठी जाण्याचा बेत रद्द करीत. शेवटी विश्वामित्रांच्या मध्यस्थीने वऱ्हाडासह दशरथ व ह्या चार जोड्या जायला निघाल्या. खरोखरीच निघाल्या ही वार्ता मिथिलेत एका क्षणार्धात पसरताच सायंकाळी कमळे मिटावीत तसे सर्वांचे चेहरे खर्रकन उतरले. प्रत्येकाच्या डोळ्यात अश्रू तरळले. अन् प्रत्येक जणच म्हणूं लागला इतकी काय घाई आहे. अजूनी ४-८ दिवस राहूं देत. आम्हांला सर्वांना पुरते डोळाभर पाहून घेऊ देत. कारण **वर-वधू-व्याही यांपासून मंत्री-सचिव-पुरोहित-अधिकारी-दास-दासींपर्यंत एकमेकांना अनुरुप असलेला हा संपूर्ण विश्वातला पहिलाच विवाह असेल.**

जनकांनी सर्वांची पाठवणीची तयारी स्वागताप्रमाणे किंबहुना अधिक सरस अशी केली आणि आपल्या चारी मुलींबरोबर २५,००० रथ, १लाख घोडे, १०,००० हत्ती हे सर्व सुवर्ण व अलंकार मंडित, शिवाय अगणित सोने, जडजवाहिर व उंची रेशमी वस्त्रे, गायी असे भरभरुन दिले. सीतेसह उर्मिला, श्रुतकिर्ती, मांडवी चौघींनाही जनक व सुनयना यांनी सुंदर उपदेश वा शिकवण देऊन पाठवले. "पतीला सदैव प्रिय असे वागा. सासू-सासरा व सर्व गुरुजन यांची सेवा करा. पतीचा कल पाहून,त्याची मर्जी राखून,सर्वांशी गोड वागा." आईजवळून या चौघींना नेणे म्हणजे नुकत्याच व्यालेल्या पाडसाला वा वासराला त्याच्या आईजवळून नेण्याइतके अत्यंत दुर्गम-दुष्कर काम हे जाणून सुजाण दशरथांनी रामांना सुनयनेचा निरोप घेण्यास पाठवले. कारण प्रत्येक सासूला जावई कन्येपेक्षा प्रिय असतो, कारण त्यामुळेच कन्या सुखाने नांदते. हे स्त्री मानसशास्त्र दशरथांनी नेमके ओळखले.

रामांना सुनयनेने उटणी लावून अभ्यंग स्नान घातले, षड्रस पक्वांन्नांचे भोजन घातले आणि त्यानंतर आपल्या मुलींना त्यांचेकडे सोपवताना अत्यंत प्रेमविव्हळ व्याकुळ होऊन ती म्हणते "हे रामा, सीतेसह या तिघी आमचे प्राण आम्ही तुझ्या हाती सोपवतो आहोत. त्यांना (सीतेस) तुझी दासी म्हणून तू स्वीकार. (शेवटी रामाचे परब्रह्मत्व जाणून) म्हणते- रामा तू तर पूर्णकाम,ज्ञानी,करुणासिंधू अन् भाव प्रिय आहेसच. तेव्हा माझा भक्त म्हणून स्वीकार कर मजवर कृपा कर.

जड अंत:करणाने सर्वांचा निरोप घेऊन गणेश स्मरण करुन सजलेल्या मेण्यांत चौघींना बसवले अन् सारे वऱ्हाड वरातीच्या रुपात हळूहळू मिथिलेतून बाहेर पडू लागले.

साऱ्या शृंगारलेल्या लवाजम्यासह रथातून दशरथांसह चार नव परिणित कुमार निघाले त्यांचेबरोबर त्यांना निरोप द्यायला नगराबाहेर जनक पायी चालत निघाले. दशरथांनी अनेक वेळा सांगूनही ते परत फिरत नाहीत हे पाहून शेवटी दशरथ स्वत: रथातून खाली उतरले अन् दोघांनी अश्रूभरल्या डोळ्यांनी एकमेकांचा शेवटचा निरोप घेतला. तरीही रामांचा निरोप घेतल्याविना त्यांची पावले मागे वळेनात. तेव्हा ते सर्वांना-मुनी-विप्रवरांना वंदन करुन, रामांजवळ आले त्यांचे परब्रह्मत्व ओळखून निर्गुण व सगुण रुपाने त्यांनी रामांची स्तुती केली. त्या सुरेख स्तुतीने रामही परितुष्ट परिपूर्ण संतुष्ट झाले. त्यानंतर भरत-लक्ष्मण-शत्रुघ्न त्यांचा निरोप घेऊन कसेबसे नाईलाजास्तव परत फिरले.

अशी सारी सजलेली वरात अत्यंत वेगाने प्रवास करीत पाहता पाहता अयोध्येत पोचली देखील. सारी अयोध्या डोळ्यांत प्राण आणून या सर्वांची विशेषत्वाने नव-वधूंची अत्यंत उत्सुकतेने वाट पहात होती. सदैव शोभीवंत असलेली अयोध्या खास शृंगारुन सारेजण सुवर्ण तबकांत मंगल आरती घेऊन सज्ज होते.

भव्य वरातीचे अयोध्येत भव्य स्वागत –

अयोध्येत प्रवेश करण्याच्या वेशीपासून राजवाड्यापर्यंत केशरांचे सडे, रांगोळ्यांनी रस्ते सजलेले. अयोध्येत जिकडे पहावे तिकडे ध्वज,पताका, तोरणे अन् भव्य सुंदर रेशमी मंडप. तर रस्त्यांच्या दुतर्फा फुला-फळांनी लगडलेले आंबा, कदंब, बकुळ, केळी, कर्दळी, सुपाऱ्या यांचे वृक्षही या वरातीचे स्वागत करीत होते. चौकाचौकात सुवर्ण-मंगल-कलश अन् पंचारत्यांनी ओवाळणाऱ्या शृंगारित सुसज्ज युवतींचे घोळके उभे होते. यापेक्षा कित्येक पटींनी राजवाडा राजप्रसाद तर सोने जडजवाहीर रत्ने व रत्नदीप यांनी उजळून निघाला होता. वरात येत आहे हे कळताच कौसल्येने गणेश-शिवाचे षोडशोपचारे पूजन करुन विप्रांना अगणित दाने दिली. तर सुमित्रेने नववधूसह सर्वांच्या स्वागताच्या तयारीची जातीने पाहणी करुन सर्व काही सम्राटांच्या इतमामास साजेसे शोभेसे आहे ना हे पाहिले. तर कैकेयीने सर्वत्र मंगलगान व नृत्याचे उत्तमोत्तम कार्यक्रम आयोजित केले.

पंचारत्यांच्या धुराने सारे आकाश श्रावणात मेघांनी दाटी करावी तसे झाकोळून गेले. देवाच्या पुष्पवृष्टीने अन् अयोध्यावासींच्या अक्षतादि मंगल वस्तूंच्या वर्षावाचा सर्वत्र खच पडला. स्वर्गीय गंधर्व गान, दुंदुभी आणि अयोध्येतील गायन-वादन-नृत्य यांची जणू जुगलबंदी सुरु झाली. मेघांची दाटी झाल्याचे वाटून मोर पिसारा फुलवून नाचू लागले. राजमहालाच्या प्रवेशव्दाराशी शिव-पार्वती गणेश स्मरण करून दशरथांसह नवपरिणित चारी जोडप्यांनी महालात प्रवेश केला. चारी नव्या दांपत्यांवरुन अनेक अनमोल वस्तू अगदी सुवर्ण, रत्नांपासून उंची वस्त्रांपर्यंत ओवाळून सेवकांना दिल्या गेल्या. चारी जोडप्यांना पाय धुवून, पूजा करुन खास सजविलेल्या चारी रत्नजडीत सुवर्ण सिंहासनावर बसविले गेले. कुलरितीनुसार अनेक धार्मिक संस्कार केले गेले. विश्वामित्रांची विषेश पूजा सत्कार केला गेला.

चारी नववधूंना मांडीवर घेण्यासाठी तिघींमध्ये जणूं स्पर्धा लागली. त्यानंतर इतरही राण्या आपला नंबर केव्हा लागतो यासाठी वाट पहात होत्याच. अशा त्या सातशे राण्यांकडून या नववधूंचे मनसोक्त लाड केले जात होते अन् त्याचवेळी विवाह समारंभाचे सविस्तर वृत्त दशरथांसमवेत अनेक जणांकडून अनेक वेळा या राण्या पुन:पुन्हा ऐकून, जनक सुनयनेसह सर्व मिथिलेची तोंडभरुन स्तुती करीत होत्या.

रत्नदीपांच्या प्रकाशामुळे रात्र झाल्याने साऱ्या भानावर आल्या आणि या चारी मुली पेंगुळल्याचे पाहून त्यांची शयनाची खाशी व्यवस्था केली गेली. गाईच्या

नुकत्या धार काढलेल्या दुधावरच्या फेसाप्रमाणे त्यांच्या गाद्या, चादरी, रजया इ. मृदु मुलायम अन् मंद रंगाच्या अन् सुखद सुवासाने दरवळणाऱ्या होत्या. त्यानंतर चारी कुमारांची शयन-व्यवस्था तशाच पध्दतीने केली गेली.

रामाला थोपटून झोपवताना त्याच्या उशाशी बसलेली कौसल्यादि माता आळीपाळीने सर्वांच्या मस्तकावरुन आपला मोरपिसाप्रमाणे मृदु कृपाहस्त फिरवताना म्हणते, ''त्राटिकावध, अहिल्या उध्दार व शिव-धनु-भंग ही सारी अति मानवी कृत्ये तुमच्याकडून झाली ती केवळ महामुनी विश्वामित्रांच्या कृपाप्रसादामुळे बरं!'' त्यांच्यामुळे राजा जनक, राणी सुनयनासारखे ज्ञानी सज्जन व्याही आणि फुलांपेक्षा ही सुंदर, सुकोमल अशा चारी मुली, सुशील, विनीत, सर्वगुणसंपन्न मिळाल्या.

कंकण सोडण्याचा विधी संपन्न होताच, चारी कुमार राजांबरोबर राज-दरबारात जाऊं लागले. विश्वामित्र दररोज दशरथांकडे परत जाण्याची अनुमती मागत. आणि राजे चारी कुमारांना त्यांचे पायावर घालताना विशेषत्वाने रामांकडून त्यांना आणखी राहण्याचा आग्रह करीत. रामांचा आग्रह मोडणे त्यांना शक्य होत नसे. कारण ते इतक्या मृदु-मधुर शब्दात विनवणी करीत की त्यांचा शब्द ओलांडणे केवळ अशक्य होई. अर्थात परमात्म्याचाच तो शब्द, कोण व कसा उल्लंघेल?

शेवटी वसिष्ठांनी मध्यस्थी केल्यावर दशरथांनी विश्वामित्रांची पाठवणीची व्यवस्था केली. त्यांच्या गुरुकुलासाठी लक्षावधी सुलक्षणी गायी व अपार धन धान्य, आश्रमासाठी देऊन त्यांना निरोप दिला. चारी पुत्र व अनेक पुरजनांसह त्यांना नगराबाहेरपर्यंत पोचवून सारे परत फिरले. महालात परत येताना विश्वामित्रांचेच सारे गुण-गान, त्यांचा इतिहास दशरथ व वसिष्ठ सर्वांना सांगत येत होते. राम-लक्ष्मणांना त्यांचेबरोबर पाठवताना पुत्रमोहामुळे त्यांच्या नकळत केलेले सारे अपमान-उपमर्द त्याची जणू भरपाई करीत होते.

अशा प्रकारे पुढे वर्षभर विवाहोत्सव, अभिनंदनोत्सव यांनी सारी अयोध्या हर्षभरित होत होती. रामजन्म, व्रतबंध, विवाह अशा उत्सवानंदाचे जे श्रवण-गान मोठ्या प्रेमादरपूर्वक करतात ते नेहमी आनंदी-उत्साहीच राहतात.

बालकांड-प्रथम सोपान समाप्त.

# अयोध्याकाण्ड (मथुरा मोक्षपुरी)

मंगलाचरण –

वामांगी पार्वती, मस्तकी गंगा, कपाळी चंद्रकोर, नीलकंठ, सर्वांगावर भूषणभूत असे सर्प असणारे, काशीत प्रत्येक जीवमात्राला राममंत्राने मुक्त करणारे, सर्वांचे रक्षणकर्ते आणि वैराग्य वाढविणाऱ्या अशा शंकरांना वंदन व प्रार्थना ते आमचे रक्षण करोत.

ज्यांच्या रामप्रेमाच्या सागराला वसिष्ठ व सर्व राम माता इतकेच नव्हे तर ब्रह्मज्ञानी, जनक-विदेहही पार करु शकले नाहीत अशा रामस्नेहमूर्ती भरतांना वंदन!

राज्याभिषेकाच्या वार्तेनं ज्यांच्या प्रसन्नतेत वाढ झाली नाही किंवा वनवासातल्या दुःखाच्या कल्पनेने जी कोमेजली नाही अशी सदैव प्रसन्न,सुंदर व मंगल अशी मुखावरील कांती असलेल्या, हाती भले मोठे धनुष्य-बाणधारी, नीलकमलाप्रमाणे श्यामल व कोमल असे सीतेसह शोभणारे राम यांना वंदन !

सद्गुरुंच्या चरण-कमल-रजाने आपला मनरुपी आरसा स्वच्छ करुन आता चारी पुरुषार्थाची प्राप्ती करुन देणाऱ्या अशी रघुवरांची विमल कीर्ती गांऊया!

## अयोध्याकांड प्रारंभ

राम विवाहानंतर अयोध्येत नवनवीन उत्सवांना जणू भरतीच आली. जणूं चौदा भुवनेरुपी पर्वतांवरुन आलेले पुण्याचे मेघ या अयोध्येवर सुख-पर्जन्याचा अविरत वर्षाव करीत होते. आणि ऋध्दि, सिध्दी, रूपी नद्या अयोध्या सागरास येऊन मिळत होत्या. इंद्रालाही हेवा वाटावा अशी संपत्ती-समृध्दी अयोध्येत भरभरुन वहात होती.

राम,दशरथांच्या बरोबरीने राज्यकारभार सक्षमपणे पाहत होते.त्यांचे रुप-गुण-स्वभाव-चारित्र्य सारे सारे सर्वांना मोहून घेत होते. त्यामुळे सर्वांच्याच मनात रामांनी युवराज व्हावे असे विचार तरळूं लागले.

एकदा तिरका राजमुकुट सरळ व्यवस्थित बसविताना दशरथांनी

आरश्यात पाहीले. तो त्यांना कानाजवळचे केस पांढरे झालेले दिसले. जणूं जरठपणा (वृध्दपण) कानाशी येऊन कुजबुजूं लागला की आता पैलतीर दिसूं लागला आहे, तेव्हा राज्यभार अधिकृतरित्या रामावर सोपवून आपण वानप्रस्थ स्वीकारावा. लगेच ह्या शुभ विचारास वसिष्ठांची अनुमती व राज्यातील मंत्र्यांची संमती घेतली आणि सर्वानुमते रामांच्या युवराज-अभिषेकाची लगबग-तयारी जारीने सुरु झाली कारण वसिष्ठांच्या आज्ञेनुसार हा शुभ विचार ताबडतोब कृतीत आणणे जरुरीचे होते.

राज्याभिषेकास आवश्यक ती सर्व सामुग्री आणण्यासाठी वायुवेगाने दूत, सेवक दशदिशांना दौडत गेले. तत्काल साऱ्या वस्तू अयोध्येत दाखल झाल्या. पवित्र तीर्थ-जल, औषधी मूळे-फळे-फुले-पाने-वस्त्रे इ.इ. सारी अयोध्या नेहमीच स्वच्छ व शोभिवंत असल्याने विशेष शृंगारायला तिला फारसा वेळ लागला नाही. कौसल्येने दान सत्र सुरु केले, तर सुमित्रेने राजमहाल सुशोभनाचे अध्यक्षपद स्विकारले. राम-सीता यांना शुभ शकुन होऊ लागले. त्याचा अर्थ आजोळी गेलेल्या भरतांची भेट लवकरच होईल असा त्या दोघांनी लावला.

रामांच्या महालात अचानक अनपेक्षितरित्या वसिष्ठ-कुलगुरु प्रवेशले. रामांनी त्यांचे प्रेम-आदर विनयपूर्वक उत्तम स्वागत-नमन व अतिथि सत्कार केले. "उदईक होणाऱ्या तुमच्या युवराज पदाभिषेकासाठी तुम्ही व्रतस्थ राहिले पाहिजे". हे सांगण्यासाठी वसिष्ठ आले होते, तेव्हा त्यांच्या त्या उपदेशावरुन रामांना ही बातमी कळली. परंतु त्यांना आनंद न होता सर्व भावांना सोडून स्वत: एकटेच राजा म्हणून अधिकार गाजवणे खेदाचे व संकोचाचेच वाटले. पण गुरु-पिता यांचे आज्ञेपुढे त्यांचा नाईलाज झाला. लक्ष्मण त्याचवेळी रामांना भेटायला आले. त्यांना ही बातमी कळल्याने ते रामांचे अभिनंदन करण्यासाठी आले अन् म्हणाले, "माझे हे सुख स्वप्न आता प्रत्यक्षात तुम्ही उभयतां सुवर्ण-सिंहासनावर बसलेले मी पाहीन."

परंतु ही सारी तयारी पाहून स्वर्गात देवसभेत इंद्रासह सर्वांची झोप उडाली. कारण राम राज्यावर बसले तर रावणाचा पाडाव कसा होणार ही त्यांची अंतस्थ चिंता होती. म्हणून त्यांनी रामांनी राज्यावर न बसण्याचे कार्य शारदा-

सरस्वतीकडे सोपवले. बिचारी अयोध्याभर फिरली पण प्रत्येकाच्या हृदयात 'राम'। एकमेव व्यक्ती रामविरोधी सापडली – 'मंथरा'। शारदेने तिच्या मनात विष पेरले अन् ते विष हळूहळू तिने कैकेयीच्या गळी उतरवले. खरे तर कौसल्येपेक्षाही कैकेयीचा रामावर जीव होता. पण... उपजत कुसंस्कारांचे बीज, मंथरेने पेरणी केलेल्या विषाने हळूहळू रुजत त्याचा भला मोठा वृक्ष तयारही झाला. मंथरेच्या सूचनेनुसार कैकेयी क्रोधागारात गेली, जाडी-भरडी-जीर्ण वस्त्रे नेसली, अंगावरचे दागिने इतस्ततः फेकून दिले, केस मोकळे सोडले.

दशरथ आपल्याच आनंदात मग्न होते, त्यामुळे लाडक्या कैकेयी राणीला ही बातमी द्यायची विसरले. ऐनवेळी आठवल्याने तिच्या महालात जातात तो ती क्रोधागारात गेल्याची बातमी कळली. त्या बातमीने राजांचे निम्मे हातपाय (अवसान) तिथेच गळले. मंथरेने पढविल्याप्रमाणे दशरथांनी लाख प्रकारांनी विनवले तरी तिने आपला मुख्य हेतू सांगितला नाही. जेव्हा दशरथांनी राम-शपथा घेतल्या अनेक वेळा, तेव्हा तिने गरळ ओकायला सुरुवात केली. "भरताला आजोळी पाठवून लगबगीने त्याला डावलून रामाला राज्यावर बसविण्याचा कौसल्येसह तुम्ही कट रचला आहे. भरत तुमचा पुत्र नाही? मी तुमची पत्नी नाही? मागे सांगितल्याप्रमाणे मला दोन वर हवे आहेत- प्रथम वराने भरतास राज्य आणि दुसऱ्या वराने रामाला १४ वर्षे वनवास, तोही मुनींप्रमाणे राहून".

हे कैकेयीचे शब्द दशरथांच्या कानात तापलेल्या शिश्याच्या रसाप्रमाणे शिरले. त्यांच्या अंगचे सारे बळ नाहीसे होऊन ते कोसळले, तोंडाला कोरड पडली. थोड्या वेळाने त्या धक्क्यातून कसेबसे सावरत शुध्दीवर येत म्हणाले – "मला भरत आणि राम दोघेही सारखेच आहेत. मी कधीही त्यात भेद केला नाही व करणारही नाही. केवळ कुलरितीनुसार ज्येष्ठपुत्र म्हणून रामाला युवराज पद देण्याचे ठरवले. ठीक आहे तुझ्या वचनानुसार भरतास राज्यावर बसवूं. पण रामांचा काय बरे अपराध, त्यांना ही १४ वर्षांची शिक्षा अकारण कां ? भरत देखील रामांना डावलून राज्य स्वीकारणार नाहीत हे नक्की. तेव्हा हा अविचार सोडा, दुराग्रह,हट्ट सोडून द्या. कारण रामाविना

अयोध्या ही कल्पना देखील कुणाला सहन होणारी नाही. मी तर विश्वामित्रांबरोबर राम गेल्यानंतर एकदा कसाबसा विरह सहन केला आहे. आता राम-विरह मला सहन होणे शक्य नाही. मी जगणार नाही. तुम्ही या वराने वैधव्य आणि कुल-कलंक दोन्हीही मागत आहांत. हे दोन्ही तुम्हाला जन्मभर सर्वांकडून भोगावे लागतील.'' असे दशरथांनी कैकेयीस परोपरींनी विनवले. पण एकदा बुध्दि फिरली की त्यात बदल होत नाही. हे दशरथांनी ओळखले व तिचा धिक्कार करुन स्वत:च्या दैवाला दोष देत ग्लानी येऊन कोसळले. मनोमन सर्व देवांना कुलदेव-श्रीशंकर-आशुतोष असल्याने 'हे घडू नये' असे प्रार्थना करून विनवित राहिले. सूर्योदय होऊच नये असे ही म्हणूं लागले.

अयोध्येतील समस्त आबालवृध्द रात्रभर रामांच्या युवराज्याभिषेकासंबधीच आपआपसात चर्चा करीत होते, तोवरच सूर्योदय होत आला. त्यामुळे सर्वजण आपली स्नाने उरकून खास शृंगार करुन राजवाड्याशी गर्दी करु लागले. दररोज पहाटे उठणारे राजे अजून कसे उठले नाहीत म्हणून सर्वांना आश्चर्य वाटले तोच सुमंत कष्टी चेहऱ्याने राम-महालाकडे जाताना सर्वांनी पाहीले अन् ऐन प्रसंगी या शुभकार्यात मिठाचा खडा पडल्याचे सर्वांच्या ध्यानी आले आणि काही काळानंतर कैकेयीकडून मागितलेले वरदान सर्वांना समजले. जो तो कैकेयीला शिव्याशाप देत आपल्या दुर्दैवाबद्दल शोक करुं लागला. त्याचवेळी त्या दु:खाबरोबर आश्चर्यही होतेच कारण ज्या कैकेयीचा 'राम' आजवर जीव की प्राण होता, तो अचानक तिला का सलू लागला असे सर्वांनाच वाटले.

सुखानंदात न्हाणारी अयोध्या शोकविव्हल झाली. सुमंत रामांना राजा जवळ घेऊन येताच-**रामांची अन् दु:खाची प्रथम गाठभेट झाली.** अत्यंत ज्ञानी व प्रिय असलेल्या आपल्या पित्याला रामांनी प्रथमच इतके अगतिक होऊन दु:खाने रडताना,वारंवार बेशुध्द पडताना पाहीले अन् रामांचा धीरच खचला. जेव्हा कैकेयीकडून सर्व हकीकत समजली तेव्हा राम अत्यंत धीर-गंभीरपणे म्हणाले, ''हे माते, इतक्या क्षुल्लक कारणासाठी पित्यांनी एवढा शोक करावा, हे त्यांच्यासारख्या धर्मधुरंधर, ज्ञानी सम्राटास शोभत नाही. उलट

**माझ्या प्राणप्रिय भरताला राज्य मिळते व वनांत ऋषीमुनींना भेटून त्यांच्या सत्संगाचा लाभ मला १४ वर्षे मिळणार यासारखी परम भाग्याची गोष्ट दुसरी कोणती?** १४ वर्षे हां हां म्हणता सरतील व पुन्हा तुम्हा सर्वांच्या सेवेस मी हजर होईनच.''

त्यानंतर राम दशरथांना मातेची आज्ञा वनात जाण्यासाठी घेऊन येतो म्हणून सांगून माता कौसल्येच्या महालाकडे गेले.

## कौसल्या-राम संवाद –

दररोज उठल्या उठल्या राम मातेला नमस्कार करीत, त्याचप्रमाणे समजून कौसल्येने रामांना शुभाशीर्वाद दिले. परंतु तिच्या लेखी आज राम राज्यावर बसणार त्यामुळे त्यांच्या व्यस्त राज्यकारभारातून मातेसाठी त्यांना वेळ जास्त काढणे होणार नाही हे जाणून तिने वारंवार त्यांच्या कपाळाचे मुखाचे चुंबन घेतले. मोठ्या प्रेमाने मांडीवर बसवून घेऊन ती विचारते, ''बाळा, आज आमचे डोळे तुला सुवर्ण सिंहासनावर बसलेले पाहून खऱ्या अर्थाने तृप्त होऊन निवळतील. तेव्हा तो शुभ मंगल मुहूर्त केव्हाचा आहे. तुझ्यावरुन हे जीवन ओवाळून टाकावे वाटते आहे. बाळा, लवकर स्नानादि उरकून तयार होऊन ये. मग मी तुझ्यासाठी स्वतः तुला आवडते गोड दोन घास भरवीन. कारण मग साऱ्या धार्मिक संस्कारांचे समापन होईतो तुला आज भोजनास फार उशीर होईल, नां? –'' याचा अर्थ असा की कैकेयीच्या महालातल्या कारस्थानाची तिला अजून काहीच कल्पना नाही. आणि अशा इतक्या आनंदाच्या अत्युच्च शिखरावरुन आपल्या जननीला खाली ओढणे रामांसारख्या सुकोमल पुत्राच्या जीवावर येणे अगदीच सहाजिक होते. म्हणून त्यांनी आपल्याबरोबर आलेल्या सुमंत-पुत्रास ती खबर देण्यास खुणावले. त्याचेकडून ती दुःखद वार्ता कळताच कौसल्या कळवळून म्हणते, ''बाळा, ह्या राज्याऐवजी तुझ्यासारख्या गुणी मुलाला वनराज्य देण्याचे कारण, तुझा अपराध काय?'' त्यावर सुमंत-पुत्र सविस्तर हकीकत कौसल्येस निवेदन करतात. त्याचबरोबर कौसल्येमधील धर्मपत्नी-राजमाता, धीर गंभीर व विवेकपूर्ण भाषेत रामाला सुंदर निरोप देते.

कुणालाही दोष न देता प्रथम ती आपल्या दुर्भाग्याची निर्भत्सना करते. अन् म्हणते तुम्हाला रहा म्हणायचे तर सावत्र-बंधूपण जगापुढे येईल, आणि वनात जा म्हणायचे तर तुमच्या रोजच्या दर्शनाला व तुमच्या स्नेहाला मुकायचे. पण पिता व माता या दोघांचीही आज्ञा आहे तर तुम्ही वनात जाणेच योग्य.तुम्ही व भरत यांत आम्ही कधीच भेद मानला नाही. तेव्हा भरताकडे पाहून जणूं तुमचेच दर्शन होत आहे असे समजून आम्ही ही १४ वर्षे काढूं कशीबशी !

कौसल्येचे स्वस्त्ययन --

वनामध्ये वनदेव व देवी हेच तुमचे माता-पिता होत. वन हीच तुमची अयोध्या आणि वनातले पशु-पक्षी हे तुमचे सेवक समजावेत. समस्त देव व पितर तुमचे सर्व संकटांपासून रक्षण करोत. सुखाने तुमचेवरुन लिंबलोण उतरते लवकर परत या, मातेची आठवण ठेवा. आमचे दुर्दैव,परम अभाग्य म्हणून तुमच्या सारख्या पुत्राचा १४ वर्षे वियोग आम्हाला सहन करायचा आहे, तुम्ही परतेपर्यंत या वियोग दु:खाने जगलो तर भेटूंच!

त्याबरोबर रामांनी आईला कडकडून मिठी मारली. तिला हृदयाशी धरुन ठेवून अत्यंत मृदु मधुर शब्दाने ते मातेचे-जननीचे सांत्वन करूं लागले. तोच सीता येथे पोचली-अन् अत्यंत विव्हळ व अधीर होऊन कौसल्या मातेस विचारते, "अशा प्रसंगी नाथांच्या बरोबर वनात कोण पुण्यवान जात आहे?" या प्रश्नात मी बरोबर जाऊं इच्छिते ही तिची मनोकामना कौसल्येने नेमकी जाणली व रामास माता म्हणूं लागली --

कौसल्या मातेचा रामास उपदेश --

जनकांसारखा ज्ञानी पिता, सम्राटांसारखा सासरा, व रघुकुलासारख्या चांदण्याला लाभलेला हा रामचंद्र तुझा पती-गुण-रुपाची खाण ! तूं त्याला तशीच साजेशी शोभेशी, तेव्हा रामा हिला नको हं बरोबर नेऊं. निदान ती तरी आमच्या 'प्राणांचे अवलंबन' म्हणून इथे आमच्या जवळ राहूं दे. कारण तिचा अति सुकुमारपणा, कोमलपणा जाणून आजवर आम्ही तिला नंदादीपात वात सारखी करण्याचे सुध्दा कधी काम सांगितले नाही. तर कधीही तिचा पाय

जमिनीवर पडू दिला नाही. तिला इतक्या सगळ्या राण्यांनी आपल्या अंगा-खांद्यावर-मांडीवर लाडाने वाढविली. तेव्हा अशा या कोवळ्या सीतेला तुमच्याबरोबर वनात राहणे कसे शक्य आहे? चित्रातल्या हिंस्त्र पशूंनादेखील जी घाबरते, ती वनात कशी राहील? शिवाय ना ती मुनी-कन्या, ना कोळी-भिल्ल कन्या, तिला या दगड-धोंड्यांची लांबूनही ओळख नाही. तेव्हा तिच्या सारख्या राजहंसीच्या पिलीणीला हा राजमहालच योग्य आहे हे जाणून रामा,तुम्ही हिला बरोबर नेऊं नका हं!

## रामांचा सीतेस उपदेश --

राम प्रथमच आईसमोर पत्नीशी बोलत असल्याने, ते लाजले, संकोचले पण प्रसंग ओळखून सीतेला म्हणाले – "हे राजकुमारी, तुमच्या हिताच्या दृष्टीने तुम्ही राजमहालात राहणे योग्य. इथे सासवांची सेवा करीत रहा. कारण जेव्हा जेव्हा त्यांना माझी आठवण येईल तेव्हा तुम्ही पुराणातील काही कथा सांगून त्यांचे मन रमवाल. शपथपूर्वक तुम्हास सांगतो, जे वेद व गुरुवचनानुसार वागतात त्यांचे कल्याणच होते, आणि न वागले तर अहित हे नक्की ठरले. हे सुंदरी, सुमुखी तुम्हांला दु:ख होईल, सोसवणार नाही म्हणून तुम्ही येऊ नका. कारण वनात अनवाणी पायी फिरायचे म्हणजे कठीण मार्ग, काटे, टोकदार गवत. खडे, पत्थर-हे सारे सहन करणे तुमच्या कोमल मृदु पायांना योग्य नव्हे. या शिवाय कित्येक नद्या, पर्वत, समुद्र, गुहा विवरे पार करावी लागतील, ते वेगळेच. आणि हे पार करताना वाघ, सिंह, हत्तींसारखे हिंस्त्र प्राणी यांना तुम्ही सामोऱ्या कशा जाल? भले भले शूर म्हणविणारे देखील या प्राण्यांच्या नुसत्या डरकाळ्यांनी गर्भगळीत होतात! शिवाय वनजीवन कसे असते सांगू–भूमीची शय्या, आकाशाचे पांघरुण, कंद-मूळ-फळे-मिळाली तर ठीक नाहीतर उपवास, पाणी सुध्दा कोठे कसे मिळेल, मिळेल की नाही कांही सांगता येत नाही. शिवाय वनामध्ये राक्षस कपटाने अनेक प्राण्यांचे वेष धारण करुनही माणसांना खातात ते वेगळेच! तुमच्या सारख्या कोमल हंसगामिनीस मी बरोबर नेले तर सारे लोक काय म्हणतील? सर्वात महत्वाचे तुमच्या पित्याला तुम्हाला सुखात ठेवून जपण्याचे वचन दिले आहे-त्याचे काय? तेव्हा हा सारा साकल्याने विचार करुन माझे व आईचे म्हणणे ऐकून तुम्ही इथेच रहा."

<u>सीतेचे उत्तर –</u>

प्रेमळ सासूचे व प्राणप्रिय पतीचे दोघांचेही मृदु-मनोहर बोलणे ऐकून सीतेचे डोळे पाणावले. ती अत्यंत विव्हल झाली व म्हणाली, "हे महाराणी मला क्षमा करा! तुमचा व पतीराजाचा उपदेश-माझ्या परमहिताचा मी ऐकला.पण पत्नी या दृष्टीकोनातून विचार करता **पति-वियोगासारखे परम दुःख सौभाग्यवतीस दुसरे कोणतेही नाही.** तेव्हा प्राणनाथांविना स्वर्गीयसुखे देखील मला नरकासमान आहेत. **प्राणाविना देह किंवा पाण्याविना नदी-तशी पतीविना स्त्री** होते-कारण माता-पिता-बंधू-सासू-सासरा ह्या साऱ्यांपेक्षा 'पती' हाच स्त्रीचे दृष्टीने सर्वात श्रेष्ठ असतो. म्हणून तिला सहधर्मचारिणी म्हणतात. शिवाय नाथ! आपण बरोबर असल्यावर मला कसले आहे दु:ख? तुमच्या मुखकमलाकडे पाहून माझे सारे श्रम परिहरतील. वनातील वनदेव व देवी हे माझे सासू-सासरे, वनातील पशु-पक्षी हे माझे परिजन, वन हेच माझे नगर आणि वल्कले ही मला रेशमी वस्त्रांहूनही प्रिय होतील. पर्णकुटीत आपणाबरोबर शयन करताना मला स्वर्गीय सुखापेक्षाही समाधान लाभेल. आपणांसाठी सुकोमल पाने पल्लवांची शय्या मी तयार करेन रात्रभर मी आपले पाय दाबीन, एखाद्या वृक्षाखाली दमून बसताच पदराने वारा घालीन. वारंवार होणाऱ्या आपल्या दर्शनाने मला कसलेच कष्ट होणार नाहीत, झालेच तर आपले सुंदर मुखावलोकन करताच ते दूर होतील. शिवाय आपण बरोबर असतां, मजकडे वाकड्या नजरेने पाहण्याची कोणाची हिंमतच कशी होईल? तुमची छाया बनून सदैव तुमच्या सहवासाचा आनंद मला लुटूं द्या. तुम्ही वनांत कष्टमय जीवन काढायचे अन् मी इथे राजमहालात सुखोपभोगात लोळायचे हे कल्पनेनेही मला सहन होत नाही. **तुमचा वियोग म्हणजे माझा मृत्यु हे पक्के जाणा!"**

यावर राम बिचारे निरुत्तर झाले आणि वचन-वियोगही सहन न करणारी सीता आपल्या विना जगणार नाही हे जाणून त्यांनी तिला बरोबर येण्यास नाईलाजाने संमती दिली.

राम-लक्ष्मण संवाद --

तोच लक्ष्मण घाबरा घुबरा होऊन थरथर कांपत अश्रुभरल्या नेत्रांनी रामांच्या पायांवर येऊन कोसळलाच. कारण सारी प्रतिकूल दु:खद परिस्थिती पाहून राम बरोबर नेतात की नाही ही शंका त्याचे हृदय पोखरीत होती. त्याला राम म्हणतात ''हा प्रसंग अतिशय बाका, अवघड आहे. यावेळी आपले वृध्द पिता दु:खी, भरत-शत्रुघ्न आजोळी ही परिस्थिती पाहतां तू माझ्याबरोबर न येता या सर्व मातांना व अयोध्यावासीयांना धीर देण्यासाठी इथे राहणेच श्रेयस्कर कारण (राज) नीतीनुसार दु:खी प्रजेला अशा हवालदिल दु:खी अवस्थेत सोडून तूं माझ्याबरोबर येणे योग्य होणार नाही. तेव्हा बाळा, मोठा भाऊ या नात्याने माझे हे म्हणणे ऐक आणि स्वत:चे कल्याण साध.''

यावर लक्ष्मण म्हणतो -- ''हे प्रभो, तुम्हीच माझे माता-पिता-गुरु-बंधू आहांत. इतकेच नव्हे तर जगातील जितकी म्हणून स्नेहपूर्ण नाती आहेत ती सारी मी तुमच्याशी जोडलेली आहेत. तेव्हा हे दीनबंधो, तुमच्याखेरीज जगात माझे दुसरे कोणतेही जीवीतध्येय नाही. तुम्ही आहांत तर माझे जीवन आहे, अन्यथा मी मृत्यु स्वीकारेन''. ह्या त्याच्या अतिस्नेहार्द्र,कातर,व्याकुळ विव्हल वाणीतून रामांशिवाय हा जगणार नाही हे स्पष्ट दिसताच नाईलाजाने रामांनी त्याला आईची आज्ञा घेऊन ये असे सांगितले.

**आज्ञा पालनार्थ लक्ष्मण मातेकडे निघाले पण त्यांचे मन मात्र रघुनंदन व जानकी यांचे चरणीच्र राहीले.** उलट आई पुत्र-प्रेमाने-मोहाने अयोध्येत रहा म्हणाली तर हा लाभहानीत पालटणार की काय ही शंका वारंवार त्याला व्यथित करीत होतीच. लक्ष्मणांनी सर्व वृत्तांत सांगून सुमित्रेची अनुज्ञा घेण्यासाठी तिला नमस्कार करताच तिने त्यास शुभाशीर्वाद दिला व आपले सु-मित्रापण सुहृदयता सिध्द केले. ती म्हणते– ''बाळा, आता या क्षणापासून वैदेही तुझी माता आणि राम तुझे पिता. ते दोघे वनांत जात असतील तर तुझे अयोध्येत काय काम आहे? उलट आज तुझे पूर्वसुकृत -- पूर्व पुण्याई सर्वार्थाने फळास आली आहे असे समजून सर्वार्थाने या दोघांची सेवा कर. किंबहुना तुझे जीवन भाग्यशाली बनविण्यासाठीच हा रामांचा वनवास आहे असे समज.

स्वप्नातही विकारवश न होता, तन-मन पूर्वक त्यांची सर्वार्थाने सेवा कर. रामांना अयोध्या व माता कौसल्या, पिता दशरथ यांची त्यांना जरासुध्दा आठवण येऊं नये इतकी मनोभावे त्यांची सेवा करा. अशी परिपूर्ण सेवा करण्याची तुम्हाला संधी मिळाली, माझा पुत्र रामभक्त-रामसेवक बनला तरच खऱ्या अर्थाने मी 'पुत्रवती' ठरेन. जा बाळ, आनंदाने जा''. हा मातेचा शुभाशीर्वाद, उपदेशासह मिळालेला घेऊन, दावे तोडून जनावरे पळतात तसे लक्ष्मण रामांकडे पळत पळत गेले.

राम-सीता-लक्ष्मणांनी राजांचा निरोप घेताच राजा अत्यंत दुःखाने म्हणतात, ''माझ्या अपराधाची शिक्षा बाळांनो तुम्हांला कां? हा विधात्याचा कसला न्याय?'' शेवटी नाईलाजास्तव सुमंतांना यांना चार दिवस रथातून फिरवून आणा असे सांगून त्यांच्या परतण्याच्या वाटेकडे डोळे लावीत राजांनी हृदयावर दगड ठेवीत त्यांना कसाबसा निरोप दिला.

राम-सीता-लक्ष्मण वसिष्ठांच्या आश्रमाशी थोडावेळ थांबून त्यांचेवर राजांसह सर्व राज्याचा भार सोपवून निघाले. सर्व प्रजेला माझ्या पित्याला कोणीही दुःख देऊं नका असे सांगून त्यांनी अयोध्येबाहेर पाऊल ठेवले. त्याचक्षणी साऱ्या अयोध्याजनांना नेहमी सुखद वाटणारी अयोध्या रामांविना दुःखद, भयाण वाटू लागली. स्वतःचे घर स्मशान तर घरातील नातेवाईक-मित्र इ. भूते-यमदूतांसारखे वाटू लागले. इतकेच नव्हे तर अयोध्येतील बागा, वृक्ष–लता–वेली, तलाव सारे सारे सुकून गेले अन् ते सारे न पाहवून सारे लोक रामांच्या मागोमाग धावत सुटले. असे दुःखी, धावत आलेल्या आपल्या प्रिय जनांसह राम-सीता-लक्ष्मण सुमंतासह रथाने तमसा नदीच्या काठी पहिल्या मुक्कामी पोचले. सगळे लोक दमून झोपलेले पाहताच त्यांना पुढे इतके श्रम सोसणे शक्य नाही हे जाणून सुमंतांना रामांनी त्या सर्वांना चुकवून उत्तर रात्री रथ कोणत्याही चाकांच्या खुणा मागे न ठेवता दूर पळविण्यास सांगितले. उषःकाळी सगळे जागे झाल्यावर रामांनी आपला त्याग केला हे जाणले व नाईलाजाने ते सारे मृतवत् अयोध्येस परत गेले. केवळ **१४ वर्षांनी पुन्हा राम भेटतील या आशेवर जगण्यासाठी! त्या ध्येयपूर्तीसाठी प्रत्येकाने काहींना काही व्रत धारण केले.**

तिकडे राम-सीता-लक्ष्मणांसह शृंगवेरपुरी-गंगेकाठी पोचले. त्यांचा सखा निषादराजा गूह किंवा गूहक अतिशय प्रेमाने भेटला, पण रामांचा मुनिवेष पाहून अतिशय विव्हल झाला. त्याने रामांना आपल्या नगरीत येण्याचा आग्रह करताच त्यांनी आपले 'मुनिव्रत' असल्याचे सांगून प्रेमाने त्याची विनंती नाकारली. तेव्हा त्याच्या डोळ्यांना धारा लागल्या. मग त्याने सर्वांसाठी मृदु-मुलायम सुंदर पर्णशय्या तयार केली. राम-सीता त्या तृणशय्येवर गाढ झोपलेले पाहून गूहकाला अश्रू आवरेनात तो लक्ष्मणास म्हणतो –

'निषाद राजाचा विषाद' –

यांच्या सारख्या सुकुमार,सुकोमलांना जर तृणशय्या असेल तर ब्रह्मदेवांनी उत्तम गाद्या, गिर्द्या, सारे भोग-विलास कुणासाठी निर्माण केले आहेत? दशरथांसारखा इंद्रासन मिळविणारा सम्राट सासरा, जनकासारखा ज्ञानी पिता आणि रघुकुलदीप रामांसारखा पती असताना अति सुकुमार सीतेवर पर्ण-तृण शय्येवर झोपायची वेळ यावी? त्या कैकेयीच्या कुटिलपणाचा काय हा दैव--घात? सुखोपभोग भोगण्याच्या वयात त्यांच्या राम-सीता सारख्या निष्कपटी, निर्लोभी, सर्वांना प्राण-प्रिय, विश्वप्रिय अशांच्या वाट्याला हे वानप्रस्थी जीवन! हाय रे दुर्दैवा!

लक्ष्मण गीता –

या निषाद राजाचा विषाद दूर करण्याच्या हेतूने लक्ष्मण अत्यंत मृदु-मधुर शब्दांत त्याला उपदेश करतात, ''अरे बाबा, या जगात कोणी कोणाला सुख देत नाही की दुःख. जो तो आपल्या कर्मांची फळे भोगतो. शत्रु-मित्र, भेट-विरह हा सगळा भ्रम आहे. कारण जोपर्यंत ह्या जगाच्या मायेच्या पसाऱ्यात, मोहात जीव अडकतो तोपर्यंत हे संपत्ती,विपत्ती (संकटे), घर-परिवार. तोवर हे सगळे व्यवहार खरे वाटणार आणि त्यामुळे जीव सुखी वा दुःखी होणार. जे जे आपण ऐकतो, पाहतो, विचार-वा कल्पना करतो तिथपर्यंतच या जगाची मर्यादा आहे. कारण मोह हाच जगाचे मूळ आहे.म्हणजे सच्चिदानंदघन परब्रह्म हे आपले मूळ 'स्वरुप' आहे. हे विसरुन जो देहालाच मी मानतो तो खरे सोडून खोट्यालाच कवटाळतो आणि रडत बसतो. तेव्हा हे जग म्हणजे हा मोह

स्वप्नासारखा आहे. स्वप्नात जर कोणी भिकारी झाला किंवा त्याचे मस्तक कोणी धडावेगळे केले तर ते दु:ख जागे झाल्याखेरीज दूर होत नाही. जागा झाल्यावर तो माणूस भिकारीही होत नाही वा मरतही नाही. तेव्हा हा विचार करुन कोणालाही दोष देणे योग्य नाही. कारण सामान्यत: सर्वच जीव या मोहनिद्रेतच सदैव जगत असतात. अन् त्यातच अनेकविध स्वप्ने पाहत असतात. हे जग हीच एक मोहमयी यामिनी म्हणजे रात्र आहे. जे प्रपंची, संसारी असतात ते सारे या रात्ररुपी जगात सदैव झोपेतच-गुंगीतच असतात असे म्हणायला काहीच हरकत नाही. फारच थोडे लोक जे या मोहमयी जगापासून विरक्त होऊन ज्ञान वा योग मार्गाला लागतात तेच खरे जागे असतात. किंबहुना जे या मोहाच्या भ्रमाचा भंग करु शकतात तेच खरे ज्ञानी, अन् मग त्यांना रघुनाथांच्या चरणी प्रेम वाटू लागते. हे सख्या, परमार्थ म्हणजे दुसरे तिसरे काही नसून ज्याला वेद अव्यक्त, अनुपम, अनादि, अलक्ष्य, नित्य, अविकारी भेदातीत असे ब्रह्म म्हणते तेच हे ब्रह्म ह्या राम रुपात सगुण-साकार झाले आहे ते केवळ देव-ब्राह्मण संत-भक्त व भूमी यांचे हित करण्यासाठी अवतरले आहे. त्या रामाची सेवा, त्या रामाच्या चरण कमलांची नित्य आठवण हाच परम पुरुषार्थ होय! तेव्हा मित्रा, ह्या जगरुपी मोहाची ओढ सोड आणि आपले मन सीता-राम चरणीं सर्व समर्पण भावाने नित्य जोड; बस्स! अत्यंत हळूवार शब्दांत लक्ष्मणांनी असा सारांशरुपाने ज्ञान-वैराग्य व भक्ती यांचा सुंदर उपदेश निषादराज गूहकाला केलेला जवळच असलेल्या सुमंत व केवटानेही ऐकला.

पहाटे रामांनी स्नान आन्हिके उरकून गंगेस प्रणाम करुन तेथील एका वटवृक्षाच्या चिकाने स्वत:च्या व लक्ष्मणांच्या जटा बांधून टाकल्या. ते दृश्य पाहून वृध्द सुमंताच्या अश्रुधारा त्यांना अनावर झाल्या. त्यांना वडिलांचा मान देत रामांनी निरोप दिला व त्यांना प्रेमादराने अयोध्येत परत जायला सांगितले.त्यांच्याबरोबर तिघांचाही प्रेमळ विनीत निरोप माता-पिता-भरत व पुरजनांना दिला आणि हे तिघे गंगेपार जाण्यासाठी नांव व नावाड्याची प्रतिक्षा करू लागले. दूरवर एक नांव व नांवाडी दिसताच राम त्याला खुणेने लवकर बोलावू लागले पण तो असा खट्याळ तो सावकाश संथ गतीने त्यांचेजवळ येऊं लागला.

केवट प्रसंग –

राम-ब्रह्म आहेत हे लक्ष्मणाकडून जाणल्यामुळे त्या परब्रह्माची काया-वाचा-मन:पूर्वक सेवा करण्याची केवटाची मनीषा होती. अर्थात् हा संकल्प पूर्वजन्मापासूनचा होता. सुमंतांना निरोप दिल्याचा करुण-रस दूर करुन त्याला विनोदी झालर लावण्यासाठी तो प्रेमळ व थोडेसे ग्रामीण खोडसाळपणे बोलत प्रभुंना हसविण्याचा प्रयत्न करूं लागला. तो म्हणतो,- 'हे प्रभो, या माझ्या नांवेत तुम्हाला प्रवेश मिळेल पण तुमचे चरण-कमल मी माझे समाधान होईतो धुवेन मगच। कारण तुमच्या या चरण रज स्पर्शाने त्या अहिल्येची पाषाणाची, सजीव स्त्री बनली. माझी नांव तर लाकडाची आहे, ही स्त्री बनली अन् माझ्या गळ्यात पडली तर मी काय करु? कारण एक स्त्री-परिवार सांभाळता सांभाळता मला नाकी नऊ येत आहेत, त्यात ही दुसरी स्त्री सांभाळणे मला सर्वथा अशक्य आहे. कारण मी अडाणी, निरक्षर. ही नांव चालविण्याखेरीज दुसरे काहीही मला येत नाही. तेव्हा हे श्रीरामा, तुम्हाला दशरथांची शपथ आहे. भले लक्ष्मणांनी जरी मला बाणाचे लक्ष्य बनवले तरीही आपले पाय धुतल्याशिवाय आपणास माझ्या नांवेत प्रवेश नाही हे नक्की'. हे त्याचे प्रेमभराचे बोल ऐकून राम-सीता लक्ष्मणांकडे पाहून हसले व म्हणाले, ''ठीक आहे बाबा, तुझ्या मनासारखे कर, पण लवकर आवर आणि आम्हांला गंगापार उतरव''. त्याबरोबर लगबगीने केवट काथ्वटभर गंगेचे पाणी घेऊन आला आणि त्याने मनसोक्त ते चरण-कमल धुतले. ज्यांच्या तीन पावलांना (पदांना) विश्व अपुरे पडते,ज्यांच्या चरणनखांपासून जगपावनी गंगा उत्पन्न होते असे प्रभु, भक्ताची विनवणी करून त्याचा मनोरथ पूर्ण करतात. हाच प्रभुंचा मोठेपणा, उदारपणा ! गंगेचे ते पावन तीर्थ प्रभू चरण-स्पर्शाने अति पुनीत बनले, ते सर्व परिवारासह त्याने प्राशन केले अन् प्रभुंच्या या पाद्य पूजेनंतर त्या तिघांना त्याने आपल्या नावेतून गंगापार उतरवले. उतरताच प्रभूंच्या नजरेवरुन चटकन ओळखून सीतेने आपली हातातील अंगठी प्रभुंकडे दिली व ती प्रभू केवटास देऊं लागताच त्याचे डोळे पाणावले. तो म्हणतो, ''हे प्रभो, आपण माझ्या या होडीत बसलात आपले चरण-तीर्थ घेऊ दिलेत हाच माझ्या जीवनातला महा-प्रसाद होय. ह्याचे मोल कोणत्याही रत्न-जडजवाहीराने कधीही होणार नाही. आज अनमोल अशी मजूरी

या प्रसाद रुपाने मी भरून पावलो आहे तेव्हा मला काहीही नको. आपली इच्छाच असेल तर अयोध्येस परत फिरताना तुम्ही जे द्याल तें पुन्हा आपला प्रसाद म्हणून ग्रहण करीन. पण प्रभु असे चतुर, त्यांनी ताबडतोब केवटास आपली 'विमल भक्ती'च देऊन टाकली.

असे हे कृपासिंधू गंगेच्या पैलतीरावर उतरताच, सीतेने गंगेची पूजा करुन तिचे पती व दीरांसमवेत कुशलपणे अयोध्येकडे जाताना तिची यथासांग पूजा करणेचे मागणे मागितले. तर रामांनी पार्थिव शिवलिंग स्थापना करुन त्याची गंगेसह पूजा केली. गंगेनेही आकाशवाणीने सर्वांना कुशल कोसल देशास परत याल असा उत्तम आशीर्वाद तत्काळ दिला.

त्यानंतरचा मुक्काम प्रयाग क्षेत्री गूहकासह केला. प्रात:काळी संगम स्नान करून अक्षय वटवृक्षाखाली माधवाचे दर्शन शिवपूजन इ. तीर्थविधी करून जवळच असलेल्या भरव्दाज मुनींच्या आश्रमाकडे प्रभु वळले.

भरव्दाज भेट –

भरव्दाज आश्रमात मुनींना राम-लक्ष्मणांनी दंडवत घालताच मुनींनी त्यांना उठवून हृदयाशी धरले व त्यांना शुभाशीर्वाद देताना मुनी म्हणाले आज माझे नेत्र सुफल झाले. त्यानंतर राम-लक्ष्मण-सीता यांना शुभासन देऊन त्यांची यथासांग पूजा मुनींनी केली. त्यांना कंद-मुळे-फळे दिली. अन् त्यांची 'ब्रह्म' जाणून स्तुती करताना मुनी म्हणतात – ''हे प्रभो,सर्व त्यागून या तीर्थाचे ठायी राहण्याची सुफलता आज लाभली. आजवर जप,योग,वैराग्यपूर्ण जे जे साधन केले त्या सर्वांची सुफलता केवळ तुमच्या दर्शनात आहे. तुमच्या दर्शनाने नेत्र-मन-बुध्दि-अंत:करण यांना काय सुख लाभते ते कसे सांगू? हे प्रभो, तुमच्या चरण-कमलांचे ठायी मला **सहज-स्नेह** सदैव प्राप्त व्हावा. आणि सर्वस्वाचा त्याग करुन काया वाचा मन:पूर्वक माझा 'दास' म्हणून तुम्ही स्वीकार करावा हीच प्रार्थना.'' हे मुनींचे भावभक्तीभरले शब्द ऐकून रामांना संकोच झाला. परंतु काहीही न बोलता प्रभुंनी मुनींना अनुभवामृत (तृप्तीचे-आत्मतृप्तीचे)प्रदान केले. भरव्दाजाश्रमात राम-सीता-अनुजासह आलेले कळताच जवळपासचे अनेक ऋषीमुनी त्यांच्या दर्शनार्थ आले. एक दिवस भरव्दाजांच्या आश्रमात

मुक्काम करुन दुसरे दिवशी पुढे कोठे कसे जावे विचारताच मुनींनी चार बटु (वेदसदृश्य) असे पुण्यमूर्ती रामांबरोबर दिले.

भरव्दाज मुनींच्या आश्रमापासून वाल्मीकी आश्रमापर्यंत अनेक गावे,खेडी, वनप्रदेश, यमुना-नदी असा प्रदेश पायदळी तुडवीत हे तिथे पोचले. वाटेत त्यांचे दर्शन एका सुंदर गौरवर्णी तपस्याने घेतले. प्रभु-दर्शन घडताच उभी काठी ज्या गतीने आडवी होईल तसा सत्वर त्याने प्रभुंच्या पायावर आपला देह अर्पण केला. प्रभूंनी त्याला उठवून हृदयाशी धरले. सीतेने त्याला आपला पुत्र समजून प्रेमभराने आशीर्वाद दिला. तर लक्ष्मणांनी मोठ्या प्रेमाने त्याला उठवले आणि बरोबरच्या गुहाने दंडवत करताच तापसानें त्यास मिठी मारली. ही त्याची भेट म्हणजे प्रेम आणि परमार्थ यांचे मधुर-मीलनच होते! तो आपल्या अनिमिष नेत्रांनी त्या प्रभु-रुपामृताचे पान करीतच राहीला. कोण होता तो भाग्यवान? **ते होते वाल्मीकींचे कलियुगीन अवतार तुलसीदास !**-

या प्रवासात प्रभूंना जे ग्रामीण-आदिवासी-वनवासी भेटले, त्यांच्या इतके ऋजू-अत्यंत सरळ अंत:करणाचे त्यांचे प्रेमी भक्त प्रभुंना इतरत्र कोठेही भेटले नाहीत. कारण जो निसर्गाशी जवळीक साधतो,तोच प्रभुशी अधिक जवळीक साधू शकतो. पुढे श्यामवर्णी राम, मध्ये चंपकवर्णी सीता व त्यामागे गोरेपान लक्ष्मण असे त्रिकुट म्हणजे ब्रह्म-माया-जीव किंवा मदन-रति व वसंत ऋतू, किंवा चंद्र-रोहिणी व बुध असावेत असे शोभून दिसत होते. संपूर्ण वनवासात लक्ष्मणांची चालण्याची पध्दत विशेष शोभनीय-मननीय अशी होती- राम व सीता यांच्या पदचिन्हांना उजव्या बाजूने प्रदक्षिणा घालत लक्ष्मण पुढे जात असत. रामांच्या मागून चालत सीता रामपदांना प्रदक्षिणा घालतच जात असे.

त्यांचे प्रत्येक पाऊल प्रदक्षिणा घालतच पडत असे. अशा या नयनरम्य चितचोर त्रिकुटाचे ते मनोहारी दर्शन, ती सुरेख डौलदार चाल, लक्ष्मणांचा तो दास्यभाव पाहून स्त्री पुरुष नव्हे तर वनातले प्राणी-पक्षीही हर्षाने थक्क होत. प्रत्येक जीवमात्रास यांच्या सोबत अविरत प्रवास करीत रहावे अन् वाटेत त्यांच्यासाठी एखादा वृक्ष होऊन त्यांचेवर सावली धरावी, तर ते

चालताना त्यांच्यावर ढग-मेघ बनून छाया धरावी, ते वृक्षातळीं बसल्यावर त्या वृक्षांची पाने बनून त्यांना वारा घालावा, तर कंद-मुळे-फळे-मधुर जल बनून प्रभु मुखात प्रवेश मिळवावा असे वाटे. तर त्यांची सुखद शय्या बनण्याचे भाग्य आपणास मिळावे असे त्यांना जे पाहतील त्यांचे सर्वांचे मनोरथ असेच असत.

वाल्मिकी भेट --

मजल दरमजल करीत प्रभु अनुज व सीतेसह वाल्मीकींच्या आश्रमाजवळ पोचले. सुंदर पर्वत रांगा, उंच वाढलेले वृक्ष-त्यावर चढलेल्या लता वेली, जवळून वाहणारी नदी व त्या सभोवतालच्या परिसरात विहरणारे पशु-पक्षी असा आश्रम परिसर दुरुनही मोठा विलोभनीय दिसत होता. त्या तिघांचे आगमन झाल्याचे बटुंकडून कळताच मुनीवर त्यांच्या स्वागतासाठी पुढे झाले. राम-लक्ष्मणांनी दंडवत प्रणमन केले. त्या तिन्ही सन्माननीय अतिथींचा यथायोग्य सत्कार मुनीवरांनी केला. त्या नंतर रामांनी तिथवर का व कसे आले ते सर्व सांगितले व पुढे कोठे रहावे असे विचारताच वाल्मिकी म्हणाले, ''हे राम, तुम्ही जगदीश्वर, सीता तुमची आदिमाया, हा लक्ष्मण शेष असे तुम्ही तिघेही देवकार्यासाठी या पृथ्वीवर दुष्ट राक्षसांचा नि:पात करण्यासाठी आला आहांत. मूळचे तुमचे स्वरुप मन-बुध्दि इंद्रियादिं पलिकडचे वेदांनासुध्दा नेति नेति म्हणवणारे असल्याने मी व्यक्त रुपांत तुमचे वर्णन करुच शकत नाही. कारण ब्रह्मा, विष्णू महेशांसह साऱ्या विश्वाला खेळवू पाहणारे आपण केवळ साक्षी आहांत. **तुमचे हे मर्म तुम्हाला ज्याला हे कळावेसे वाटते त्यालाच समजते बरं! अन् असा जो तुम्हाला जाणूं इच्छितो तो तुमच्यातच विलीन होऊन जातो. हे रघुनंदना तुमची कृपा ज्यांचेवर होते असे भक्तच तुम्हाला जाणूं शकतात. आपले हे सोंग वा नाट्य योग्य वठविण्यासाठी तुम्ही विचारतां तर तुम्हांला राहण्यायोग्य अशी भुवने मी सांगतो.'**

१४ भुवने-भगवंतांची वस्तीस्थाने --

(१) ज्यांचे कान समुद्राप्रमाणे विशाल व खोल गंभीरपणे तुमच्या कथारूपी अनंत नद्यांचे सदैव स्वागत करतात अन् तरीही त्यांचे मन पूर्ण भरले असे कधीही होत नाही अशांची हृदये ही तुम्हाला राहण्यास शुभ होत.

(२) चातक जसा मेघ दर्शनासाठी आसुसलेला असतो अन् पाण्याचा एकेक थेंब टिपत राहतो तसे तुमचे जसे व जेवढे जिथून दर्शन मिळेल ते रुप बिंदु-कला-रुपें आपल्या जे हृदय संपुटात साठवून ठेवतात (दृष्टी व अंर्तदृष्टीव्दारा- ध्यानाने) अशांची हृदये ही तुमची सुख-सदने होत. (३) जे आपल्या मनरुपी मानस सरोवरात जिव्हारुपी हंसिणीस सतत आपल्या नाम-गुण-लीला-कथा यशादिंच्या वर्णनाचा मोत्याचा चारा भरवून पुष्ट करतात त्यांच्या हृदयात रामा रहा. (४) ज्यांचे नाक सदैव तुमच्याच निर्माल्याचा श्वास व वास घेत राहते, तुम्हांला निवेदन प्रत्येक गोष्ट केली जाते मग ते नवीन वस्त्र-ग्रहण असो की रोजचे भोजन असो तसेच देव-विप्र व गुरु यांना सादर सप्रेम सविनय जो नेहमी नमस्कार करतो आणि नित्य रामचरणांची पूजा व त्यांचेवरच सर्वस्वी भरोसा ठेवतो अशा भक्तांच्या मनीं तुम्ही वसती करा. (५) राम-मंत्र सदैव जपत, परिवारासह जे तुमची पूजा करतात तसेच होम-तर्पण इ. करुन विप्रांना वंदनीय मानून त्यांची सर्वभावे जे सेवा करतील आणि तेही निष्पाप व निष्काम बुध्दिने त्यांची मने हीच खऱ्या अर्थांने तुमची मंदिरे होत. (६) काम-कोप-मद-मान रहित असून लोभ-आसक्ती द्रोह,कपट, दंभ अशा विकारांनी ज्यांचे मन कधीही क्षोभ पावत नाही अशा व्यक्तिंच्या हृदयात हे रघुराया तुम्ही रहा. (७) जे नेहमी खरे,प्रिय आणि सर्वांचे हितकारक असेच बोलतात.ज्यांना सुख-दु:ख, स्तुती-निंदा समान असते, जे जागृती,स्वप्न व सुषप्तीत (झोपेतही) आपणांसच शरण जातात, तुमच्याविना ज्यांना दुसरी कोणतीही गतीच नाही अशांच्या अंत:करणात हे रामा तुम्ही रहा. (८) परस्त्री मातेसमान,पर-संपत्ती विषासमान मानुन दुसऱ्यांची समृध्दी पाहून आनंदतात व दुसऱ्यांच्या दु:खाने वा संकटाने दु:खी होतात व ज्यांना हे रामा तुम्ही अतीव प्राणप्रिय आहांत अशांची मने ही तुमची शुभ सदने आहेत. (९) ज्यांच्यासाठी तुम्हीच त्यांचे सर्वस्व आहांत म्हणजे माता-पिता-गुरु-सखा-स्वामी तुम्हीच आहांत अशांच्या मनरुपी मंदिरात हे प्रभो तुम्ही सीता व अनुज लक्ष्मणासह सदैव वास करा. (१०) जे आपले अवगुण जाणून, मान्य करुन त्यागतात, व सर्व सद्गुणांचे ग्रहण करतात, ब्राह्मण व गायी यांच्या रक्षण पोषणार्थ स्वत: संकटेही सहन करतात आणि असे नीतीमय जीवन जगून जगापुढे आदर्श ठेवतात त्यांचे मन हे तुमच्यासाठी शुभ सदन आहे. (११)

तुमच्यावर सर्वस्वी विश्वास त्यामुळे सद्गुण तुमचे व दोष स्वत:चे असे मानतात, आणि राम भक्त ज्यांना अतिशय आवडतात, अशांच्या सद्हृदयांत तुम्ही सीतेसह नित्य निवास करा. (१२) जे तुमच्यासाठी जात, गोत्र, धन,धर्म,मोठेपणा, परिवार,घर व सत्ता हे सर्व प्रिय व सुखद सोडून हृदयात केवळ तुम्हांलाच स्थान देतात त्यांच्या हृदयात हे रघुराजा तुम्ही आनंदाने रहा. (१३) स्वर्ग-नरक-मोक्ष हे सर्व समान मानून सर्वत्र तुमचेच धनुर्धारी रुप जे सदैव पाहतात, आणि मनाने,कृतीने,वचनाने तुमचे दास्यत्व स्वीकारतात, हे रामा, त्यांच्या हृदयात तुम्ही तुमचा तंबू कायम ठोकून रहा! (१४) **ज्याला तुमच्या सहज-स्नेहा खेरीज कांहीही नको अशांच्या हृदयात ते आपलेच घर आहे असे समजून तुम्ही नित्य निवास करा.** अशा प्रकारे ही १४ अलौकिक भुवने रामांना राहण्यासाठी वाल्मीकींनी दाखवून दिली. (पंच ज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये मन-बुध्दि-चित्त व अहंकार हे अंत:करण चतुष्ट्य या सर्वांना रामचरणीं कसे लावावे हे सांगून जणू १४ प्रकारची ही भक्तीच सांगितली.)

त्यानंतर लौकिक किंवा व्यावहारिक वा प्रासंगिक दृष्टीने या तिघांना राहण्यासाठी उत्कृष्ट ठिकाण चित्रकूट-कामदगिरी हे स्थान सुचविले. कारण मंदाकिनीचे पवित्र जल रोजच्या स्नान संध्यादिंसाठी तेथे आहे. नाना प्रकारच्या फळा-फुलांनी लगडलेले वृक्ष-वेलींचे घनदाट व रम्य जंगल, आणि मनोहर अशा पशु-पक्ष्यांनी भरलेला वन प्रदेश, शिवाय अत्रीसारख्या तपस्वी योगी-मुनी-ऋषी यांचे बाहुल्य. अशाप्रकारे तिघांनाही वन-जीवन सुंदर रितीने व्यतीत करण्यासाठी वाल्मीकींनी या तीन मनोहर मंगल मूर्तींना साजेसे सुरेख स्थान सुचविले.

श्रीरामांचा चित्रकूट-निवास -

लगेच तिघेजण तेथे पोचले देखील. लक्ष्मणाने फिरुन सारा कामदगिरीचा प्रदेश पाहिला व मंदाकिनी नदीच्या उत्तर तीरावर जो धनुष्याप्रमाणे चारी बाजूंनी फिरलेला सुंदर झुळझुळ वाहणारा ओढा होता त्याच्या काठी तावडतोब दोन पर्णकुट्या उभ्या राहिल्या देखील. कारण रामांच्या सेवेसाठी प्रत्यक्ष देवांचा शिल्पकार कोळी-भिल्ल यांच्या रुपाने येऊन त्याने ते काम केले. एक पर्णकुटी केवळ राम-सीता यांचे साठी व दुसरी मोठी अनेक ऋषी-मुनींसमवेत बसण्यासाठी.

चित्रकूटावर रघुनंदन सीता लक्ष्मणांसह जेव्हापासून राहू लागले तेव्हापासून ऋषी-मुनी व कोळी-किरात यांची रीघ तेथे लागली. कुणी स्वादिष्ट कंद-मुळे-फळे आणीत असे. तर कोणी मधाचे द्रोणच्या द्रोण भरून आणीत असत. अत्यंत मधुर अशा आदिवासी भिल्ल कोळ्यांच्या बोलीभाषेत अत्यंत प्रेम-आदर व विनयपूर्वक बोलत , जोहार करीत. वनसंपत्ती भेटवस्तू म्हणून रानमेवा प्रभूपुढे ठेवत असत. रामांना त्या ग्राम्य भाषेमागचे 'प्रेम'च भावत असे.

किंबहुना शहरी-नागरी लोकांपेक्षाही वनातल्या त्या लोकांचे **निष्पाप, निर्लोभ, असे प्रेम, प्रेम आणि प्रेमच रामांना अतिशय आवडे.** राम-लक्ष्मण-सीता यांच्या पदस्पर्शाने पावन झालेल्या त्या चित्रकूट कामदगिरी व तेथील मंदाकिनीचा हेवा सर्व समुद्र,गंगा यमुनादि नद्या, कैलास-मंदार, मेरू पर्वत करुं लागले. अन् विंध्याचलचा तो चित्रकूट राम-सीता-लक्ष्मणांच्या पावन स्पर्शाने अधिकच सुंदर, रमणीय व फलता-फुलता बहरता बनून चित्रवत् बनला.

सीता चित्रकूटावरील त्या पर्णकुटीत तृणशय्येवर रामांसह अत्यंत सुखाने मदन-शय्येवर निवांत झोपू लागली. चकोरीच्या पिलीणीप्रमाणे सदैव रामचंद्र-मुख चंद्रम्याचे दर्शन-किरण-पान करीत इतकी विशेष आनंदात रहात होती की तिला चुकूनही ना कधी माहेरची आठवण येई ना सासरची, ना कुणाचीही! पर्णकुटीतील ते पवित्र राहणे, तो कंद-मुळे फळे यांचा आहार अन् सोबतीला सुंदर रम्य पशु-पक्ष्यांचा सहवास यात सीता पूर्ण रसिकतेने रमून गेली. तर कधी येणाऱ्या ऋषी मुनींच्या जोड्या तिला सासु-सासऱ्यांप्रमाणे वाटत. अशा तऱ्हेने चित्रकूटावरचे त्यांचे वनवासी जीवन ऋषी मुनींच्या सत्संगात सुखात व्यतीत होत होते. राम सीता व लक्ष्मणांची पापण्या जशा डोळ्यांचे रक्षण करतात तितक्या सतर्कतेने, सजगतेने काळजीपूर्वक रक्षण करीत. तर लक्ष्मण व सीता त्यांची (रामांची) सेवा करण्यांत स्वत:स धन्य मानीत.

तिकडे सुमंत रामांचा निरोप घेऊन परत फिरल्यानंतर रामांशिवाय रथ ओढण्यास घोडे ही तयार होईनात. रामांच्या दिशेकडे पहात खिंकाळू लागले. जणूं रानातले घोडे जबरीने आणून रथाला जोडल्यासारखे पहाणाऱ्यास वाटावे असे ते खिंकाळत, अडखळत कसे तरी अयोध्येप्रत पोचले. घोड्यांची ही

अवस्था तर सुजाण सुमंतांची काय दशा झाली असेल, वाचकांनीच कल्पना करावी.....!

अश्रू भरल्या डोळ्यांनी, कधी थरथरत, कधी ग्लानीत रथात पडत, कधी शोकाने व्याकुळ होऊन हंबरडा फोडत कसेबसे अयोध्येत पोचले. पण दिवसा नगरीत शिरण्याचे धाडस होईना कारण राम-सीता-लक्ष्मणांना वनात सोडून अयोध्येत जाणे म्हणजे सद्गुरु-ब्राह्मण व गोहत्येसारखे अति महान पातक करणेच आहे. म्हणून त्यांनी रात्रीच्या काळोखात हळूच कोणी पहात नाहीसे बघून राजवाड्यात प्रवेश केला.

सुमंताने दासींच्या सांगण्यावरुन कौसल्येच्या महालात राजे असल्याने तिथे प्रवेश केला. प्रवेश करताच नुसत्या भूमीवर मलिन वस्त्रातले हीन-दीन उसासे सोडणारे दशरथ राजे दिसले. क्षणाक्षणाला राम कुठे आहे? वैदेही व लक्ष्मणास घेऊन सुमंत रथातून आला का? असे वारंवार विचारत होते. सचिवाने दंडवत प्रणाम करताच त्याच्या चेहऱ्यावरुन तिघेही आले नसल्याचे दशरथांना कळले. तेव्हा अत्यंत व्याकुळ होऊन त्यांनी निदान मला निरोप तरी काय दिला आहे ते सांग असे म्हणताच सुमंताने रामांचा निरोप 'तुमच्या कृपेने सुखाने हा माझा वनवासाचा काळ संपवून आपली आज्ञा पाळण्यासाठी येईन. गुरुंना, दशरथ-राजांना दुःख न व्हावे असे सारे प्रजाननानी वागावे. असा उपदेश करण्यास सांगितले आहे. भरतास नीतीने राज्य करून प्रजेस पुत्रवत् सांभाळण्यास व प्रजेला राजाच्या सेवेत राहण्याचे सांगितले आहे. तर वैदेहीने सर्वांची क्षमा मागून तुमच्या सेवेचे वेळी मला पतीबरोबर वनात जावे लागले असे सांगितले.लक्ष्मण मात्र कांहीतरी रागाने बोलताच ते त्याचे बोलणे कोणाला सांगू नकोस अशी शपथ रामांनी घातली.' असा रामाचा निरोप सुमंतांनी रडत रडत, अडखळत कसाबसा सांगितला.

दशरथ -- मृत्यु --

सुमंतांबरोबर राम पुन्हा कदाचित येतील ही वेडी धुगधुगती आशाही विफळ ठरल्यामुळे दशरथ अधिकच दुःखी झाले. त्यांना श्रावण-बाळाच्या अंध माता-पित्यांनी दिलेला पुत्र-वियोगाचा शाप आठवला. आणि आजपर्यंत कौसल्येपासून दडविलेली ही हकीकत त्यांनी तिला सांगितली. ती धैर्याने

दशरथांनाही धीर देत होती. पण कौसल्येचे सर्व प्रयत्न विफल ठरले कारण, 'हा रघुनन्दना, प्राणवासरा इतके दिवस मी तुझ्याविना जगलोच कसा? हा जानकी! हा लक्ष्मण ! हा राम! हा रघुवर!' असे म्हणत म्हणत त्याच रात्री दशरथांचे प्राण-पाखरु उडून गेले.

रामांकडे त्यांच्या मुखचंद्रमाचे चकोराप्रमाणे पान करीत दशरथ आपले जीवन जगले आणि त्यांनी आपला मृत्युदेखील राम-विरहाने, रामस्मृतीने, राम-नामाने सुंदर सुशोभित केला. अशी दिगंत कितीं मागे ठेऊन दशरथ गेले. त्यांचा विलाप करताना सर्वही राण्या (कैकेयी सोडून) राजांचे रुप-बल-तेज,गुण आठवून रडत होत्या. जणूं सूर्यकुलातला धर्मरुपी सूर्य दशरथांचे रुपाने अस्त पावला. सारी अयोध्या शोक सागरात बुडून गेली आणि सर्वजण कैकेयीला शिव्या-शाप दोष देऊं लागले.

उजाडताच वसिष्ठ आले. त्यांनी सर्वांचा शोक आपल्या ज्ञानाने हरण केला. राजांचा देह तिळाच्या तेलात सुरक्षित ठेवला. अन् भरत-शत्रुघ्न यांना ताबडतोब बोलवण्यासाठी चतुर हेर पाठवले.

भरत-चरित्र –

तिकडे भरतांची स्थिती कैकेयीने वरदान मागण्याच्या रात्रीपासून अत्यंत वाईट झाली होती. रोज वाईट स्वप्ने पडत, अपशकुन होत. त्यामुळे त्यांच्या मनात अनेक वाईट शंकांनी घर केलेच होते त्याच्या निवारणार्थ त्यांनी शिव-पूजन व ब्राह्मण दानही केले होते तोच दूतांनी 'ताबडतोब गुरूंनी बोलावले आहे.' ह्या निरोपासरशी भरत-शत्रुघ्नांसह ताबडतोब निघाले. मनातल्या अनेक उलट-सुलट वाईट शंकांसंबंधी विचार मंथन करीत असता अयोध्येत आले देखील. हीच का अयोध्या असा प्रश्न पडावा इतके भयाण-भीषण, दु:खप्रद वातावरण पाहून मनांत धास्तावले-खंतावले. कुणाला कांही कुशल विचारेपर्यंत ती व्यक्ती नमस्कार करुन चटकन खालमानेने दूर जाई. राजवाड्याच्या प्रवेशव्दाराशी कैकेयी मातेने नटून सजून केलेली पंचारती ओवाळणी पाहून कांही क्षण शंकेचे सावट दूर झाले खरे, पण एक कैकेयी सोडली तर प्रत्येकाच्या चेहऱ्यावर दु:खच दु:ख दिसत होते.

कैकेयीकडून सर्व हकीकत समजताच, विशेषत: राम-सीता-लक्ष्मणांसह वनांत गेले हे ऐकताच भरतांनी जो हंबरडा फोडला त्याने सर्वांची हृदये शतश: विदीर्ण झाली. तोच मंथरा-कुबडीही नटून सजून आल्याने शत्रुघ्नाच्या (कधी नव्हे ते) तळपायाची आग मस्तकात गेली व त्याने ताडकन् तिला लाथ मारली. त्याबरोबर ती रक्त ओकत तोंडघशी पडली. त्या प्रसंगीही करुणामयी भरताने तिची सुटका केली अन् ते दोन्ही बंधू नवे व्यालेले वासरु गायीकडे जसे झेपावते तसे कौसल्येकडे धावत गेले. भरताला पाहून जणूं रामच परत आला या भावनेने कौसल्या मूर्च्छितच पडली. तर तिची ती अवस्था पाहून भरताचेही देहभान हरपले. भरत मातेला व स्वत:ला दोष देत अंत:करण फुटेपर्यंत शोक विलाप करत राहिला. अन् कौसल्या त्याचे सांत्वन करीत राहिली. तर कधी कौसल्येने दु:खमग्न व्हावे व भरताने सांत्वन करावे असे रात्रभर सुरु होते. भरताने जे घडले त्यास आपली संमती असेल तर जगातील सर्वच्या सर्व महापातके-पातके-उपपातके यांचा दोष स्वत:कडे घेण्याची तयारी दर्शविली. पण या कटाची मला कांहीही कल्पना सुध्दा नव्हती इ. वारंवार सांगायला सुरुवात केली. अशा तऱ्हेने सारी रात्र यातच संपली.

उजाडताच वसिष्ठ वामदेव, अनेक ऋषी-मुनी, सचिव, महाजन सारे आले आणि त्यांनी भरताला दशरथांची वेद विधीनुसार सर्व दाहक्रिया, उत्तरक्रिया व सर्व १४ दिवसांचे अंत्यसंस्कार करण्यास सांगितले. त्यानुसार भरताने अत्यंत प्रेमाने व श्रध्दापूर्वक चंदनाची विमानाच्या आकाराची चिता रचली. यथासांग सर्व अंत्यसंस्कारांनंतर अपार धन-संपत्तीचे दान केले. गायी, हत्ती, घोडे, रथ, अन्न, वस्त्रे, सुवर्ण, अनेक रत्नजडित अलंकार, भूमी व मुख्यत्वें सिंहासन सारे सारे काही दान दिले.

१४ दिवसांनंतर वसिष्ठ, सचिव, महाजनांनी विशेष राजसभा आयोजित केली आणि सर्वांसमोर दशरथांच्या मृत्युचे कारण इ. सर्व हकिकत मांडली आणि शेवटी सभेचे समापन करताना मुख्यत्वें दशरथांनी कैकेयीला दिलेल्या वचनानुसार भरतांनी राज्याचा स्वीकार करुन अयोध्येस सनाथ करावे हे सांगितले. कौसल्येनेही 'गुरुंचा उपदेश' स्वीकारण्यास भरताला सांगितले. पण भरत पित्याच्या मृत्युच्या आणि विशेषत्वे स्वत:मुळे राम-सीता-लक्ष्मणांच्या वनवासाला कारणीभूत झाल्याने शोकमग्नच होता हे जाणून वसिष्ठांनी समजावण्यास सुरुवात केली.

**वसिष्ठांचे मते कोणती व्यक्ती मृत झाल्यावर शोक करावा?** पहा– दशरथांचा मृत्यु शोचनीय नाही हे सांगून शोच्य कोण त्याची भली मोठी यादी सर्वांना ऐकविली. वसिष्ठ म्हणाले- जो ब्राह्मण वेद विरुध्द वागतो, स्वधर्म सोडून विषय-विलासात रमतो तो शोचनीय. जो राजा नीती जाणत नाही व ज्याला प्रजा प्राणप्रिय वाटत नाही तो शोचनीय. जो वैश्य कवडीचुंबक बनून धनवान असूनही शिवभक्ती व अतिथी सत्कार करत नाही तो शोच्य. जो ब्राह्मणांचा अपमान करतो आणि वृथा मान गर्वाने ज्ञानाचे प्रदर्शन करतो त्याच्या मृत्युनंतर शोक पाळणे इष्ट जी स्त्री कुटीलपणाने पतिवंचना करुन पतीशी सतत भांडून स्वत:च्या इच्छेनुसार वागते ती शोचनीय होय. जो बटु आपले ब्रह्मचर्यव्रत न पाळता, गुरु-आज्ञेचे उल्लंघन करतो तो शोक करण्यास योग्य. जो गृहस्थ मोहात पडून आपले स्वकर्म-स्वधर्म-स्वत:चे कर्तव्य कुटुंबाचे भरण-पोषण करणे यांत कसूर करतो त्याचा शोक करावा. जो विवेक आणि वैराग्य यांचा धरलेला मार्ग सोडून संन्यासी म्हणवणारा पुन्हा प्रपंचात रमतो तो शोकास उचित. तर तपस्येसाठी वानप्रस्थ स्वीकारलेला पुन्हा विषय-भोगांकडे वळतो तो शोचनीय आहे. जो विनाकारण आपले माता-पिता, गुरु-बंधू यांच्याशी विरोध करतो तो पापी शोकाचा अधिकारी ठरतो. जो स्वत:च्या देहाचे चोचले पुरविण्यासाठी दुसऱ्यांचा निर्दयपणे छळ करतो, तो सर्वतोपरी शोचनीय आहे. आणि सर्वात अत्यंत शोचनीय तो की जो कपटरहित होऊन हरिभजन करीत नाही तो किंबहुना जो आपले दु:ख-दोष देवावर लादून त्यालाच दोष देत स्वत:चे दु:ख कुरवाळीत राहतो तो शोचनीय होय.

तेव्हा हे भरता, उलट हा राम स्मरणाने सुशोभित झालेला दशरथाचा मृत्यु हे सर्व मानवांना आदर्श असे उदाहरण झाले आहे. तेव्हा त्यांच्या वचनपूर्तीसाठी जसे रामांनी आनंदाने वनवास स्वीकारला तसे तुम्ही राज्य स्वीकारणे हे तुमचे कर्तव्य आहे.

हे ऐकतांच त्या सभेत भरत उठून उभे राहिले. सर्व प्रथम गुरु व माता यांना प्रत्युत्तर देण्यासाठी उभे राहिल्याची क्षमा मागितली व म्हणाले, "खरे तर

**राम व सीता यांची सेवा करणे हा प्रत्येक जीवाचा आद्य धर्म व स्वधर्म आहे.** ते सोडून ज्या माझ्यामुळे राम-सीता यांना वनवासी, कष्टी जीवन स्वीकारावे लागले अशा माझ्यासारख्या महापातक्याला या अत्यंत पवित्र अशा सूर्यकुलातील सिंहासनावर बसविणे म्हणजे शनि-राहू-केतू सारख्या वाईट ग्रहदशेच्या व्यक्तिस वात व्हावा, त्यास इंगळीचा दंश व्हावा व त्यावर त्याला दारू पाजण्यासारखे आहे. माझ्या सारख्या पापी-अधमास हे पवित्र राज्य दिले तर हे राज्य विनाश पावेल. खरे तर पित्याचा मृत्यु व राम-वनवास हे ऐकून ज्याअर्थी माझा मृत्यु झाला नाही त्याअर्थी या प्राणांत अजून भोग लालसा – पापवासना आहे हेच सिध्द होते. तेव्हा यावर माझे मते उपाय एकच. मी कितीही महामूर्ख, पापी,अपराधी असलो तरी ही उरातली माझी जळजळ केवळ राम-दर्शनाने शांत होईल. तेव्हा हे सारे राजवैभव रामांचे रामांना अर्पण करण्यासाठी उद्या सकाळीच मी रामांकडे जायला निघतो. वनांतच त्यांना राज्याभिषेक करवून त्यांना परत अयोध्येस घेऊन येणे हाच त्यावर एकमेव उपाय आहे. तेथे राम जशी आज्ञा मला देतील तसे मी वागेन.'' हे भरतांचे राम प्रेमाने ओथंबलेले शब्द ऐकून सर्वांना भरत म्हणजे **रामप्रेमाची ओतीव मूर्तीच वाटली. तत्क्षणी भरत सर्वांना 'प्राणप्रिय' बनले.** उदास, उजाड, भीषण भयंकर अयोध्येवरचे दु:खी सावट दूर होऊन सर्वत्र उत्साह संचारला. भरतांबरोबर सकाळी जाण्याच्या आनंदाने सारेजण तयारी करु लागले. रामदर्शना पुढे घर-संपत्ती सर्वांना तुच्छ वाटू लागली. म्हणून घर राखायला कुणीच कुणाला सांगितले नाही. भरतांनी मात्र सर्व संपत्ती रघुनाथाची असा विवेकपूर्ण विचार केला व अत्यंत विशुध्द अंत:करणाच्या सैनिकांना अयोध्येच्या रक्षणार्थ भरतांनी त्यांना अयोध्येतच ठेवले. स्वप्नांत सुध्दा ज्यांनी स्वधर्म पालन कधी एक क्षणही चुकविले नाही अशांना अति पुण्यवान व त्यासाठी सुयोग्य म्हणून त्यांचे हाती अयोध्या सुपूर्द केली.

चतुरंग सेना, अभिषेकाची सर्व तयारी,यांसह रघुकुलध्वजा पाठोपाठ वसिष्ठ-अरुंधती अग्निसह सर्वात पुढे रथात, त्यानंतर सुसज्ज अशा पालख्या मेण्यात सर्व राण्या व सर्वांत मागे भरत-शत्रुघ्न असे रामदर्शनासाठी निघाले. भरत-शत्रुघ्न पायी चालत निघाल्यामुळे सारे अयोध्याजनही चालत निघाले पण

सारे राम-वियोगाने कृश बनल्यामुळे चालूं शकत नसल्याचे प्रजादक्ष कौसल्येच्या लक्षात आले. त्याबरोबर तिने आपला मेणा भरताजवळ नेऊन त्यास शत्रुघ्नासह बळे बळे रथात बसण्याची आज्ञा दिली. अशा तऱ्हेने तमसा-गोमती सई नदी ओलांडित शृंगवेरपुरात सारे दाखल झाले.

चतुरंग सैन्यदल पाहून निषादराजा गूहकाला वाटले भरत-शत्रूघ्न वनवासात रामाचा काटा दूर करून स्वत: अकंटक राज्य करूं इच्छितात म्हणून रामाला मारण्यासाठी निघाले आहेत. म्हणून त्याने आपल्या भिल्ल-किरातांचे सैन्य अस्त्र-शस्त्रांसह सुसज्जही केले. परंतु भरताची ती प्रेमाकुल अवस्था पाहून भरताचे रामप्रेम उमगल्याने गूहासह सर्व सैन्य भरतासह चतुरंग सैन्याच्या सेवेत दाखल झाले. आता सर्वांसह प्रयागात भरव्दाजाश्रमात एक रात्र भरत विश्रामले. **तीर्थराज प्रयागाकडे भरतांनी चारी पुरुषार्थ उपेक्षून फक्त जन्मोजन्मी रामरती-रामचरणीं नित्य वाढणारे प्रेम जेव्हा मागितले तेव्हा भरव्दाजांसह सर्वांचे नेत्र पाणावले. 'रामस्नेहमूर्ती' अशा शब्दाने भरव्दाज मुनींनी भरतांचा उचित गौरव केला** व त्यानंतर ते म्हणतात, "राम-दर्शनाच्या पुण्याचे सुफळ म्हणजे तुमचे दर्शन होय," भरव्दाजांच्या आज्ञेनुसार ऋध्दि-सिध्दींच्या आदरातिथ्याने सर्व सैन्यास योग्य अशी विश्रांती मिळते व पुढे यमुनातीरावर सारे मुक्काम करतात. यमुनेचे ते श्यामवर्णी जल पाहून भरतांचे अश्रू रामांच्या श्यामवर्णी आठवाने सतत झरुं लागतात. निषादराज गूहकांच्या सांगण्यानुसार राम-सीता-लक्ष्मणांसह त्यांची जी जी विश्रामस्थळे होती तिथे तिथे भरत लोटांगण घालीत, आपल्या अश्रूंनी त्या त्या वृक्ष,पर्णशय्या इत्यादिंना अभिषेक घालीत, भावपूर्ण होत हळूहळू चित्रकूटाजवळ येऊन पोचले.

रामस्नेहाने विकल झालेली भरतांची ती दशा पाहून सारी सृष्टी जणूं अश्रूं ढाळूं लागली. मेघ भरतांवर सावली करुं लागले, शीतल-मंद-सुगंधी वारा राम प्रेमाने-चित्रकूटावरुन वहात येऊन-भरतांना सुखवूं लागला. तर पृथ्वीने खास भरतासारख्या रामदास-रामभक्त-रामप्रेमीसाठी आपल्याकडचे काटे, काटेरी गवत, खडे खाचखळगे सारे लपवून त्या मार्गावर फुले पसरली. राम भेटीचे शुभ-शकुनही भरतांना होऊ लागले. भरतांचे रामप्रेम पाहून पाषाणही

द्रवले. भरतांबरोबर असणाऱ्या चतुरंग सेनेमुळे घोडे,हत्ती यांच्या पायांनी उडलेली धूळ दूरवर पसरली.

तिकडे चित्रकूटावरील पर्णकुटीत त्याचवेळी सीतेला अयोध्यावासी सारे उदास व सासूंचे चेहरे भकास-कसे तरीच न पाहवणारे असे स्वप्न पडले. सकाळी तिने हे रामांना सांगताच राम म्हणाले 'हे स्वप्न कांही चांगले नाही. काहीतरी वाईट बातमीची ही पूर्वसूचना असावी' म्हणून त्याच्या परिहारार्थ शिवपूजन करुन आसपासच्या ऋषी-मुनींचा त्यांनी सत्कार-पूजनादि केले. तोच कोळी-किरातांनी भरत चतुरंग सेनेसह येत असल्याची खबर दिलीच. ती खबर ऐकतांच रामांच्या मनात पिताश्री दु:खी असताना भरत माझेकडे सैन्यासह का येतो, मला अयोध्येला नेण्यांचा आग्रह करुन पित्याला दिलेले वचन मोडायला लावणार तर नाही ना या विचाराने आशंकांचे काहूर माजले. लक्ष्मणांनी मात्र निषादराज गूहकाप्रमाणेच विचार केला व प्रतिज्ञा केली- "प्रत्यक्ष भरत-शत्रुघ्न सैन्यासह रामांना मारण्यासाठी शत्रू बनून येत असतील तर त्यांनी भगवान शंकरांचे साह्य घेतले तरी मी रामांचे रक्षण करीन अन् सर्वांचा फडशा पाडेन". या प्रतिज्ञेने सारी पृथ्वी डळमळली आणि देवांनी आकाशवाणीव्दारे लक्ष्मणांच्या बाहु-बळाचे कौतुक केले पण उचित-अनुचित पाहून विवेकाने कार्य करा असा सावधानतेचा इशाराही लक्ष्मणांना मिळाला. त्यामुळे लक्ष्मण मनोमन लाजले. त्यानंतर सीता-राम यांनी लक्ष्मणांची पाठ थोपटली व जवळ बसवून प्रेमाने भरतांविषयीचे आपले मन उघड करुन सांगितले-

रामांचा भरतांविषयीचा दृढविश्वास –

आयती सत्ता हाती आली की अभिमान होणे हा अगदी सर्व-सामान्य नियम झाला. परंतु जो सदैव संत-साधु-सज्जनांच्या सहवासात असतो त्याचे बाबतीत हे कदापि शक्य नाही. लक्ष्मणा, बाळा ! ब्रह्मदेवाच्या या सृष्टीत भरतासारखा प्रेमळ, भावुक अन् ऋजु (सरळ) हृदयाचा भाऊ सापडणे शक्य नाही. अगदी त्रैलोक्याचे राज्य मिळाले तरीही भरताला गर्व होणे अशक्य ! एकवेळ अंधार सूर्याला गिळेल, संपूर्ण आकाश एकाच ढगात राहिल, गाईच्या पावलाइतक्या पाण्यात अगस्तीमुनी बुडतील, पृथ्वी आपला क्षमा-धर्म सोडून

देईल, अशा साऱ्या अशक्य घटना घडतील परंतु लक्ष्मणा तुझी शपथ, वाटल्यास पिताश्रींची शपथ घेऊन सांगतो की माझ्या भरतासारखा शुध्द स्वच्छ मनाचा भाऊ कोणीही नाही बरं! या जगातले सारे अवगुण पाण्याप्रमाणे सोडून देऊन फक्त सद्गुणांचे ग्रहण करणारा **माझा भरत हा रविवंशरूपी सरोवरातला राजहंस आहे,** बरं! असे भरताचे गुण,शील,स्वभाव कीर्ती वर्णन करतां करतां राम जणू भरत-प्रेम सागरात खोल खोल डुंबू लागले.

रामांचे हे भरतावरील अगाध प्रेम, हा दृढविश्वास पाहून देव सुध्दा आनंदाने डोलू लागले तर सीता व लक्ष्मण त्या आनंद लहरींवर हळूवारपणे हेलावत, तरंगत राहतील यात नवल ते काय?

इकडे भरतासह सर्वांनी त्या पवित्र मंदाकिनीत स्नान केले. प्रभूंच्या दृष्टीने व पद--स्पर्शाने पावन झालेला सुरम्य चित्रकूट-प्रदेश पाहून सर्वांची मने सुखावली. माता गुरुजन, सचिवादिची आज्ञा घेऊन भरत व शत्रुघ्न रामभेटीसाठी साऱ्यांना तेथेच तंबूत विसावून पुन्हा चालले. कारण इतक्या जवळ येऊन आता राम विरहात राहणे त्यांना सोसवेना. दूरुन भरतांना रामराज्य कसे भावले ते सुंदर कल्पना चित्र पहा --

'विवेक' या वन-संपत्ती-समृध्दीचे अनभिषिक्त राजे म्हणून शोभून दिसत आहेत. कारण हा सुखी वनप्रदेश व येथील भावुक कोळी-भिल्ल, किरात ही यांची उत्तम व लाडकी प्रजा होय. वैराग्य हे यांचे सचिव-मंत्री आहेत. हा रमणीय कामद-गिरीचा फळाफुलांनी लगडलेल्या वृक्षराजींचा प्रदेश रामांच्या सहवासामुळे अधिक शोभनीय व पवित्र बनला आहे. शमदम हे विवेक राजांचे शूर सेनापती शूर-वीर योध्दे होत. तर हा दुर्गम कामद-पर्वत हीच त्यांची राजधानी आहे. शांती व उत्तम पवित्र सदबुध्दी ह्याच त्या दोन सुंदर राण्या आहेत. उत्तम राजा सर्वांगांनी परिपूर्ण आहे. रामचरणांचा आश्रय म्हणजे रामस्नेह हाच मन सदैव उत्साही ठेवणारा सन्मित्र आहे. मोहरूपी राजा व त्याचे सैन्य यांना विवेक-राजाने आपल्या सैन्यबळावर जिंकले आहे. त्यामुळे तेथे त्याच्या राज्यात सदा सर्वकाळ संपत्ती व शुभकाळ सुखाने नांदत आहेत.या राज्यातील शहरे-गाव-खेडी म्हणजे इथे वसणारे अनेक प्रकारच्या योगी-ज्ञानी-मुनी ऋषींचे आश्रम होत. तसेच त्यांचे समवेत राहणारे नाना प्रकारचे चित्र-

विचित्र पशु-पक्षी ही प्रजा होय. त्याचे किती म्हणून वर्णन करावे-अगदी वाघ, सिंह हत्तींपासून सुमधुर आवाजाच्या मोर-कोकिळादि पक्ष्यांपर्यंत सारे आहेत. सर्वांत महत्वाचे म्हणजे राम-राजाच्या प्रभावांकित असल्याने ते आपसांतील नैसर्गिक वैरभाव विसरुन गुण्या-गोविंदाने एकत्र विहरत विचरत आहेत.जणूं ही (पशु) चतुरंग सेनाच म्हणा नां! निझर्रांच्या प्रवाहात हत्तींच्या मस्त गर्जना हे जणू झडणारे नगारे-नौबती होत! आपल्या राजाचे सदैव गुणगान गाणारे हे चकोर, चातक, पोपट, कोकिळा तर त्या निर्झरातले हंस व त्यातील कमळांवर गुंजारवणारे अनेक भ्रमर आहेत. या सुंदर राज्याचे प्रतिक म्हणून आनंदाने नाचणारे मोर व लांडोर यांचे नयनरम्य नर्तन! अन् या राजाचे सदैव मंगल चिंतनार्थ त्यावर पुष्प-अक्षतांच्या वर्षावाचे प्रतिक म्हणजे या वृक्षांची गळणारी पक्व फळे व फुले असा हा कामदगिरी आता विवेक राजाचा (रामाश्रित) बनलेला पाहून रामभक्त भरत हे दृश्य लांबून पाहूनच तापसाला तपस्येचे फळ मिळावे तसे सुखावले.

## राम-भरत भेट –

भरत निषादासह जसा जसा रामाश्रम जवळ करूं लागला तसतसे त्या दृश्याच्या सौंदर्यात पावित्र्याची अधिकाधिक भरच पडत चालली. तमाल, आंबा, जांभूळ, पिंपरी या वृक्षराजीत मधोमध शोभणाऱ्या त्या विशाल वटवृक्षाखाली ती सुंदर पर्णकुटी पहा. घनदाट निळसर हिरव्या पाने-पल्लवांच्या सुखद दाट छायेत ही पर्णकुटी विसावली आहे. तर त्या वडाची लालचुटुक फळे त्या पर्णकुटीची शोभा वाढवत आहेत. मंदाकिनीच्या उत्तर तटावरची ही सुरेख पर्णकुटी उन्हाळा, पावसाळा, हिवाळ्याच्या तापापासून सुरक्षित आहे, ती या दाट वृक्षाच्या सावलीमुळे. त्या वटवृक्षाभोवताली मंडलाकार अशी सुरेख वेदिका सीतेने आपल्या सुबक हातांनी सजविलेली दिसते. त्याच्याजवळ तुळशीचे सुंदर-बनही लक्ष्मण व सीता यांनी खास तयार केलेले दिसते आहे. त्या पवित्र वातावरणात मुनीगणांसह तिथे राम-सीता व लक्ष्मण नेहमी वेद-पुराणे-इतिहास इत्यादींचे श्रवण करीत असतात. दुरुन दिसणाऱ्या त्या वटवृक्षाकडे पाहून भरतांचे अश्रू झरूं लागले. तिथून रामापर्यंत जाईतो राम-सीता चरण चिन्हांची धूळ मस्तकांना

लावीत, अगदी रघुवर-भेटीचाच जणूं त्यायोगे आनंद अनुभवीत भरत,शत्रुघ्न व निषादासह पुढे निघाले. दाट झाडीमुळे रामांसमोर बसलेल्या लक्ष्मणांना,भरत नीट दिसले नाहीत. तोच झपाझप पावले टाकीत भरत रामाश्रमांत प्रवेशले आणि तेथेच 'प्रभु, पाहि नाथ, पाहि माम् । (प्रभो, माझे रक्षण करा)' असे म्हणत कोसळलेही. दुरुन रामाश्रमात प्रवेश करताच रामांना दंडवत प्रणाम करणारे भावुक भरत पाहून लक्ष्मणांची चांगलीच कोंडी झाली. कारण राम त्यांच्या प्रश्नांना उत्तर देत असल्यामुळे चटकन् उठता येईना, अन् मन म्हणत होते भरतासारखा मोठा भाऊ समोर दिसत असून त्यास आदराने उठून नमस्कार नाही करत. पण त्यातून रामसेवेस श्रेष्ठपण देऊन ती कोंडी थोडीशी फोडली. हे प्रभो, भरत आपणास नमस्कार करत आहे, असे मृदुवाणीने लक्ष्मणांनी सांगताच राम भरत प्रेमाने अधीर होऊन इतक्या आवेगाने उठले की हातीचे धनुष्य एकीकडे बाण दुसरीकडे तर अंगावरचे उत्तरीय गळून खाली पडल्याचेही त्यांना भान राहिले नाही. प्रणाम करणाऱ्या भरतास तर उचलून त्याला आपल्या हृदयाशी घट्ट कवटाळून धरले. ही **राम भरत भेट म्हणजे दोन भावुक परमस्नेह पूर्ण जीवाशिवाचं मिलन, यांची भेट. यें हृदयीचे ते हृदयी घातले. त्या दोघांबरोबर पाहणाऱ्या प्रत्येक जीव मात्राचे देहभान भुलविणारी ती प्रेम भेट, भगवंत-भक्ताचे मिलन होते ते ! ते दृश्य व तो भाव शब्दात सापडणेच्च अशक्य!** त्या नंतर राम शत्रुघ्नास व निषादास भेटले. भरताने अगणित वेळां सीतेच्या चरण-कमलांवर मस्तक नमविले. त्या कमलपरागांचा स्पर्श होताचं भरत स्नेहमग्न तर झालेच पण स्वकल्पनेचे-भीतीयुक्त सारे मोहोळ क्षणार्धात दूर झाले. काही क्षणांची नीरव शांतता पसरली. कारण प्रदीर्घ काळाच्या या भावातुर भेटीने सर्वांच्याच मनाची गती कुंठीत झाली. सर्वांची मने एका अलौकीक शांती-तृप्ती-समाधान मंगलमय आनंदाने परिपूर्ण भरली. त्यानंतर त्या प्रेम सागरातून हळूहळू बाहेर येताच निषादाने माता-गुरु सचिवादि पुरजन मंदाकिनीच्या तटावर थांबल्याचे सांगितले. त्याबरोबर शत्रुघ्नाला सीतेजवळ ठेवून राम-लक्ष्मण व भरत पळतच गुरु व माता यांना भेटण्यास निघाले.

वसिष्ठ-अरुंधती, कैकेयी-कौसल्या-सुमित्रा व सर्व महाजनांसह

समस्त पुरजनांना एका क्षणार्धात-प्रत्येकाला राम भेटले.अगदी प्रत्येकाला जसे भेटावे वाटत होते तसे भेटले. हे मर्म कुणाच्याही ध्यानी आले नाही. कारण प्रत्येक जीव राम-भेटीस आसुसला,व्याकुळला 'आर्त बनला' होता हे रामांनी जाणून विश्वरुप-अनंत रुपे भेटण्याची लीला केली.नंतर वसिष्ठांसह सारा विप्र परिवार,माता,निवडक महत्वाच्या महाजनांसह सारे रामाश्रमाकडे परत येतात. तेथे पोचताच सीता गुरु व गुरुपत्नींना नमस्कार करते व सासवांना नमस्कार करण्यापूर्वी त्यांच्याकडे पाहताच भीतीने डोळे मिटून घेते. कारण शुभ्र वस्त्रा, सौभाग्यरहित त्यांना पाहणे हे सीतेला अनंत यातनादायक होते. त्याबरोबर सीतेच्या डोळ्यांना धाराच लागल्या. मग कसा बसा धीर एकवटून भानावर येत तिने सर्वांना नमस्कार केला. तेव्हा त्या स्नेह-विकल सीतेचे पाय त्या दु:खवेगाने लटपटूं लागले. तिचे सर्वांनी सांत्वन करुन तिला बसविले. वसिष्ठांनी दशरथांच्या मृत्युची सारी हकीकत सर्वांना सांगितली व स्वत:च्या ज्ञानतेजाने सर्वांचे सांत्वन करण्याचा प्रयत्न केला. रामांना तर अपार असे दु:ख झाले कारण **आपल्यावरचे अलोट प्रेम हेच पित्याच्या मृत्युला कारण झाले हे जाणून ते अधिकच शोक विह्वल झाले.** त्याचवेळी चित्रकूटावरच जणूं दशरथांचा मृत्यु झाल्यासारखी सर्वत्र अवकळा पसरून जणूं शोक सरिताच सर्वत्र वाहूं लागली. राम-सीता-लक्ष्मणांनी-सर्वांनीच त्या दिवशी निर्जल व्रत धारण केले. त्यानंतर पुन्हा रामांनी स्नान केले व यथाशास्त्र सर्व विधीकरून पित्याची क्रिया केली.

## राम-वसिष्ठ संवाद –

आपल्या अयोध्येतले सुख-समृध्दीत सदैव राहणारे लोक असे दु:खी,कंद-मूळ-फळे खाऊन राहताना पाहून रामांना अतीव दु:ख झाले म्हणून त्यांच्या व आपल्या प्रिय अयोध्येच्या काळजीमुळे राम वसिष्ठांना म्हणाले, "हे गुरुवर, भरत-माता व हे सारे, असे दु:खी वनवासी जीवन जगताना पाहून माझे मन अत्यंत व्यथित होते. शिवाय सर्व सैन्यासह आपण येथे, दशरथांचा नुकताच मृत्यु झालेली तेव्हा अयोध्येच्या संरक्षणार्थ आता आपण नगरीत परतावे हे योग्य होईल, नाही कां? हे उध्दटपणे बोललो याबद्दल मला क्षमा करा."

त्यावर वसिष्ठ म्हणतात- हे करुणायतना रामा, धर्ममर्यादा

पुरुषोत्तमास शोभेसेच तुमचे बोलणे आहे. त्यात स्वजनांसह प्रजेचा कळवळा ओतप्रोत भरलेला आहे. परंतु हे दु:खी कष्टी कृशजन यांना तुमच्या दर्शनाने विश्रांती व परतण्यास शक्ती मिळेल ती पुरेपूर मिळूं द्या. अजूनी दोन दिवस तुमच्या दर्शनाचा लाभ यांना घेऊ देत. हा गुरुशिष्यांचा सुसंवाद प्रजाजनांना जणूं नवजन्माची उभारीच देऊन गेला.

अयोध्यावासींची चित्रकूटावरील दिनचर्या –

उष:काली, माध्यान्हीं व सायंकाळी पवित्र मंदाकिनीत स्नान करावे, तेथे काठावर बसून संध्यावंदन करावे. ध्यान, मानस पूजा, पंचायत पूजा करावी. जपादि आपले नित्य आन्हिक उरकून राम-सीतांसह ऋषी-मुनींचे दर्शन घ्यावे. त्यांच्या सत्संगाचा दुर्मिळ लाभ लुटावा अन् अमृतापेक्षाही सुमधुर स्वादिष्ट फळादिंचा सुस्वाद घेत, त्या निर्मळ मंदाकिनीचे पाणी पिऊन तृप्त व्हावे. रामगिरीचे नयनरम्य लोभसवाणे दर्शन घेत घेत पायी फिरावे. आणि पुन्हा राम-दर्शनाने तृप्त मनाने निसर्गाच्या कुशीत निष्काळजी मनाने शांत झोपी जावे. अयोध्येत गाद्या-गिर्द्यांवर लोळणाऱ्यांना हे निसर्ग-सुख स्वर्गसुखासारखे सहज सुंदर वाटूं लागले अन् अशी चौदा वर्षे इथे रामांबरोबरच व्यतीत करावीत असा विचार हळूंहळूं सर्वांच्याच मनीं स्थिरावूं लागला.

पहिली खाजगी सभा-भरत-वसिष्ठांची –

गुरु-वसिष्ठांना नमन करुन भरत-शत्रुघ्न, ब्राह्मण व मान्यवर मंत्रीगणांसह निवडक सभासदांची सभा भरली. प्रथम वसिष्ठांनी प्रारंभ केला. हे सुजाण भरता! रामांनी सत्य-वेद व धर्म पालन करून सर्व जगताचे मंगल व्हावे ह्या हेतूने सूर्यकुळात जन्म घेतला आहे. दुष्टांचे निर्दालन व देव-ब्राह्मण-संताचे हित हा त्यांचा मुख्य हेतू आहे.त्यामुळे नीती,प्रेम,परमार्थ व स्वार्थ ह्या क्रमाने ते धर्माचे पालन करतात. तेव्हा रामांची आज्ञा पाळणे यातच आपले सर्वांचे हित आहे. तेव्हा सर्वानुमते योग्य ते करावे.

त्यावर भरत सांगतात (भरत उवाच) –

हे गुरुदेव तुमचे वचन सत्यच आहे.पण श्रीरामांना राज्याभिषेक व त्यांचे अयोध्येत परतणे होईल यास उपाय वा पर्याय कृपया सुचवावा. वसिष्ठांना उत्सफूर्तपणे सुचते त्यानुसार ते म्हणतात-तुम्ही दोघे वनात जा व राम-सीता-लक्ष्मण अयोध्येत परत फिरतील. या गुरुवचनाने भरतांना अतीव आनंद झाला ते म्हणाले, 'राम अयोध्येत राहणे व राज्याभिषिक्त होणे हेच माझे ध्येय साध्य होत असेल तर मी जन्मभर देखील आनंदाने वनात राहीन'. ही पहिली खाजगी सभा इथे संपली.

प्रथम राम दरबार –

त्या नंतरची सभा रामांसह सर्वजणांची भरली. प्रथम त्या सभेत गुरु वसिष्ठांनी भरत-प्रेमास माझी बुध्दी वश झाल्याने भरतच आपले म्हणणे मांडेल असा प्रस्ताव मांडला. त्यावर रामांनी भरताची उघड उघड स्तुती केली. त्यानंतर भरतांनी रामप्रेम स्वत:वर बालपणापासून कसे आहे ते सांगत स्वत: आर्त स्वार्थी असल्याचा कमीपणा स्वत:कडे घेतला. तसेच स्वत:मुळे पितृमरण व राम वनवास घडला असे सांगून भरत आत्मग्लानीत बुडून गेले. त्यावर राम म्हणाले, ''तुमचे माझ्यावरचे प्रेम व अंत:करणातील तुमचा शुध्दभाव मी जाणतो. परंतु मी तरी काय करुं? सत्यवचन पालनार्थ पित्यांनी माझा त्याग करून मृत्यु जवळ केला आणि तुमच्या प्रेमाखातर त्या पित्याला दिलेले वचन-भंग करून तुमच्यासाठी अयोध्येत परतणे हे ही जीवघेणे आहे. तरीही **तुमच्या प्रेमाखातर मी वचनभंगाचे पापही पत्करीन, तेव्हा गुरुजी आज्ञा देतील किंवा तुम्ही जे म्हणाल ते करीन.**

त्यावर भरत म्हणतात- हे प्रभो, तुमचे प्रेम, गुरुंची कृपा मजवर असलेने माझी तळमळ कांहीशी निवली. जो आपल्या स्वामीला संकटात-धर्मसंकटात पाडतो, तो असा माझ्यासारखा अति नीच दास असतो. तेव्हा हे करुणाकरा, तुमच्या मनालाही त्रास होऊं नये, आणि बहुजनांचे हित-सुख व्हावे असा एक उपाय मी सुचवितो. यात माझ्या सारखा हीन-दीन सेवकाचे हित-स्वार्थही साधेल व अनेकांचे हित रुपी परमार्थ साधेल. हे प्रभो, ही राज्याभिषेकाची सर्व तयारी आणली आहे त्याचा स्वीकार करुन ती मान्य करुन घ्यावी. आणि मी व शत्रूघ्न वनांत जाऊं, आपण लक्ष्मण-सीतेसह अयोध्येत

परत फिरा. किंवा आम्ही तिघे बंधू वनात जाऊं आपण सीतेसह राज्यावर बसून अयोध्येस सनाथ करा. हे सर्व प्रस्ताव मी आपणापुढे आर्त (संकटात पडलेला,पीडलेला) अशा भावनेतून मुख्यत्वें माझा स्वार्थ नजरेपुढे ठेवून मांडले आहेत. यात विवेकाचा अभाव आहे याची मला जाणीव आहे. तरी हे प्रभो,आपण अत्यंत कृपाळू आहात. हे सारे संत-सज्जन ऋषी, मुनी देखील या आपल्या प्रेमळ स्वभावाची स्तुती करतात. तेव्हा ज्या निर्णयाने आपणाला संकोच वा धर्म संकट वाटणार नाही आणि समस्त विश्वाचे मंगल,सुमंगलच होईल तो आपण निर्णय द्यावा. आपली आज्ञा वा निर्णय शिरोधार्य मानून सर्वच जण तसे वागतील हेच या महान पेचातून,विघ्नातून सर्वांची निश्चित सुटका करेल. या भरत भाषणावर सर्वांनी हर्षाने माना डोलावल्या व 'अति उत्तम' म्हणताच देवांनी ही स्वर्गातून पुष्पवृष्टी करुन आपला त्यावर आनंद प्रगट केला. परंतु रघुनाथ मात्र गप्प बसले, कारण त्यांना संकोच व धर्मसंकटाने पुरते घेरले होते. त्यांची ती अवस्था पाहून सर्व सभाही स्तब्ध,दु:खी झाली. तेवढ्यात जनक-दूत तेथे आल्याने ती सभा त्वरित तेथेच विसर्जित झाली.

जनकदूत व वसिष्ठ संवादातून जनक आपल्या अंत:पुरासह चित्रकूटाजवळ आल्याची बातमी कळली. सर्व अयोध्याजनांना तात्पुरता दिलासा मिळाला लगेच सर्वांचे मनोरथ चौखूर उधळायला लागले, 'राम राजे होवोत, जानकी राणी होवो व भरत युवराज होवोत अशा सुखानंदमय अयोध्या-राजधानीत रामराज्यातच आम्हांला मृत्यु येवो.'

जनक रामाश्रमाजवळ आल्याचे कळताच राम-गुरु-बंधू, सचिव व पुरजनांसह त्यांचे स्वागत करण्यासाठी पुढे गेले. रामांना पाहताच सर्वांचे पथश्रम,प्रवासाचा शीण दूर झाला. सर्वजण यथोचित एकमेकांना भेटले. पुन्हा शोकसागराला प्रचंड भरती आली. सर्वांच्या शोकाचे सांत्वन विश्वामित्रांनी अनेक पुराण-कथा सांगून केले. त्यानंतर सर्वच जण स्नान करून शुध्द झाले. अशौच समाप्ती होऊन पूजा करुन नंतर कोळी किरातांनी पाट्या भरभरुन आणलेल्या फळ-मूळादिंचा फराळ सर्वजण करु लागले. अशा प्रकारे चार दिवस गेले. सीता-रामांसमवेत, चित्रकूट-मंदाकिनीच्या पावन व रम्य

ठिकाणी,कंद-फळ-मूळे खाऊन असेच चौदा वर्षे आनंदाने रहावे असे सर्वजण मनांत म्हणू लागले. तर त्यांच्या दुसऱ्या मनाने त्यांना हा विचार झटकून 'आपण सतत रामांबरोबर रहाणारे इतके कुठले पुण्यवान' असे म्हणून निराशही केले.

जनकाच्या सुनयनादि व कौसल्यादि राण्या यांची भेट व शोकसभा –

कौसल्येने सुनयनादि सर्वांना बसा म्हणून प्रेमादराने आसने दिली. रामराज्याभिषेकाची वार्ता उडत उडत येवून तिला दशरथ-मृत्यु व राम-सीता-लक्ष्मणाच्या दु:खद वार्तेने अगदी झाकाळूनच टाकले असे म्हणून सर्वच शोकमग्न झाल्या. परंतु भरताची मला फार चिंता वाटते असे म्हणून कौसल्येने विषयाला तोंड फोडले. व ती म्हणाली रामांच्या वनवासामुळे हा भरत आत्मग्लानीने कसा सुकून गेला आहे पहा. **रामाविना भरतास परत अयोध्येत जावे लागले तर तो जिवंत राहील की नाही ही शंका मला सारखी अस्वस्थ करते.** तेव्हा आता ज्ञानीराजे या भूमिकेतून जनक महाराजांना भरता (गूढरामप्रेमामुळे त्याच्या जीवीताची काळजी मला वाटते म्हणून) त्याचे रक्षण करणेस माझे वतीने सांगा असे विनविले व फार वेळ झाली असे सुमित्रेने सुचविताच ही स्त्री सभा विसर्जित होऊन सुनयनादि आपल्या तंबूत परतल्या. आणि जाताना कौसल्यादिंच्या अनुज्ञेने सीतेला आपल्या बरोबर घेऊन गेल्या.

सीतेची जनकांसह सर्व परिजनांशी भेट –

(सीतादेखील आदिमाया आदिशक्ती असलेने तिनेही एका क्षणार्धात सर्वांची भेट घेतली अगदी यथायोग्यपणे-ज्याला जसे हवे त्या भावात सर्वांना ती भेटली.) तिची वल्कले पाहून सर्वच जण व्याकूळ बनले. जनकांनी न राहवून दोन्ही कुळांचा तूं उध्दार केलास या शब्दांत तिचा गुण-गौरव करताच पित्याच्या त्या स्नेहपूर्ण वाणीने सीतेला जणूं संकोचाने गिळून टाकले. माता-पिता, सख्या,स्वजन,परिजन यांना प्रेमभराने भेटून,बोलून सुनयनेने सीतेची मन:स्थिती जाणून तिची पर्णकुटीत पाठवणी केली.

जनक-सुनयना संवाद –

भरताची आत्मग्लानी, त्याचा संकोची विनयी स्वभाव, त्याचे बोलणे वागणे यावरुन त्याचे ओथंबणारे रामप्रेम पाहून जनक-सुनयना थक्क झाले. दोघेही आपआपल्या परीने भरताचे गुण-वर्णन करु लागले तेव्हा कौसल्येची खंत, तिच्या मनाचा सल सुनयनेने जनकांजवळ स्पष्टपणे प्रगट केला. तेव्हा जनक म्हणाले, "तिघे बंधू वनात जाणे व राम-सीता अयोध्येत परतणे हे सर्वांच्या हिताचे आहे खरे पण..." राम पित्याच्या सत्यवचन पालनासाठी वनात आलेले, ते ही धर्म मर्यादा सोडतील? आणि भरतांचे रामांवर कितीही अपरंपार प्रेम असले तरी, रामाज्ञा ते तरी मोडतील? या अनुत्तरीत प्रश्नांतच रात्र संपून उजाडू लागले.

राम-वसिष्ठ संवाद:

सकाळी सर्वांची आन्हिके उरकताच पुन्हा रामांनीच वसिष्ठ गुरुंकडे विषय काढला की,"आता तर मिथिलेसह अयोध्याजन सारेच बरेच दिवस या वनात अनेक क्लेश सहन करीत राहताहेत हे आता मला बघवत नाही तेव्हा हे नाथ! गुरु या नात्याने सर्वांचे हित आपल्याच हाती आहे", त्यावर वसिष्ठ म्हणाले- रामांचे ईश्वरत्व जाणून, सर्वांनी ते जाणले आहे त्या मुळे उलट तुमच्या सहवासात या वनातही सारे सुखी आहेत. तुमच्या प्रेम-भक्तिरसात डुंबले आहेत. हे राम, तुम्ही तुमच्या आश्रमात जा. मी पाहतो काय उपाय करावा ते.

जनक भरत संवाद :

पुन्हा जनक भरताकडे गेले आणि त्याला आपली ही मनाची कोंडी, घालमेल त्याला सांगितली. "राम सत्यव्रत, धर्मशील जसे आहेत तसे ते अत्यंत कृपाळू अन् तुमच्या प्रेमाखातर काहीही करणारे आहेत. तेव्हा त्यांना धर्मसंकटात टाकायचे की कसे?" त्यावर भरत म्हणाले- "आपणासारखा ज्ञानसागर माझेपुढे असतां मी लहान तोंडी मोठा घास घेणे म्हणजे महामूर्खपणा होय. प्रभूंना काय आवडेल, त्यांचे धर्मरक्षण कसे होईल, आणि माझे त्यांचेवरील प्रेम राखून सर्वांचेच कसे हित होईल हे आपणच सांगू शकाल." भरतांच्या मृदु, मधुर, सूत्रबध्द, नेमक्या अर्थवाही वाणीने जनक अतिशय आनंदाने भरतांची प्रशंसा करू लागले आणि भरतासह त्यांनी आपला मोहरा रामांकडे वळविला.

हे सारे प्रसंग व संवाद ऐकणाऱ्या व पाहणाऱ्या स्वर्गीय देवांत इंद्रासह सर्वांची घाबरगुंडी उडाली. कारण आपल्या स्वार्थास बाधा येणार व भरत स्नेहापुढे राम भक्तवश होऊन अयोध्येकडे परतणार असे वाटू लागले. तेव्हा बृहस्पतींनी उपदेशाचे डोस पाजून सर्वांना गप्प केले.

## चित्रकूटचा दुसरा दरबार –

जनकांनी भरताचा मनोदय रामांना सांगितला. त्यावर राम जनकांना म्हणाले तुम्ही या सभेत आता राजे व पिता म्हणून सर्वांनाच दशरथांच्या जागी आहांत तेव्हा तुमच्या समोर आम्ही लहानांनी काय बोलावे? या रामांच्या मृदु,मधुर सत्य वाणीने जनक संकोचले-लाजले. पण काय बोलावे हे त्यांना कळेना अन् त्यांनी मोठ्या आशेने भरताकडे पाहीले. प्रसंगाचे गांभीर्य व जनकांची कोंडी नेमकी ओळखून शेवटी नाईलाजास्तव भरतच त्या सभेत उठून उभे राहीले. राम, जनक, वसिष्ठांसह सर्व ऋषी मुनींना हात जोडून प्रणाम करुन बोलू लागले- ''लहान असून मी या विव्दत् सभेत बोलण्याचे धाडस किंबहुना उध्दटपणा करीत आहे याबद्दल सर्वांनी सर्व प्रथम मला क्षमा करावी.'' सुंदर शुभ शारदेस हृदयातून स्मरणपूर्वक आवाहन केले व पुन्हा राम-सीतांना मनोमन नमस्कार करुन सर्वांकडे विवेकपूर्ण नजर टाकली तेव्हा सारी सभा रामप्रेमाने शिथिल झालेली दिसली. अन् त्यानंतर भरतांनी आपल्या बोलण्यास प्रारंभ केला- ''रामप्रभू, आपणच आता माझे पिता, गुरु, स्वामी, सुहृद, पूज्य, परमहितकर्ते व अंतर्यामीही आहात. आपण अत्यंत सरळ मनाचे, सर्वज्ञ, सुजाण असून शरणागताचे रक्षणकर्ते असे सुस्वभावी स्वामी आहांत. आपणासारखा सर्व-समर्थ व गुणग्राहक असा सुस्वामी परंतु तुमचा दास म्हणविणारा मी मात्र आपला द्रोही ठरलो. कारण आपल्या प्रेमाने मोहित होऊन पित्याचे वचन मोडून सर्व समाजासह राज्याभिषेकाचा साज सजवून इथवर आलो. तेव्हा माझ्यासारखा दुष्ट, आज्ञा मोडणारा मीच. रामाज्ञा मोडणारा आजवर कोणी कधी ऐकला किंवा पाहिलाही नसेल. तो असा माझ्यासारखा हा उध्दट, हे सभासदहो, पहा नीट पहा आणि अशा या माझ्या अक्षम्य अपराधाला प्रभुंनी माझ्यावरच्या त्यांच्या असीम स्नेहापोटी उत्तम सेवा मानली, काय हे त्यांचे औदार्य! भक्ताचे अपराध पोटी घालणे या ब्रीदाला जागून कृपाळु प्रभूंनी

माझी ही धृष्टता देखील गोड मानून घेतली. आजवर नाथ माझे असेच सारे लाड पुरवित आले आहेत. पण ही धृष्टता म्हणजे आर्त बनून केलेला हा माझा महा-अपराधच आहे. तेव्हा हे प्रभो, आता या अपराधाचे परिमार्जन करुन मी निर्दोष बनावे अशी काही आज्ञा करा.''

''हे प्रभो, आपल्या चरण कमल परागांची शपथ घेऊन सांगतो, कारण ही शपथ म्हणजे सत्य,सुपुण्य व सुख यांची परिसीमा आहे. ती शपथ घेऊन सांगतो की **जागृती, स्वप्न, निद्रा या तिन्ही अवस्थांत सहज स्नेहाने स्वामी सेवा मजकडून यापुढे घडो असा कृपाशीर्वाद मी आपणांकडे मागतो**'' – असे म्हणत भरत अत्यंत प्रेमविह्वल होऊन पुलकांकित शरीराने प्रभु-चरणांवर कोसळले व त्यांच्या प्रेमाश्रुंचा अभिषेक रामांच्या चरण-कमलांवर होऊं लागला. त्यांचा तो आंतरिक स्नेह जाणून अतिशय प्रेमाने आत्मीयतेने सन्मानपूर्वक श्रीरामांनी भरतास हृदयाशी धरले व अमृतवाणीने त्याला शांत करीत आपल्या अगदी जवळ बसविले.

बृहस्पतींच्या उपदेशाचा पुन्हा विसर पडून इंद्रासह सर्व देव-सभा राम व भरतांचे हे अतीव प्रेम पाहून पुन्हा घाबरली. ती समस्त सभा राम-भरतांच्या त्या प्रेमसागरात खोल-खोल बुडून गेली. त्यामुळे कांही काळ नीरव निःस्तब्ध शांतता पसरली. सर्वांच्या नजरा दोघांवर खिळून राहिल्या. सर्वांची प्रेममग्न विह्वल मनोवस्था ओळखून श्रीराम सभेत आपल्या नेहमीच्या मृदु मधुर अमृतवाणीने बोलूं लागले. तात् भरता! तुम्ही धर्माची धुरा वाहणारे, लोक व वेद जाणणारे प्रवीण भक्त आहांत. काया-वाचा मनःपूर्वक तुम्ही अत्यंत विशुध्द आहांत. म्हणून न राहवून तुमचे धाकट्या भावाचे गुणवर्णन मी या सभेत करतो. तात् ! पित्याच्या अभावी होणारी दुर्दशा केवळ आपले कुलगुरु व मिथिलापती यांनी थोपविली. तुमच्या माझ्यासह आपले राज्य, लाज, पत (प्रतिष्ठा) व राजवैभवासह प्रजा यांच्या कृपेनेच या सर्वांचे सुरक्षण झाले आहे. ह्या प्रसंगी हे महान संकट तुम्ही व मी मिळून यांच्या कृपेने चौदा वर्षे पार करुं. तुम्ही अत्यंत मृदु असूनही तुम्हांला १४ वर्षे हे राज्य सांभाळण्याचे कठीण काम सांगणे माझ्या जीवावर येत आहे. पण काय करूं, नाईलाज आहे. या संकटकाळी मोठा भाऊ म्हणून मी तुमचे साह्य करण्याऐवजी हा वज्राघातच करीत आहे. पण

माता-पित्यांच्या आज्ञेमुळे मी विवश आहे. तेव्हा तुम्ही अयोध्येचे रक्षण करा. स्वामी- हा मुखिया मुख्य मुखासारखा बनून जसे देहात सर्व अवयवांचे भरण-पोषण करतो, तसे तुम्ही प्रेमाने साऱ्या प्रजेचे भरण पोषण कराल हा मला विश्वास आहे.''

हे श्रीरामांचे प्रेमामृतपूर्ण भाषण ऐकून सारी सभा त्या स्नेह समाधीने शिथिल झाली. भरताचेही हृदय निवले, त्याच्या मुखावर प्रसन्नता दिसू लागली. आणि मुक्या व्यक्तिला शारदेचा जणूं वाणीप्रसाद मिळावा तसे भरत पुन्हा उठून प्रेमाने हात जोडून श्रीरामांना म्हणाले – ''हे नाथ, या वनात आपल्याबरोबर राहण्या-फिरण्याचे सद्भाग्य मला लाभले. जणूं या जन्माचा हा लाभच होय. आपली आज्ञा तर शिरसावंद्य आहेच. पण कांही असे अवलंबन आधार आश्रय द्या की त्याच्या आधारे मी आपल्या आज्ञेनुसार आपण येइतो चौदा वर्षे या राज्याचा भार पेलेन. शिवाय आपल्या राज्याभिषेकासाठी हे जे पवित्र तीर्थ व सर्व साहित्य आणले आहे त्याचे काय करुं? आणखी एक माझा मनोरथ आहे पण आपल्या पुढे मांडायला भीती व संकोचही वाटतो. त्यावर रामांनी निःसंकोचपणे सांग म्हणताच पुढे भरत म्हणाले-प्रभु, या चित्रकूटावर जितकी पवित्र तीर्थ-स्थाने आहेत, आणि आपल्या चरण स्पर्शाने जी जी भूमी विशेष पवित्र झाली आहे ते सर्व पहावे असे मला वाटते. तरी आपली आज्ञा असावी.'' यावर रामांनी आनंदाने तत्काळ संमती दिली व म्हटले अत्रि मुनींचे दर्शन व उपदेश घेऊन त्यानुसार सर्व चित्रकूटाची यात्रा निर्भयपणे करा आणि अत्री मुनी सांगतील तेथे हे तीर्थ जल ठेवा. ह्या राम-भरत संवादाने सर्वांचेच समाधान झाले. सारेजण राम व भरतांचे गुण-वर्णन अथकपणे करीतच राहिले. सर्वांनाच आता रामांचा अल्पकाळातच निरोप घ्यावा लागणार हे जाणून राम-विरहाचे दुःख तर भरतांसारखा रामस्नेही सुस्वभावी त्राता मिळणार म्हणून आनंद झाला. असे सारे जण ऋषी-मुनी जनकांसह या बंधू-प्रेमाने सद्गदित झाले.

भरताची चित्रकुटाची यात्रा –

रामाज्ञेनुसार अत्रि मुनींचे अनुशासनाप्रमाणे भरतांनी सर्व पवित्र तीर्थे चित्रकूटावरील एका कूपाजवळ ठेवणेस पाठवले आणि भरत स्वतः अत्रीसह

अनेक ऋषि-मुनींसमवेत त्या कूपाजवळ पोचले. कूप म्हणजे खूप खोल विहीर. हा कूप म्हणजे ते अनादि सिध्दस्थळ होते त्यात पवित्र तीर्थ ओतून त्याचे नांव अत्रिंनी 'भरत कूप' असे ठेवले. खूप खोल असल्याने पशु-पक्ष्यांच्या स्पर्शाने ते अपवित्र होऊं नये हा हेतू.अत्रि मुनी पुढे म्हणाले, आजपासून या भरतकूपात जो स्नान करेल तो कर्म,वचन, मन यांनी विमल होईल असा या तीर्थाचा पुण्यप्रभाव पुढे प्रसिध्द होईल. त्यानंतर आसपासची पावन-स्थळे पाहता पाहता प्रवासात अत्रिंनी भरतांना अनेक धर्म-इतिहास विषयक ज्ञानोपदेश केला. त्यानंतर सर्वजण पुन्हा रामाश्रमात गेले तेथे फलाहार-विश्रांती रात्री घेतली. उष:काली स्नान संध्यादि आपला नित्यक्रम उरकून रामादि सर्व ऋषि-मुनींचे दर्शन व आशीर्वाद घेऊन अनवाणी फिरून दररोज चित्रकूटावरील अनेक पुण्य पावन स्थळे पाहून दररोज रात्री रामाश्रमात येत. या क्रमाने पाच दिवसांत भरतांनी मोठ्या आनंदाने व प्रेमपूर्वक रामस्पर्शित सारा चित्रकूटाचा परिसर पाहिला. रामांनी जिथे जिथे विश्रांती घेतली असेल तेथे तेथे दंडवत प्रणाम करीत, तर जेथे रामांनी स्नान केले असेल त्या त्या तळ्यात,झऱ्यात स्नान करून मनात सदैव अत्यंत सुंदर अशा अभिरामांसह-सीता व लक्ष्मण यांचे स्मरण करीत, सर्व प्रवासात अत्रीच्याकडून शिव-विष्णूंच्या अनेक सुरस कथा ऐकत असत.

चित्रकूट यात्रेच्या या वर्णनावरुन तीर्थयात्रा कशी करावी हाच जणूं तुलसीदासांनी आपला स्वानुभव येथे ग्रथित केलेला दिसतो. असे भावमग्न होऊन सतत हरिस्मरण युक्त अनवाणी पायाने जाणे,त्या त्या तीर्थ-स्थळे-मंदिरे यांचे दर्शन श्रध्दापूर्वक घेऊन,सतत सत्संगात हरिकथेत रममाण होत हा प्रवास करणे म्हणजे तीर्थयात्रा होय. अशी यात्रा केली तर प्रभु-दर्शन होणार हे नक्कीच! अशा पध्दतीने केलेली यात्रा ही अधमाधम साधन न ठरता उलट उच्चतम साधनाने प्रत्यक्ष प्रभुशी गाठ घालून देणारी ठरेल, ठरते. प्रत्येकाने अनुभव घेऊन पहावा!

अशी काया-वाचा-मन:पूर्वक प्रभु-प्रेमी-दास-सेवक-भक्त बनून यात्रा भरताने केल्यामुळे 'रामदास रामाहुनि मोठे' या नुसार सारा निसर्ग त्यांच्यावर प्रेमाने कसा बरसला ते अतिशय लक्षणीय आहे.भरत अनवाणी चालत आहे हे

पाहून मही-पृथ्वी त्यांच्यासाठी अतिशय मृदु-मुलायम-कोमल बनली. तिने त्यांच्या मार्गावरील आपल्या सर्व कठोर अशा वस्तू आपल्या पोटात लपवून ठेवल्या.मग ते काटे, कुसळे, कंकर, खडे सर्व काही. वारा देखील त्यांना सुखानंद देणारा मंद-मधुर व शीतल असा वाहू लागला. देव स्वर्गातून पुष्पवृष्टी करीत, तर मेघ आपल्या सावलीचे सतत त्यांचेवर छत्र धरीत. फळे-फुले त्यांच्यासाठी अतिशय हळूवारपणे त्यांच्या पुढ्यात नेमकी त्यांच्या भुकेचे वेळी दुपारी पुढ्यात पडत असत. तर जिकडे पाहील तिकडे त्यांना नयन-रम्य वाटावे असा निसर्ग होताच, सुरेख हरणांसारखे प्राणी-मोर इ. त्यात भर घालीत होते. तर पोपट, कोकिळा, चातकांसारखे पक्षी त्यांना नादमधुरता देत होते. मन प्रेमाने भरलेले असले, प्रसन्नता, आनंद पूर्ण असले, समाधानी असले की त्याचे प्रतिबिंब निसर्गातही उमटते हेच यातून सिध्द होते. अशी उत्तम चित्रकूट यात्रा संपवून भरत रामाश्रामात परतले.

चित्रकूटचा तिसरा दरबार –

प्रात:काळी सर्वांची आन्हिके उरकताच पुन्हा सर्व सभा भरली. आजचा दिवस प्रयाणास शुभ आहे हे जाणून राम अतिशय संकोचाने भिडस्तपणे जमिनीकडे पाहू लागले. रामांचा हा संकोच ओळखून भरत उठून उभे राहिले. हात जोडून सर्वांना वंदन करुन सभेतच त्यांनी रामांना साष्टांग प्रणमन केले व म्हणाले, ''हे नाथ,आपण माझे सर्व लाड पुरवलेत. माझ्या या प्रेमहट्टामुळे आपणाला मात्र फार फार त्रास दिला मी. माझ्यामुळे आपण अतिशय दु:खी झालांत. आता आपणांस आणखी दु:खी करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. तेव्हा हे प्रभो, मला आता आज्ञा द्यावी. ज्या उपायाने, ज्या आपल्या उपदेशाच्या बळावर आपण परत येईतो चौदा वर्षांच्या अवधीत या अवधेचा-अयोध्येचा मी सांभाळ करायचा आहे तो कसा करावा हे कृपया आपण सविस्तर सांगा. कारण आपण प्रत्यक्ष उपस्थित नसता हा राज्य शकट, राज्यरथ हाकणे ही माझ्यासारख्या आर्ताला अत्यंत दुष्कर अशी गोष्ट आहे. पण आपली कृपा, आपली शिकवण मिळाली तर कार्य मी व्यवस्थित पार पाडेन.''

या भरताच्या अत्यंत शुध्द हेतूपूर्ण,कपटहीन, दीन प्रसंगोचित

विनंतीस मान देऊन श्रीरामप्रभू म्हणाले- "तुमच्यासह सर्व राज्य-परिवार इतकेच नव्हे तर वनातील माझ्यासह सर्वांच्या चिंता वाहण्यास आपले गुरु, हे मुनीजन व मिथिलेश जनक महाराज समर्थ आहेत. तुम्ही व मी आपण दोघेही पित्याच्या आज्ञेचे पालन करून आपला स्वधर्म, स्वार्थ व त्याव्दारे परमार्थ साधू. हे पितृ-आज्ञापालनच आपणास कीर्ती देणारे आहे. हे त्रिकालाबाधित सत्य होय. शिवाय जे गुरु-माता-पिता-स्वामी यांच्या उपदेशानुसार वागतात त्यांना दुर्गम मार्गावरुन जातानाही पाय घसरण्याची अजिबात भिती नसते. तेव्हा सारा विचार, चिंता, काळजी मनातून दूर करा आणि पित्राज्ञेनुसार अयोध्येत प्रजेचा सांभाळ करा. आपला सारा देश, राजकोष, परिवार, परिजन (दासदासी इ.) यांचा सर्वभार गुरुचरणांवर ठेवा. आणि तुम्ही गुरु वसिष्ठ, माता, सचिव सांगतील त्यानुसार आपली भूमी व प्रजा यांना सांभाळा, जपा. मुखात घातलेल्या प्रत्येक अन्नकणाचा पोषक रक्तरस बनून तो जसा सर्वांगाने देहाचे भरण-पोषण करतो त्या प्रमाणे विवेकाने वागणे ही तुमची मुख्य विश्वस्त म्हणून भूमिका असेल हे ध्यानी घ्या. अशा प्रकारे गूढ असलेला राजधर्मही संकेताने भरतांना कळला. परंतु भरतांच्या मनाची परिपूर्ण शांती त्यांनी मागे सांगितल्याप्रमाणे कांहीतरी अवलंबन मिळाल्याशिवाय होणार नाही हे जाणून सर्व सभेसमोर भरताच्या स्नेहाला सर्वाधिक मन:पूर्वक मानून अत्यंत लज्जायुक्त संकोचाने रामप्रभुंनी आपल्या पायीच्या खडावा भरताला दिल्या. हे सुंदर अवलंबन मिळताच भरताने तत्क्षणीं त्या पादुका आपल्या शिरावर धारण केल्या.

करुणानिधान श्रीरामांच्या स्पर्शाने पावन झालेल्या त्या पादुका किंवा खडावा म्हणजे जणूं भरतासह सर्व अयोध्यावासीयांच्या प्राणांचे धीट असे ते रक्षकच. कारण अशा काही अवलंबाशिवाय अतीव रामप्रेमी असल्यामुळे कोणीच १४ वर्षेपर्यंत जिवंत राहू शकले नसते. भरतांच्या दृष्टीने तर ते रामस्नेहरुपी अनमोल असे रत्न ठेवण्याची सुंदर पेटिकाच जणूं! दोन खडावा म्हणजे 'रा' आणि 'म' या दोन राम-महामंत्रांच्या अक्षराप्रमाणे जणूं भरताच्या जीवाचे जतन करणारे दोन राखणदार, रखवालदारच! रघुकुल रुपी कपाटाची (तिजोरीची) ही दोन दारेच होत. किंवा रामसेवेत,रामभक्तीत निमग्न राहणाऱ्या

भरतांचे हे दोन डोळेच जसे-पैकी एक ज्ञानाचा व दुसरा वैराग्य धर्माचा. कुशल कर्म करणारे हे दोन हात-ह्यामुळे राज्यकारभार करणे अति सुलभ होणार, या खडावांच्या रूपाने जसे काही प्रत्यक्ष राम-सीताच आपल्याजवळ सदैव राहणार असे भरताला अतीव,अपार,अकथनीय सुख झाले. मग त्यांनी त्या खडावा प्रथम आपल्या हृदयाशी धरल्या आणि नंतर त्या मस्तकावर धारण करून रामांची अनुज्ञा मागून त्यांचा निरोप घेतला.

पादुकांसह भरतांचे नगराकडे परतणे :

रामांनी भरताला आपल्या हृदयाशी घट्ट धरले.कारण या परस्पर भेटीचे दर्शनाचे सुख चौदा वर्षापर्यंत परस्परांना पुरवायचे होते. त्याचवेळी इंद्राने सर्व लोकांची व्दिधा मनःस्थिती केली-त्यांना एका क्षणी वाटे रामांसमवेत इथेच रहावे तर दुसऱ्या क्षणी आपल्या घरादाराची आठवण होऊन अयोध्येची ओढ वाटूं लागली. पण हे सारे प्रसंगानुरुप रामांच्या पथ्यावरच पडले. नाहीतर रामप्रेमात अडकलेले, गुंतलेले हे सारे जण तिथून कधी जाऊच शकले नसते. **वसिष्ठ-जनकांचे निर्लेप असणारे मन ही राम-भरत भेटीने गहिवरले.** जेथे ज्ञानी,विरागींची बुध्दि कुंठीत झाली तेथे इतरांची काय अवस्था झाली असेल नुसती कल्पनाच करावी. विश्वामित्र,वसिष्ठ,वामदेव, जाबाली जनक त्यांचे बरोबरचे अनेक ऋषी-मुनी विप्रगण यांना भरल्या अंतःकरणाने रामांनी निरोप दिला. सर्वांना वारंवार वंदन केले. मेणे सजवून तिन्ही मातांना त्यात बसवताना राम-सीता-लक्ष्मण कसे विह्वल झाले ते कोणता कवि,लेखक शब्दांत वर्णन करुं शकेल ?

रघुवंशाचा ध्वज,त्यामागे घोडदळ,गजदळ,गुरु-गुरुपत्नींसह माता व जनकादि सर्व महत्वाच्या मान्यवर व्यक्ती विप्रगणांसह व त्यामागे सैन्य अशा पध्दतीने अयोध्येकडे प्रयाण करण्यासाठी सज्ज झाले. राम-सीता-लक्ष्मणांनी दूरवर पर्यंत पायी जाऊन सर्वांना प्रेमळ निरोप दिला. प्रत्येकाने राम-सीता-लक्ष्मणाचे रुप आपल्या हृदय सिंहासनावर भरल्या डोळ्यांनी स्थिर केले. आणि नाईलाजास्तव मन रघुनंदनांजवळ ठेवून जणूं केवळ सर्वांची शरीरे त्यातील चैतन्य मागे ठेवून पुढे अयोध्येचे दिशेने निघाली.

रामही सीता लक्ष्मणांसह त्यांच्या विरह दु:खाने दु:खी झाले. पण वनवासी क्लेश-कष्टातून त्यांची सर्वांची सुटका होऊन ते पूर्वीप्रमाणे अयोध्येच्या राजयोगी जीवनात राहतील या आनंदाने- अशा दु:खानंदाच्या संमिश्र भावनांनी आपल्या पर्णकुटीत परतले.

श्रीराम-प्रभुंनी आपले देव-हित-कार्य ध्यानी घेऊन निषाद राजा गूह,कोळी,किरात भिल्ल अशा सर्वांची सन्मान पूर्वक पाठवणी केली. आणि सीता-लक्ष्मणासह त्या वटवृक्षाखालील वेदिकेवर बसून त्यांना राम भरताचा स्नेह,विनय व सर्वांचीच आठवण काढत त्यांच्या विरहाने व्याकुळ झाले. प्रभुची ती व्याकुळता पाहून रामाश्रमाजवळचे पशु-पक्षी देखील म्लान झाले. ज्ञानरुपी राम, भक्तीरुपी सीता आणि वैराग्यरुपी लक्ष्मण हे त्रिकूट चित्रकूटावरील त्या पर्णकुटीत पुन्हा शोभायमान झाले. म्हणजे जणूं ज्ञानाने –भक्तीने व वैराग्यानेच क्रमश: या तिघांची रुपे घेतली होती म्हणा नां! चार दिवसात सारी मंडळी अयोध्येस पोचली. **अयोध्येतील प्रत्येक जणाने राम दर्शन होईपर्यंत ब्रह्मचर्य व्रताचे पालन केले.** त्या शिवाय सर्वांनी सुखोपभोगांचा त्याग करुन केवळ जगण्यासाठी आवश्यक अशी राहणी स्वीकारली. भरताने शत्रुघ्नाकडे सचिव व उत्तम सेवकांचे मदतीने मातांची सेवा व राज्यभार सोपविला. आणि वसिष्ठांची अनुज्ञा घेण्यासाठी त्यांचेकडे जाऊन स्वत: मुनीव्रत धारण करण्यास परवानगी मागितली.

भरत राहणी –

उत्तम दिवस पाहून रामांच्या सुवर्ण पादुका सिंहासनावर स्थापित केल्या. स्वत: गुरु, माता (कौसल्या )यांच्या चरणी दंडवत करुन प्रभूंनी दिलेल्या पादुकाबरोबर घेऊन नंदिग्रामीं गेले.तेथे पर्ण-कुटी स्वत:साठी तयार केली. त्यामध्ये खास भूमी खणून कुशाच्या चटईवर बसणे झोपणेचे ठरवले. डोक्यावर जटा वळल्या.मुनी वस्त्रे म्हणजे वल्कले परिधान केली. फलाहारावर राहणेचे ठरविलेने फक्त पाणी पिण्यासाठी एक मातीचे वा लाकडी पात्र ठेवले. तेच फलाहारासाठीही वापरता यावे अशा हेतूने. अशा प्रकारे अत्यंत व्रतस्थ राहून फक्त रामानुसंधान हेच जीवन-ध्येय ठरविले. काया-वाचा-मनाने केवळ

– रामध्यासात रमूं लागलेले पाहून व्रतस्थ ऋषी-मुनींनाही त्यांच्या या एकाग्र, एकान्त राम ध्यास व्रताकडे पाहून स्वत:ची लाज वाटू लागली. ज्या अयोध्येतील वैभव पाहून प्रत्यक्ष कुबेरालाही लाज वाटावी, व सर्व सुख-विलास पाहून इंद्रानेही लालायित व्हावे असे सर्व सुखी जीवन भरतांनी अगदी सहज सोडले. त्याबद्दल क्षणभर वा कणभरही आसक्ती न ठेवता. सोन-चाफ्याच्या बागेत भुंगे जसे अलिप्त असावेत तसे अयोध्येत असूनही भरत अलिप्त जीवन जगू लागले. रामप्रेमापुढे भरतांना हे सारे लक्ष्मीचे विलास ओकारीसारखे त्याज्य वाटूं लागले.

**चातक जसा पर्जन्य-पात्र, हंस जसा नीरक्षीर विवेकातून फक्त दूध घेणारा तसे भरत केवळ राम प्रेम-पात्र बनले यात नवल तें काय?**

दिवसेंदिवस भरत अगदी कृश (सडपातळ) दिसूं लागले. परंतु मुखावर तपस्येचे तेज अधिकाधिक झळकूं लागले, बारीक झाले म्हणजे फक्त चरबी झडली परंतु अंगचे सारे बळ-शौर्य तसेच होते. उलट राम प्रेमाने रोज अधिकच पुष्ट, संपन्न होऊ लागल्याचे त्यांच्या प्रसन्नतेवरून दिसत होते. रामप्रेम रोज नव्याने वाढतच चालले, जसे शरद ऋतूत पाणी कमी झाले तरी कमळे जास्तच वाढतात व त्यांची शोभाही वाढते तसेच. वेत किंवा बांबूदेखील शरद ऋतूत वाढतात पण कमी होत जाणारे पाणी मलिन न होता स्वच्छच राहते, तसे भरतांचे मन अधिकाधिक निर्मल होत चालले. भरताच्या हृदयाकाशात राम सांगितलेल्या मुदतीत नक्की परत येतील हा विश्वासाचा अढळ ध्रुवतारा आहे. रामा (सूर्यवंशी) विना ही १४ वर्षे म्हणजे जणू विरह रूपी रात्र भरतांच्या आयुष्यात आहे. पण त्या रात्रीत रामचंद्राची स्मृतीरुपी नित्य वर्धमान आकाशगंगा झळकत आहे. रोहिणी-सीता,बंधु-लक्ष्मण यांसह धनुष्य-बाण-भाता यांनी सजलेले शारदीय पौर्णिमेचा सुंदर रामचंद्र, निर्दोष जसा रामप्रेमासह भरताच्या हृदयात सतत शीतल-आल्हादक-प्रसन्नपणे (भक्तीच्या प्रकाशाने) प्रकाशत आहे.

भरताचा भाव, त्याची भक्ती,वैराग्य,शुध्द शोभीवंत्र राहणी आणि कर्तृत्व वर्णनापलीकडचे आहे. भरत दररोज नित्य नियमाने प्रभुं खडावांची पूजा करतात. अयोध्येत जाऊन तेही दररोज महत्वाची कामे स्वत: करून रोजच्या

कामांचा आढावा घेऊन बाकी सर्व शत्रूघ्नावर सोपवून परत नंदिग्रामी जात असत. आपली जबाबदारी पूर्णत: कार्यरत राहून कौशल्याने पार पाडत पण सतत हृदयात सीता-रामांचे स्मरण व जीभेने अखंड नामजप व हे स्मरण व जप करताना राम प्रेमाने भरलेले हृदय अश्रूंवाटे डोळ्यांतून सांडत राही.

राम-लक्ष्मण-सीता वनात राहून तपस्वी जीवन जगत होतें. तर भरत अयोध्येत-(नंदिग्रामात)राहून तपश्चर्येने आपली काया कसाला लावीत होते. भरतांचे व्रतस्थ जीवन वा राहणी पाहून ऋषी-मुनीसारखे महाभागही मनोमन लज्जित होत असत. (इतके अखंड अनुसंधान भरताप्रमाणे स्वत:ला साधत नाही या भावनेने). म्हणून सर्वत्र दाही दिशा भरत सर्वांच्याच प्रशंसेचा विषय बनले. अगदी सामान्य गृहस्थाश्रमी साधकापासून ते संन्यासी,मुनीश्रेष्ठांपर्यंत!

असे परम पुनीत भरताचरणाचे स्मरण पापराशीरुपी हत्तींच्या कळपांना पळविणाऱ्या सिंहासारखे आहे. तर सर्व प्रकारच्या संतापांचे शमन करणारे यमराज साक्षात धर्म म्हणजे भरत होत. समस्त कलीचे पाप-दोष-क्लेश आणि महा मोहरूपी (अज्ञान) अंध:कार नाश करणारे सूर्य म्हणजे भरत आहेत. भवरोगनाशक आणि भक्तांचे रंजन करणारे, सुखविणारे स्नेहरूपी अमृताचे केवळ सार असे असणारे चंद्र आहेत.

अयोध्याकांडाची फलश्रुती –

श्री सीताराम प्रेमरूपी अमृतमय भरताचे,मुनीमनांस ही अगम अशी शम,दम,नियम युक्त व्रती अशा भरत चरित्राचे जे आदराने,नेमाने व प्रेमाने श्रवण-कथन-अनुमोदन करतील त्यांना सीतारामपदीं प्रेमभक्ती नक्की मिळेल यात संशयच नाही. शिवाय त्यांना सांसारिक विषय रसांविषयी वैराग्यही प्राप्त होईल.

श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ।

अयोध्याकाण्ड,व्दितीय सोपान समाप्त.

# अरण्यकांड (माया मोक्षपुरी)

मंगलाचरण –

वल्कल वस्त्र व जटामुकुटांनी सुशोभित, हाती धनुष्यबाण घेतलेले भक्तांचे अभयंकर असे श्रीराम त्यांचे मागून जाणारी सीता-लक्ष्मण आमचे रक्षण करोत.

जेथे उत्तम मोती (निर्माण होतात) आहेत. जेथे परम-हंस जातात, असे मानस-सरोवर रुपी सदगुरु माझ्या त्रिताप दावानलास व भवभयाग्नीस विझवून जन्म-मृत्युचे (कायमचे) निवारण करून मला आत्मसुखरुपी जलाने परिपूर्ण भरून माझे रक्षण करोत.

धर्मवृक्षाचे मूळ, विवेकरुपी सागराला भरती आणणारा (आनंददायक) पौर्णिमेचा चंद्र, वैराग्यरुपी कमलांना विकसित करणारा सूर्य, तसेच पापरुपी घनदाट अंध:कार दूर करणारा असा सूर्य, त्रयताप दूर करणारा मोहाच्या मेघसमूहाला दूर पळविणारा वायु, तसेच स्वयंभू, ब्रह्मकुलोत्पन्न अशा शंकरांना मी वन्दन करतो की जे (सर्व प्रकारचे दोष) कलंकाचे शमन करणारे असून श्रीराम भूपतींना प्रिय आहेत.

पाण्याने भरलेल्या मेघाच्या कांतीप्रमाणे श्यामल असे, (वल्कलांचा) सुंदर पीतांबर धारण केलेले, हातात धनुष्य-बाण घेतलेले, पाठीवर भात्यात बाणांचा भाता शोभत आहे, मस्तकावरील जटा मंडलाने अधिक सुरेख दिसत आहेत, सुंदर अशा (राजीव) कमळाप्रमाणे विशाल-पाणीदार तेजस्वी डोळ्यांचे वनमार्गावरुन सीता-लक्ष्मणांसह जाणारे राम त्यांना मी प्रणमन करतो.

ज्ञानी-मुनी असे भक्तजन (रामांचे गूढ गुण जाणून विरागी बनतात. तर जे हरिविन्मुख व धर्माविषयी प्रेम-आस्था श्रध्दा नसणारे (विषयात रत झाल्यामुळे) लौकिक दृष्ट्या ज्ञानी पण पारलौकिक दृष्ट्या अज्ञानी असे पढत मूर्ख ) विशेष मूर्खजन मोहित होतात. (म्हणजे राम हे परब्रह्म आहेत हे न जाणून ते सामान्य मनुष्य आहेत असे समजतात.)

नुकत्याच भेटून गेलेल्या भरत व सर्व अयोध्या पुरजनांची दिव्य प्रीती आणि त्यांची अनुपम बुध्दी व त्याने सुशोभित झालेली भक्ती यांचे रसभरीत

वर्णन मी ऐकले. आता अत्यंत पावन मुनी व सुरवर यांना प्रिय वाटणारे चरित्र वनात जे प्रभूनी केले ते ऐका असे गोस्वामी म्हणतात.

जयंत प्रसंग –

या चित्रकूटा वरील सर्वच प्रभूलीला देव मानव व मुनी यांना भावणाऱ्या अशा आहेत. एकदा लक्ष्मण वनात फळे फुले आणण्यासाठी गेले असता. श्रीरामांनी सीतेला आपल्या समोर एका सुंदर स्फटिक शीळेवर बसविले. अन् स्वत; सुगंधी सुंदर विविध फुलांचे हार तिच्या गळयात, हातात, दंडात, कमरेत, वेणीत असे नाना प्रकारांनी गुंफून तिचा सुंदर पुष्पशृंगार केला, सहवनगमनाचा तो तिचा सत्कार व गौरवच होता जणू ! केवळ याच प्रसंगी प्रभूनी आपले धनुष्य बाणही थोडेसे दूर ठेवले होते.

हा या पती- पत्नींचा सात्विक शृंगार पाहून इंद्र – पुत्र जयंतास वाटले हे कसले परब्रह्म – हा तर सामान्य विषयी – विकारी मानवाप्रमाणे सारे काही करीत आहे. तेव्हा हा खराच परब्रह्म आहे का सामान्य मानव , पाहू तरी त्यांच्या सामर्थ्याची परीक्षा घेवून ! असे म्हणून कुटिल विचारांना शोभेसे कावळ्याचे रुप त्याने धारण केले व सीतेच्या पायाला चोच मारली. सीतेच्या कोमल पायातून निघणारी ती रक्ताची धार पाहून जवळच असलेल्या एका गवताच्या पात्यावर रामांनी ब्रह्मास्त्र अभिमंत्रीत केले व त्या कावळ्याच्या मागे दिले पाठवून।

तो ब्रह्मबाण आहे हे ओळखताच , त्याची भीतीने बोबडी वळली अन् मग मात्र त्याने कावळ्याचे रुप टाकून आपले मूळ रुप धारण केले आणि सगळीकडे पळत सुटला. तो बाण त्याला मारत नव्हता पण पाठलाग ही सोडत नव्हता. त्यामुळे तो जेथे जेथे गेला तेथे प्रत्येक ठिकाणी त्याच्या मागे हा ब्रह्मबाण होताच. प्रथम पिता रक्षण करेल असे तो देवांचाही देव असल्याने वाटले, त्याने नकार देताच तो ब्रह्मदेवांकडे , शंकराकडे , कैलासावर गेला, असा अनेक ब्रह्मांडे फिरुन फिरुन थकला. त्याची ती भय- शोक विह्लता पाहून कोमल –संत – ह्रदयी नारदांना त्याची दया आली व त्यानी जयंतास सांगितले. 'ज्याचा तू अपराध केला आहेस त्यांची क्षमा मागून त्या रामांना शरण जा '. तत्क्षणी तो भयभीत होऊनच रामांकडे परत गेला "हे प्रभो, दीनवत्सला , मी

चुकलो, मला क्षमा करा. मजवर दया करा. अल्पज्ञ असा मी मूर्खपणे सर्व समर्थ अशा भगवंतांच्या बळाची परिक्षा घ्यायला निघालो. मुंगीने सागराचा ठाव घेण्यासारखा महामूर्खपणा केला आणि या कृतीचा परिणामही भोगला. अगदी माता-पित्यांपासून शिवांपर्यंत आपला अपराध केल्याने कोणीही मला थारा दिला नाही की माझे रक्षण केले नाही. तेव्हा या माझ्या कर्माचा आता मला पश्चाताप होत आहे.'' त्याचे हे दीनवाणे पश्चातापदग्ध बोल ऐकून अत्यंत कृपाळू असलेले भगवान राम त्यांनी त्याला ज्या रुपाने त्याने हा अपराध केला होता त्या कावळ्यास 'एकाक्ष' करुन त्याचे प्राण-रक्षणही केले अन् त्याचा एक डोळा घालवून त्याच्या अपराधास शासनही केले. खरे तर त्याचा हा अपराध वध करण्याच्या लायकीचा होता, पण भगवंतांकडे आर्त होऊन शरण गेल्यामुळे भगवंतांच्या करुणेने त्याला वाचविले.

अयोध्येपासून चित्रकूट चार-पाच दिवसांच्या प्रवासी अंतरावर असलेने भरत व पुरजन वारंवार येऊन भेटतील व त्यांना रामांचे परब्रह्मत्वाचे मर्म कळल्यामुळे त्यांची उपाधी टाळण्यासाठी रामांनी आपली पर्णकुटी (रामाश्रम) सोडून ते पुढे निघाले. चित्रकूटावर उत्तर दिशेकडून दक्षिणेकडे त्यांनी प्रयाण केले. सर्व ऋषी-मुनींचा निरोप घेतला.

श्रीराम-अत्रि भेट --

चित्रकूटाजवळच असलेल्या अत्रीच्या आश्रमात प्रभु गेले. श्रीराम प्रभु आल्याचे कळताच हे वयो-तपो-ज्ञानवृध्द मुनी अत्यंत प्रेमभराने धावतच येवून रामांना भेटले. रामांनी त्यांना प्रणाम करताच ऋषींनी त्यांना हृदयाशी धरले व उभय बंधूंना प्रेमाश्रूंचे अभ्यंगस्नान घातले. रामांचे दर्शन होताच अत्रीचे नेत्र निवले. भानावर येत त्यांनी मोठ्या आदराने रामांना आपल्या आश्रमात आणले. त्यांचे पूजन करून त्यांना फळे-कंदमूळे दिली. अत्रीनी दिलेल्या आसनावर फलाहार करतानाचे प्रभूंचे दर्शन अत्रिमुनी सूक्ष्मपणे न्याहाळू लागले. अन् प्रेमभराने त्यांच्या मुखातून ही प्रभूंची स्तुती गायला त्यांनी सुरुवात केली. ''हे भक्त वत्सल, कृपालु व कोमल स्वभावाच्या प्रभो रामा, मी आपणास नमन करतो. निष्काम भक्तास आपले धाम देणाऱ्या या आपल्या चरण कमलांचा मी

आश्रय करतो. प्रफुल्लित कमलाप्रमाणे नेत्र असणारे,श्याम-सुंदर असे मंदर पर्वताप्रमाणे मंथन करून आमचे मद-मत्सरादि दोष नष्ट करणारे असे तुम्ही आहांत. हे प्रभो, आपल्या या आजानुबाहूंचा पराक्रम अप्रमेय आहे. सूर्यवंशाचे मंडन,महेशांचे धनुष्यभंग करणारे, संत मुनींना आनंद देणारे व राक्षसांचा नि:पात करण्यासाठी धनुष्य-बाण-भाता घेतलेले आपले रूप विलोभनीय आहे. आपण त्रैलोक्य नायक आहात-कारण शंकर-ब्रह्मदेवादि सुध्दा आपणास वंदन करतात.असे विशुध्द ज्ञान स्वरूप असल्याने सर्व दूषणे (भक्तांची) हरण करणारे असे लक्ष्मीपती विष्णू असे या सीता-लक्ष्मणांसह सुखसागर आणि संतांची एकमात्र गती शोभून दिसतां. आपणच इंद्राचे अनुज म्हणजे वामन झाला होता. तेव्हा हे प्रभो, विकाररहित होऊन जो तुम्हांला शरण येईल तो या भवसागरात, शंका-तर्करूपी लाटांत गटांगळ्या खाणार नाही. आणि जे एकांत प्रिय असून मुक्तीसाठी तुम्हांला शम-दमपूर्वक भजतात, ते तुमचा आश्रय करताच आत्मसुख मिळवून उत्तम (कैवल्य) गती (मोक्ष) प्राप्त करतात. असे तुम्ही एकमेवाव्दितीय, निरीह, ईश्वर, विभु, जगदीश, रूपाने शाश्वत तुरीय असे (निर्गुण-निराकार) तुम्हाला मी भजतो. असे निर्गुण असूनही तुम्ही भक्तांच्या सेवेने संतुष्ट होऊन त्यांचेसाठी कल्पवृक्ष बनून त्यांना हवीं तीं फळे प्रदान करणारे असे मजसमोर सगुण साकार बनून आला आहांत तेव्हा अनुपमेय अशा सौंदर्याने विनटलेल्या पृथ्वीपते मजवर प्रसन्न व्हा आणि तुमच्या चरण कमलांच्या भक्तीचा कृपा प्रसाद मला प्रदान करा. ही स्तुती भक्तीयुक्त अंत:करणाने जे म्हणतील त्यांना उत्तम भक्ती व तुमची प्राप्ती होईल यात संशय नाही.''

शेवटी मस्तक नमवून, हात जोडून पुन्हा अत्रि-मुनी रामांना म्हणतात- माझी बुध्दी आपले चरण कमल सोडून कधीही जाऊ नये.

अनसूया-सीता संवाद –

अत्रि मुनींची पत्नी अनसूया, तिच्या जवळ सीता बसली होती. तत्पूर्वी तिने अनसूयेस नमस्कार करताच ऋषीपत्नीने तिला तिचा विनय-सुशीलता पाहून गहिवरून मिठी मारली. त्या (स्पर्श) सुखाने संतुष्ट होताच सीतेला मोठ्या प्रेमाने तिने आपल्या जवळ बसवून घेतले आणि तिला दिव्य-सुंदर-निर्मल

अशी वल्कल वस्त्रे व आभूषणे दिली व सीतेस ती म्हणते- तुझ्या निमित्ताने मी अल्पसा स्त्री धर्माचा उपदेश करते. अर्थात तू अत्यंत पावन, परम पवित्र आहेसच. राम तुला प्राणाहूनही प्रिय असल्याने तू सर्व स्त्रियांना आदर्श-पतिव्रता आहेस. तू रामवल्लभा आहेसच पण जगतातील समस्त स्त्रियांच्या कल्याणार्थ हे मी तुला सांगते.

पतिव्रता-गीता –

पतिव्रतांचे चार प्रकार असतात. उत्तम श्रेणीची जी असते ती आपल्या पती खेरीज (स्वप्नातही) अन्य पुरुषच नाही असे मानते. तर मध्यम पतिव्रता आपल्या पतीपेक्षा वडिलधाऱ्या पुरुषांना पिता, त्यांच्या वयाच्या पुरुषांना भाऊ व लहानांना पुत्रवत् मानते. तर निकृष्ट प्रतीची स्त्री धर्माचा विचार करून दोन्ही कुलांच्या रक्षणार्थ नाईलाजाने पतीबरोबर संसार करते. तर याहून हलक्या प्रतीची स्त्री पती भयाने संधी मिळत नाही म्हणून त्याच्या बरोबर राहते व योग्य संधी मिळताच पर-पुरुषाबरोबर जाऊन पतीची वंचना करते, अशी अधमाधम स्त्री रौरव नावाच्या नरकात कोट्यवधी वर्षे खितपत पडते. अज्ञानामुळे क्षणिक सुखाला बळी पडून ती आत्मवंचनाच करते. अशी पती-विरोधी स्त्री ऐन तारुण्यात विधवा बनते.

हे वैदेही, पती समान नांव-कुल-लौकिक-धन-धाम-पुण्य असे अपरिमित देणारे दुसरे कोणीही नसते. म्हणून पतिला अगदी माता-पिता-गुरु-ईश्वर मानणे श्रेयस्कर आहे. त्याची सेवा करून, त्याचे सह प्रेम-विश्वास-श्रध्दापूर्वक आनंदाने राहणे हाच तिचा धर्म आहे. एक पतीसेवा पतिव्रता-धर्म तिने यथाशास्त्र पाळला तर सहजगत्या ती 'कैवल्य' पदासारखी उत्तम गतीही मिळवू शकते. म्हणून ती सहधर्मचारिणी असते. संकटकाळी धैर्य,धर्म,उत्तम मित्र व स्त्री यांची खरी परीक्षा होते. (तू धैर्याने या वनवासात रामांची सहधर्मचारिणी बनून त्यांची सन्मित्रा,सुहृदा बनून त्यांची सेवा करतेस त्या अर्थी तू सर्वोत्तम पतिव्रता आहेस असा जणू अप्रत्यक्षपणे अनसूयेने सीतेचा सत्कारच केला आहे. त्यासाठीच सन्मान चिन्हे अशा सुंदर भेट वस्तू तिला प्रथमतःच बहाल केल्या.) एका निर्मत्सरी पतिव्रतेने दुसऱ्या रूप-गुणशील-सुंदरी पतिव्रतेचा केलेला हा सुरेख गौरव होय.

अत्रि-राम संवाद –

करुणानिधान राम अत्रिमुनींना म्हणाले, 'मजवर आपली सतत कृपा असावी. आता मला इथून दुसऱ्या वनात जाण्याची अनुज्ञा द्यावी. मला आपला दास समजून आपले प्रेम मजवर रहावे.' असे धर्ममर्यादापुरुषोत्तम राम प्रभूंचे बोलणे ऐकून अत्रि त्यांना म्हणतात- ''हे रामा. ज्याची कृपा शिव-ब्रह्मा, सनकादिकांसारखे परमार्थी सदैव इच्छितात, ते आपण दीनबंधो, निष्काम असणारे हे असे मला लाजविणारे मृदु-वचन कां बरे बोलत आहांत? (ह्या तुमच्या सर्वगुणसंपन्न व समर्थ असूनही विनयी अशा स्वभावाला भाळूनच) लक्ष्मीने इतर सर्व देवांना सोडून तुमच्याच गळ्यात जयमाला का घातली ते मला आज कळले बरं! तुमच्या सारख्या भगवंताला 'इथून जा' असे मी कसे बरं सांगू? तुम्ही अंतर्यामी असल्याने माझा भाव जाणतांच. परंतु प्रभुंच्या इच्छेविरुध्द मुनी त्यांना थांबवूही शकेनात. अशी त्यांची विचित्र कोंडी झाली. शेवटी मुनींनी अष्टसात्विकभावयुक्त होऊन श्रीरामांची भक्ती मागून त्यांना भक्ताच्या चतुरपणाने निरोप दिला.

विराध वध व उध्दार-

राम अत्रिमुनींना वंदन करून तिथून दंडकारण्याच्या दिशेने जाऊं लागले. वल्कल वेषधारी राम पुढे , मध्ये सीता व त्यामागे लक्ष्मण म्हणजे जणूं ब्रह्म, माया व त्यापाठीमागून जाणारा जीव असे ते दृश्य दिसत होते. पृथ्वीपती आज आपल्याल स्पर्शुन जात आहेत या भावनेने निसर्गही त्यांना अनुकूल होत होता. दुर्गम वन सुगम, अवघड डोंगर-घाट-दऱ्या-नद्या सहज उल्लंघनीय अशा होत होत्या. तर ज्या ज्या आकाशाखालून (भूप्रदेशावरून) जातील तेथे ढग त्यांचेवर सावली धरीत होते. भरताचेवेळी हा निसर्ग प्रेमामुळे अनुकूल बनला होता, तर या त्रयींसाठी आदराने!

त्या मार्गात विराध नावाचा राक्षस सामोरा येताच रामांनी तत्काळ त्याला संपवला. परंतु प्रत्यक्ष परब्रह्माच्या हातून मेल्यामुळे त्याला आपले मूळ गंधर्वाचे रूप प्राप्त झाले. पश्चातापाने दीन बनून जेव्हा त्याने रामांची क्षमा मागितली तेव्हा त्यावर रामांनी अपार कृपा करून त्यास निजधामी पाठवले.

शरभंग भेट–

राम-लक्ष्मण-सीता यांना अगदी निकट आलेले पाहून शरभंग मुनी या त्रयींकडे भान हरपून पहातच राहीले. भ्रमर जसा कमळातील मधुपान करण्यात अगदी गुंग होतो, तसे मुनी आपल्या डोळ्यांनी यांचे रूप जणू पीतच राहीले. त्यामुळे यांना आसन-अर्घ्य-पूजन इ. करणेचे भानच राहीले नाही. त्यांनी एकदम स्तुतीच करायला सुरुवात केली. ''हे रघुवीरा, कृपाळा, शंकरांच्या मनरूपी मानस-सरोवरातील राजहंसा, मी खरे म्हणजे ब्रह्मदेवांकडे– ब्रह्मलोकांत निघालो होतो. परंतु राम लवकरच या वनांत येतील अशी वार्ता कानावर आलेमुळे थांबलो. आणि रात्रंदिवस तुमचीच प्रतीक्षा करत होतो. आज आपल्या दर्शनाने माझे अंत:करण शांत झाले, निवले. हे नाथ ! खरा तर मी साधन-हीन, दीन असूनही मजवर कृपा केलीत हीच आपली उदारता होय. पण देवा ! हा काही आपण मजवर उपकार नाही केलात, तर आपण आपला 'दीनवत्सल' हा पणच खरा केला आहांत. तेव्हा या दीनावर खऱ्या अर्थाने दया करणे म्हणजे हे शरीर त्यागून (त्यातील चैतन्य) तुमच्यात मिळून, विरून विलीन व्हावे- हे सारे होईपर्यंत तुम्ही इथेच थांबवे. त्या प्रीत्यर्थ मी तुम्हाला माझे आजवर केलेले सारे योग, यज्ञ, जप, तप सर्व समर्पण करीत आहे. असे म्हणत शरभंग मुनींनी बाणांची शय्या तयार केली आणि पूर्ण नि:संग होऊन त्यावर बसले व हात जोडून रामांना विनवितात, ''हे प्रभो, घननीळ अशा वर्षाव करणाऱ्या मेघांप्रमाणे सगुण-साकार रूपे सीता व अनुज लक्ष्मण यांच्यासह तुम्ही सतत माझ्या हृदयात निवास करा.'' असे म्हणून त्यांनी योगाग्नीत आपला देह जाळून टाकला. भक्तीचा वर मागितल्यामुळे हरिलीन न होता शरभंगांना नित्य वैकुंठ-समीपता ही मुक्ती मिळाली. आसपासच्या अनेक ऋषी-मुनींनी ही घटना घडताना साक्षात् पाहिल्याने त्या वनातल्या सर्व मुनीवृंदांची हृदये रामभक्तीने परिपूर्ण भरून गेली व सर्वांच्या तोंडून एकाच वेळी जणूं एकमुखाने प्रभुंचा जयजयकार बाहेर पडला. **'सियावर रामचंद्रकी जय'**! ही स्तुती जणूं साऱ्या वनात घुमली. हे शरणागतवत्सला, करुणानिधे तुमचा विजय असो अशा अनेकविध घोषणा अरण्यात बराच वेळ घुमत राहील्या.

त्या मुनीवृंदासह राम पुढे निघाले. थोडे पुढे जातात तों भला मोठा

प्रचंड असा हाडांचा ढीगच्या ढीग दिसला. त्याबरोबर मुनींना रामांनी प्रश्नार्थक नजरेने विचारताच सर्वांच्या मनातले प्रातिनिधिक रूपाने एका मुनींनी म्हणणे मांडले. ते म्हणाले, ''हे स्वामी, तुम्ही सर्वदर्शी व सर्वांतर्यामीही आहात. तेव्हा स्वत: सगळे जाणत असूनही हे कां बरे विचारतां ? अहो हे राक्षसांनी ऋषी-मुनींना भक्षण करून उरलेल्या त्यांच्या हाडांचा हा ढीग साचला आहे.'' हे ऐकतांच संत कळवळा प्रभुमनीं दाटून आल्याने त्यांच्या डोळ्यात पाणी तरळले. आणि त्याचवेळी आंतरिक वीररसही उफाळून आल्याने रामांनी आपले दोन्ही बाहू वर उचलून प्रतिज्ञा केली की ही पृथ्वी राक्षसहीन करून तिचे थोरपण तिला परत करीन.

त्यानंतर रामांनी अनेक ऋषी-मुनींच्या आश्रमात जाऊन त्यांना सुख प्रदान केले. (खरे तर याचा प्रारंभ अत्रिंपासून सुरुही झाला होता तो तसाच पुढे चालू राहिला.)

<u>सुतीक्ष्ण-रामभेट -</u>

काया-वाचा-मन:पूर्वक भगवंताचा सेवक असलेला,स्वप्नातही अन्य कोणत्याही देवावर रामाखेरीज भरोसा न ठेवणारा असा आपल्या नामाप्रमाणे अनन्य गतिक राम-प्रेमी रामभक्त सुतीक्ष्ण, हा अगस्ती किंवा कुंभज ऋषींचा शिष्य होय. त्याला राम येत असल्याची बातमी मिळताच तो अत्यंत आतुर होऊन रामभेटीची प्रतीक्षा करु लागला. राम-दर्शन-भेटीचे अनेक मनोरथ रचूं लागला. ते असे- हे विधात्या रघुराया दीनबंधू आहेत खरे पण माझ्यासारख्या शठ-लबाड (दोषी-पापी-दंभी) अशावर ते दया करतील कां? आपला सेवक समजून माझे हृदयाधिपती राम लक्ष्मणासह मला भेटतील,हृदयाशी धरतील? कारण ना मी ज्ञानी, ना वैराग्य-संपन्न, ना माझ्यात भक्तीचा लवलेश, अशा माझ्या कोणत्या गुणाने प्रभुंनी मजकडे आकृष्ट व्हावे? म्हणजे मला ते इथवर आले तरी भेटतील हा भरोसा वाटत नाही. माझ्यातील अवगुण, कमीपणामुळे माझ्याच्याने ना जप होतो, ना मी यज्ञ करतो, की योगमार्गाने प्रभु अनुगमन करतो, प्रभु चरण-कमलाविषयी तर धड मला प्रेमही नाही अन् सर्वात महत्वाचे म्हणजे मी सत्संगापासून कित्येक वर्षे दूरच आहे. मग अशा परिस्थितीत प्रभूंनी

मला भेटावे हे कसे बरे शक्य आहे ? परंतु हे प्रभो, तुमच्या खेरीज दुसरी गतीच मला नसल्याने तुमच्या ब्रीदानुसार,बाण्याप्रमाणे मी तुम्हांला प्रिय वाटत असल्याने तुम्ही मला दर्शन देणार ! भेटणार! आणि तुमचे मुख-कमल बघून माझे डोळेच काय माझे सारे जीवन सुफल होणार, होणारच होणार ! अन् त्याच्यामुळे मी या भवसागरातून तरेन (माझे जन्म-मृत्यु संपतील).अशा प्रकारे सुतीक्ष्ण प्रेमपुरात वाहू लागले. मी कोण, कुठे जात आहे, ह्या संबंधीचे त्यांचे सारे भान हरपले. जिथे स्वत:चेच भान नाही तिथे दिशा, उपदिशा-मार्ग यांचे काय ? प्रभु इकडून येतील, तिकडून येतील असे म्हणत एकदा इकडे, एकदा तिकडे असे भान विसरून ते पळत सुटले. कधी पुढे जावे, कधी मागे जावे तर कधी प्रभुचे अनंत प्रकारचे गुण आठवून, लीला-कथा इ. आठवून नाचायला लागावे. असे भक्ती प्रेमात पूर्णपणे समरस होऊन बुडून गेलेल्या आपल्या या लडिवाळ भक्ताच्या लीला प्रभु एका मोठ्या वृक्षामागे लपून पाहू लागले. अगदी आपण रांगत्या बाळाच्या लीला त्याला चोरून पाहतो ना अगदी तस्सेच ! असा हा त्याचा प्रेम-भक्तीचा सुरेख लपंडाव पाहता पाहता प्रभुही मग्न झाले आणि त्याच्या हृदयात झाले की हो प्रगट ! वाहवा ! आता तर हा अगदी आनंदाने डुलत तिथल्या तिथेच रानात वाटेतच सुतीक्ष्ण बसला पद्मासन घालून ! हृदयातील ती ध्यानमूर्ती पाहता पाहता त्याच्या साऱ्या शरीरावरचे रोम अन् रोम फणसासारखे ताठ उभे राहिले. अन् त्या सगुणरुपाच्या भाव समाधीत आणखी आणखी खोल खोल बुडत निस्तब्ध अगदी पाषाणमूर्ती किंवा पुतळ्यासारखे शांत बसले. ते पाहून प्रभु हळूहळू चालत मुनीच्या अगदी जवळ येऊन उभे राहिले तरी हा पठ्ठ्या भानावर यायचे लक्षणच नाही. इतके मुनी आत्मारामात एकरुप, तल्लीन झालेले ! मग प्रभूंनी त्यांच्या हृदयातले आपले (त्याचे आवडते) रूप बदलले अन् तेथे चतुर्भुज विष्णु वा नारायणाचे रूप प्रकट केले. ही प्रभूंची मात्रा नेमकी, पक्की लागू पडली. कारण त्या आपल्या नेहमीच्या ध्यान रूपात असा एकाएकी बदल कसा झाला म्हणून घाबरून तळमळत ते उठले, अगदी मासा पाण्याबाहेर काढावा तसे. समोर पाहतात तो हृदयस्थ रूप साक्षात् समोर उभे ठाकलेले सीता-अनुजांसह ! ते सावळे सुखरूप पाहताच मुनी उभी असलेली छडी आडवी व्हावी तसे प्रभुंच्या चरणांवर पडले. प्रभुंनी

आपल्या प्रदीर्घ बाहूंनी त्याला उचलून अत्यंत प्रेमाने हृदयाशी धरून ठेवले. **ही भक्त भगवंतांची प्रगाढप्रीतीभेट म्हणजे सुवर्णवृक्ष व तमालवृक्ष यांचीच भेट होती जणूं !** त्यानंतर मुनी राम-मुखाकडे कितीतरी वेळ, एकटक पहात राहिले. जणूं ते म्हणजे एखादे सुरेख मनोरम चित्रच. नेत्रसुखाच्या समाधीतून भानावर येत मग पुन:पुन्हा मुनींनी रामांचे पाय धरले- जणूं बराच वेळ त्यांना असे तिष्ठत ठेवल्याबद्दल ही क्षमा याचनाच होती. मग तिघांना आश्रमात आणले. यथासांग षोडशोपचारे पूजा केली व त्यानंतर सुतीक्ष्ण रामांना म्हणतात, "सर्व समर्थ सूर्याप्रमाणे अशी तुझी, मी अल्पमती काजव्याप्रमाणे कोणत्या शब्दांत स्तुती करुं ? पण स्तुती केल्याशिवाय मला राहवत ही नाही."

सुतीक्ष्ण कृत श्रीरामस्तुती -

नीलकमलाच्या हाराप्रमाणे कांतीमान काया, डोक्यावर जटांचा मुकुट, अंगावर मुनींची वस्त्रे (वल्कले), हाती धनुष्य-बाण व पाठीला भाता अशा रघुवीरांना मी निरंतर वंदन करतो. मोहाच्या अरण्याला खाक जाळून टाकणारे हे अग्नि आहेत. संतवनातील सरोवरातील कमळांना प्रफुल्लित करणारे हे सूर्य होत. तर राक्षसरूपी हत्तींच्या कळपासाठी हे आहेत मृगराज-सिंह. प्रापंचिक संशयादि पक्ष्यांची शिकार करणारे हे बाज म्हणजे बहिरी ससाणा होत. असे हे रघुवीर सदैव माझे रक्षण करोत. कमलाप्रमाणे आरक्त डोळ्यांचे, सुंदर वेषधारी, सीतेच्या नयन-चकोरांचे रजनीनाथ (चंद्र), तर शिवांच्या मानस-सरोवरातले हे राजहंस, विशाल बाहू व अंत:करणाचे हे राम त्यांना मी नमस्कार करतो. संशय सर्पांना खाणारे हे गरूड, अत्यंत कर्कश तर्कापासून होणारे दु:ख शमन करणारे, भवाचे भंजन करून देवसमूहाचे रंजक, असे हे कृपेचा समूह असणारे आमचे रक्षण करोत. कधी निर्गुण तर कधी सगुण रुप, कधी विषम तर कधी समरूप, ज्ञान-वाणी व इंद्रिये यांच्या पलिकडचे असून अनुपमेय असे, निर्मल, पूर्ण, निर्दोष अनंत-अपार असे भूमीचा भार हरण करणारे हे राम, त्यांना मी प्रणमन करतो. भक्तांना कल्पतरुप्रमाणे आरामदायी, बगीचा असणारे, भक्ताचे काम-मद-क्रोध लोभादिंचे तर्जन करणारे, अत्यंत सुसंस्कृत वा चतुर असे या भवसागराचे सेतू आणि सूर्यवंशाची कीर्तीध्वजा फडकविणारे राम माझे सदैव

रक्षण करोत. यांचे हे दोन बाहू सामर्थ्याचे धाम असून अतुलनीय प्रतापी आहेत. तर त्यांचे नाम कलिचे अनेक दोष भंजन करणारे आहे. तर यांचे गुण-समूह धर्माचे कवच असून, आनंद सुख देणारे आहेत. असे हे राम सर्वदा माझ्या कल्याणाचा विस्तार करोत. निर्मल, व्यापक व अविनाशी असे हे सर्वांच्या हृदयाचे अंतर्यामी आहेत. तेव्हा खरासारख्या राक्षसालाही मोहित करणारे वनात विहरणारे राम-सीता-लक्ष्मणांसह माझ्या हृदयात राहोत. हे स्वामी, तुम्हांला ज्यांना जसे जाणायचे आहे तसे ते जाणोत, मग कोणी निर्गुण रूपे तर कोणी सगुण रुपे ! परंतु हे रामा, तुम्ही मात्र माझ्या हृदयात राजीवनयन-कोसलपती राम म्हणूनच निवास करा हं ! रघुपती माझे स्वामी व मी त्यांचा सेवक हा माझा अभिमान, ही माझी बुध्दी कधीही न सोडो. हे मुनींचे शब्द रामांना फार आवडले, भावले. म्हणून रामांनी त्यांना पुन्हा अत्यानंदाने हृदयाशी धरले. आणि राम म्हणाले, 'मी तुझ्यावर परम प्रसन्न आहे तेव्हा हे मुने, तुला हवा तो वर तूं मागून घे', त्यावर सुतीक्ष्ण म्हणातात – आजवर कधी कोणाकडे काही मागितलेच नाही. खरे काय, खोटे काय हे ही मला कळत नाही. तेव्हा मी आपला दास आहे हे जाणून मला योग्य, मला सुखकारक असे तुम्हीच द्या. त्यावर राम म्हणाले. 'अविरल (सतत टिकणारी) भक्ती, वैराग्य, विज्ञान व सर्व सद्‌गुणसंपन्न व ज्ञानाचा आगर असा होशील.' त्यावर सु-(अती)तीक्ष्ण म्हणतात- 'हे प्रभु आपण जो वर दिलात तो तर मी स्वीकारलाच. पण आता मला जो भावणारा वर आहे तो द्या. तो कोणता? तर-माझ्या हृदयाकाशात धनुष्य-बाणधारी रामचंद्राप्रमाणे जानकी (रोहिणी) व लक्ष्मण (बुध)सह माझ्या इच्छेप्रमाणे सतत निवास करा.' त्यावर राम 'तथास्तु' असे लगेच म्हणतात आणि आनंदाने अगस्तींच्या आश्रमाकडे जायला निघतात.

प्रभु अगस्ति सत्संग –

सुतीक्ष्ण रामांना म्हणाले, "किती दिवस झाले मी या आश्रमात रहायला लागल्यापासून गुरुंचे दर्शनच घेतले नाही. तुमच्याबरोबर येऊन मला त्यांचे दर्शन घडेल. आपण सर्वज्ञ सर्वदर्शी आहांत तेव्हा मी मार्ग दाखवायला येतो असे तरी कसे म्हणूं ? पण हे रामाई मला तुझ्याबरोबर यायचेच आहे."

अशा बालहट्टापुढे रामाई हरली व त्यांना बरोबर घेऊन सारे वाटचाल करूं लागले. कृपानिधी रामांनी ही मुनींची सु-तीक्ष्णता चतुराईत बदललेली जाणली व घेतले बरोबर. या चतुराईचे लाभ पहा – प्रभूंचा प्रत्यक्ष सहवास सत्संग लाभले, मार्गात जाताना त्यांची चरण चिन्हे निरखून पाहता आली, आणि प्रभु दर्शनासमवेत त्यांची अमृतवाणी संतत कानावर पडली. त्याव्दारे ज्ञान-भक्तीची अनेक रहस्येदेखील उलगडली असतील ! शिवाय गुरुंना प्रभुच्या पुढे (आधी) जाऊन सूचना देऊन प्रभु-स्वागतात गुरुंना मदत करता येईल व गुरुदक्षिणाही देणे होईल. असे परम-लाभ करून घेणारे म्हणून हे सुतीक्ष्ण चतुरभक्त ! त्यानुसार सुतीक्ष्णांनी सर्व केलेच. या शिष्याचेच ते गुरु-त्यांनाही समाधीतून हलवून जागे करावे लागले. भानावर येताच अगस्ती उठून रामदर्शनासाठी आतुर विह्वल होऊन वृध्द असूनही आपले वृध्दत्व विसरून धावले. उभयतांची प्रेमभेट झाली. प्रणमन-आशीर्वाद-कुशल-पूजन इ. सारे होताच आसपासचे सारे ऋषी-मुनी अगस्ती आश्रमात राम-भेटीस आले. सर्व मुनी-समूहासमोर बसलेले श्रीराम सर्वांना चकोराप्रमाणे या (राम) चंद्राचे अमृत पान यथेच्छ करायला भरपूर अवसर मिळाला. नंतर रघुवीर मुनीश्वरांना म्हणाले, हे प्रभु ! आपण सर्वज्ञ असल्याने आपल्यापासून गुप्त असे काहीच नाही. हे प्रभु ! या मुनीद्रोही राक्षसांना मारण्यासाठी मला आपल्याकडून विशेष मंत्र व मंत्रणा म्हणजे सल्ला (व अस्त्र-शस्त्रादि विद्या) हे सर्व हवे आहे. हे रामांचे बोलणे ऐकून मुनीश्वर अगस्ती स्मित करून रामांना म्हणाले, ‘‘हे नाथ ! आपण मला असा काय –कोण (प्रभावी) समजलांत की मी आपणास मंत्र व मंत्रणा द्यावी ? उलट हे पापनाशका, तुमच्याच भजनाच्या आधारावर मी तुमचा महिमा, तिळभर, कणभरसा जाणतो. तुमची माया हाच कोणी एक विशाल असा औदुंबर वृक्ष आहे. या विश्वातील अगणित ब्रह्मांडे ही त्याला लागलेली औदुंबराची (छोटी छोटी) फळे होत. आणि माझ्या सारखा एखादा (अतिसामान्य) जीव हा त्या फळातला एक क्षूद्र जंतू, कीटक होय. तेव्हा अशा जंतूचे विश्व ते काय व केवढे असणार. त्याचे विश्व त्या औदुंबर फळापुरतेच केवळ मर्यादित. त्याशिवाय त्याबाहेरचे तो कांहीही जाणूं शकत नाही. तेव्हा आपण मला सर्वज्ञ म्हणालात ते आपले औदार्य. पण मी माझे जीवपण-

खुजेपण-जंतूइतके क्षुल्लक-क्षूद्र-अल्प आहे हे जाणून आहे. अन् आपण कसे तर कठीण कराल काळालादेखील भक्षण करून संपविणारे, म्हणून तो काळ (मृत्यु) ही तुम्हांला नेहमी भीत असतो. असे तुम्ही सकल लोक (ब्रह्मांडाचे) अधिपति (अनंतकोटी ब्रह्मांड नायक) असून एका सामान्य मानवासारखे मला हे काय विचारता आहांत? उलट मीच आपणाकडे मागतो, हे कृपानिकेता सीता लक्ष्मणांसह तुम्ही सदैव माझ्या हृदयात रहा. तसेच आपल्या पदकमलांप्रतीं माझी अभंग व अविरल अशी भक्ती, वैराग्यासह सदा राहो आणि मला सदैव सत्संग लाभो. जरी आपण अखंड, अनंत असे परब्रह्म आहांत तरी तुंम्हाला भजणाऱ्या तुमच्या संतांना-भक्तांना तुम्ही अनुभवात गवसता. ते अनुभव-गम्य सगुण-रुप त्याची थोरवी मी काय अन् किती वर्णू? त्या रुपाविषयी माझे मनीं प्रतिक्षणी वर्धमान होणारी, नव्याने वाढत राहणारी प्रीती व भक्ती मला लाभो. हे रघुराजा, आपल्या दासांना भक्तांना मोठेपण देण्याचे तुम्हाला व्यसनच जडले आहे. त्यानुसार तुम्ही जे विचारलेत त्याबद्दल सांगतो – तुमच्या सारख्या त्रयीला शोभेसे परम मनोहर असे एक स्थान मला माहिती आहे. हे प्रभो, दंडकवनातले 'पंचवटी' नावाचे ठिकाण तुम्हाला तिघांना रहायला अति उत्तम असे आहे. प्रभु आपल्याच कुळांतील इक्ष्वाकु-पुत्र-दंडक याला शुक्राचार्यांच्या विरजा नामक कन्येवर दुष्ट नजर ठेवल्यामुळे त्याला उग्र शाप मिळाल्याने ते दंडक राज्याचे दंडक-वन-असे अपवित्र अरण्य बनले आहे. ते आपण आपल्या पद-स्पर्शाने पावन-पवित्र करावे. हे रघुराया, आपल्या दयेचे छत्र आता येथील मुनीवृंदांवर असावे. ''या अगस्तींच्या निर्देशनानुसार राम त्यांचा निरोप घेऊन निघाले व लवकरात लवकर पंचवटीत येऊन दाखल झाले देखील.

## रामांचा पंचवटीतील निवास –

पंचवटीत प्रवेश करताच श्रीरामांची सर्वप्रथम भेट झाली ती जटायू –गृध्रराज (गिधाडांचा राजा) यांच्याशी. याचा आकार प्रचंड असल्याने प्रथम रामांना वाटले हा कुणीतरी राक्षस असावा. रामांना समोर पाहताच जटायू म्हणाले, ''हे वत्सा, मी तुझ्या पित्याचा मित्र आहे.'' असे म्हणताच रामांनी त्यांना विनयपूर्वक नमस्कार केला, पिता समान आदरही दिला. व जटायूंनीही

सीतेचे कन्येप्रमाणे रक्षण करेन असे प्रथम भेटीतच आश्वासन दिले व ते कसे पाळले ते पुढे समजेलच. त्यानंतर प्रभुंनी गोदावरी काठी आपले राहण्याचे स्थान निश्चित करून तेथे पर्णकुटी बांधून ते राहू लागले. रामांच्या निवासामुळे आता दंडकारण्यातील ऋषी-मुनी निर्भय बनले. त्यामुळे आपआपल्या तप-जप-यज्ञ योगादि साधना शांत-एकाग्रपणे करूं लागले. प्रभु चैतन्यामुळे पशु-पक्ष्यांच्या विहारातूनही आनंद सर्वत्र विहरूं लागला. अशा प्रकारे पंचवटीचा सारा परिसर विशेष आनंदी-प्रसन्न असा शोभिवंत दिसूं लागला.

श्रीराम गीता –

एकदा नेहमी प्रमाणेच प्रभु प्रसन्न मुद्रेने बसलेले पाहून लक्ष्मण त्यांना म्हणाले, "हे प्रभो, देव-मानव-मुनींसह समस्त विश्वाचे स्वामी या नात्याने, अत्यंत शुध्द हेतूने मी आपणांस काही प्रश्न विचारूं इच्छितो. त्याच्या उत्तरांमुळे मी आपल्या चरण-रजांची सेवा अधिक उत्तम व तत्परतेने करूं शकेन. यास्तव केवळ ज्ञान म्हणजे काय? वैराग्य कशास म्हणतात ? मायेची व्याख्या काय? ज्यामुळे प्रभु आपण कोणावरही दया करता त्या आपल्या भक्तीचे स्वरूप काय आहे? आणि जीव व ईश्वर यात भेद कोणता? या बाबत माझे मनांत असणाऱ्या शंका-मोह-भ्रम हे सारे निपटून आपल्या चरणांबद्दल माझे मनी प्रगाढप्रीती उपजेल असे ज्ञान मला सांगा." त्यावर राम लक्ष्मणास म्हणतात– "बाळा, तूं अत्यंत कुशाग्र बुध्दिचा असल्याने मी तुला हे सारे प्रश्न, त्यांची उत्तरे अगदी थोडक्यात समजावून सांगतो. तू पूर्णपणे एकाग्रतेने ऐकलेस की तुला सारे कळेलच. मन (संकल्प-विकल्प करणारे), मति म्हणजे बुध्दि (निर्णयात्मक वा निश्चयात्मिका), चित्त म्हणजे (स्मरण शक्ती) – हे सारे एकवटून नीट ऐक. (१) मी आणि माझे, तू व तुझे या सीमित वर्तुळात जीव जो फिरत राहतो त्याला माया असे म्हणतात. मन सर्व इंद्रियांद्वारे ज्या शेवटच्या टप्प्यापर्यंत पोचते ती मायेची कक्षा असे समज. तिचे दोन भेद किंवा दोन भाग आहेत. एकीचे नांव विद्या माया व दुसरी आहे अविद्या माया. पैकी अविद्या माया आहे ती अत्यंत दुष्ट व जीवाला दुःख देऊन, संसाराच्या खोल खोल विहीरीत पाडणारी अशी आहे. तर विद्या माया ही प्रभू प्रेरणेने प्रेरित होऊन सत्व-रज-तम

या गुणांना वश होऊन संपूर्ण जग निर्माण करते. ती ईश्वराधीन असते, तिला स्वत:चे असे स्वतंत्रपण वा सामर्थ्य नसते. (२) ज्ञान म्हणजे अभिमान किंवा मान नसलेली व्यक्ती जी प्रत्येक जीवात ईश किंवा ब्रह्म तत्त्वच परिपूर्ण भरलेले आहे हे जाणून त्याच्याशी प्रेमादराने वागते तिला ज्ञानी म्हणावे . थोडक्यांत **ज्ञानी हा स्वये अ-मानी, सकलां-मानद व म्हणून लोकमान्य बनतो.** (३) वैराग्य,परम वैराग्य संपन्न तोच की जो सत्त्व-रज-तम यांचा त्याग करून त्याच्या दिमतीला ऋध्दि-सिध्दि आल्या तरी त्यांचा तृणवत् जो त्याग करतो तो. विषयांची इच्छा नष्ट झाली तरी कामनेचे मूळ आहे त्रिगुण. त्याविषयी स्थितप्रज्ञाप्रमाणे औदासिन्य बाळगणारा, म्हणजेच सदा सर्वदा (सर्व प्रकारच्या परिस्थितीत समाधानी, प्रसन्न राहणारा.) (४) जो माया,ईश्वर व स्वत:चे खरे स्वरूप जाणत नाही त्याला जीव असे म्हणतात. खरे तर हा जीव म्हणजे ईश्वराचा अंशच आहे पण तो मायेच्या उपाधीमुळे किंवा देहासक्तीमुळे आपले मूळ सच्चिदानंद स्वरुप पूर्णपणे विसरतो, व दु:खी होतो तो जीव. (५) ईश्वर म्हणजे जीवाच्या कर्मानुसार त्याला फळ देऊन बंधनात पाडणारा वा मोक्ष देणारा, मायेला प्रेरणा देणारा तो ईश किंवा शिव होय. न्यायाधिशाप्रमाणे कर्माचा निवाडा करून न्यायसंहितेनुसार (परब्रह्म) जीवाला त्याची कर्मफळे देणारा आहे.

जो धर्माप्रमाणे वागतो तोच वैराग्यसंपन्न होऊ शकतो. आणि जो **नामजपाचा आश्रय करतो त्यालाच ज्ञान म्हणजे ब्रह्मज्ञान प्राप्त होते- असे वेदांनी सिध्द करून गायले आहे.** (६) भक्ती- **हे वत्सा, ज्यामुळे मला द्रव फुटतो, मी (परमात्मा असूनही) ज्यामुळे द्रवित होतो , जी माझ्या भक्तांना सर्व प्रकारे सुख देते त्यास भक्ती असे म्हणतात.** (भक्ताची सर्व इंद्रिये ध्यानामुळे मन-बुध्दि-अंत:करण, डोळ्यांनी रूप पाहणे, कानांनी प्रभूनाम गुण ऐकणे, हातांनी पूजा करणे, डोक्याने नमस्कार करणे, पायाने तीर्थ यात्रा करण्याने सुखी होतात. अशी ही भक्ती पूर्णपणे स्वतंत्र स्वाधीन आहे, इतर कशावरही, कोणावरही अवलंबून नाही. (उलट या भक्तीलाच वश होऊन भगवंतास यावे लागते.) ज्ञान व विज्ञान हे दोन्ही भक्तीच्या अधीन आहेत. हे

दोन्ही भक्तीचे गुलाम आहेत. म्हणजेच भक्ती ही सर्व सुखांचे अनुपम असे मूळ आहे. म्हणून भक्तीला दुसरी उपमाच नाही. संत वा सदगुरु कृपा अनुग्रहाने ती मिळते बरं ! (कारण संत म्हणजे चंदनाचा दिव्य सुवास,वा परिमल, कृपारुपाने तो शिष्य वा भक्तांत 'ये हृदयीचे ते हृदयी घातले' असे करून घालून करिती तत्काळ आपणा सारिखे !) या वेळेपर्यंत राम माधुर्यभावाने बोलत होते. पण भक्तीचा उल्लेख येताच ऐश्वर्य भाव प्रकट झाला व माझी भक्ति असे म्हणूं लागले. भक्ती हा रामांचा अत्यंत हृद्य विषय असल्याने अतिशय सविस्तर व लक्ष्मणांच्या न विचारलेल्या प्रश्नांची पुरवणीदाखल उत्तरे देतात, पहा – भक्तीची साधने तुला मी वर्णन करून सांगतो हं ! भक्तीमार्ग अत्यंत सोपा, सरळ,सुलभ आहे, की ज्या योगे प्राणी सहजपणें थेट माझ्यात येऊन मिळतो. याचे पहिले सूत्र (१) वेदाचरणी ब्राह्मणांविषयी आत्यंतिक प्रेम व आदर असला पाहिजे. (२) वेदांनी प्रत्येक प्राण्याचा म्हणून जो स्वधर्म (स्वकर्तव्य) सांगितले आहे ते त्याने प्रेमाने व नेमाने परिपूर्ण केले पाहिजे. (३) असा स्वधर्म तंतोतंत पाळला तर विषयांबद्दल वैराग्य हे उत्पन्न होतेच होते. किंबहुना असे विषय-वैराग्य येत नसेल तर स्वधर्म-पालनात आपले कुठेतरी कांहीतरी चुकते आहे, किंवा कमी पडते आहे हे पक्के समजावे. (४) अशा वैराग्यानेच मग माझ्या धर्माबद्दल म्हणजे भागवत धर्माबद्दल ईश्वर व भक्तीविषयक प्रेम निर्माण होईल. (५) त्याचीच पुढची पायरी म्हणजे हळूहळू श्रवण, कीर्तन, विष्णू-स्मरण, अर्चन, पाद्य-पूजन, वंदन, सख्य, दास्य, आत्मनिवेदन अशा नानाविध भक्तीच्या एकेका प्रकाराचे प्रेम क्रमशः वाढत जाईल. आणि होता होता हे प्रेम दृढ होईल किंवा स्थिरावेल. (६) याची आणखी पक्की खूणगाठ म्हणजे माझ्या ज्या ज्या लीला आहेत त्या विषयीचे प्रेम प्रतिक्षणी नव्याने वाढत राहील. (तेच तेच पुन्हा पुन्हा गावे-ऐकावेसे वाटत राहील). (७) संत वा सदगुरुचरणांच्या ठिकाणी 'चरण-कमल' ही भावना प्रेमादरपूर्वक वाढीस लागेल. (८) याचाच परिणाम म्हणून काया-वाचा-मन:पूर्वक नेमाने व निश्चयाने भजन-भक्ती (जप-तप-पूजनादि) केले जाईल. (९) सर्वांत महत्वाचे म्हणजे आई-वडील-गुरुजन, बंधू, (स्वजन-मित्र इ.) ईश्वर व पती (स्त्रीचे बाबतीत नवरा व पुरुषांचे बाबतीत स्वामी प्रभु-धनी (अगदी बॉस सुध्दां) या प्रत्येकाच्या ठिकाणी 'मीच वसतो

आहे' या जाणीवेने मनापासून त्यांची सेवा घडेल. आणि या मन:पूर्वक सेवेचे प्रत्यंतर म्हणजे प्रभू गुणगान करताना रोमांच उठणे, कंठ अवरुध्द होणे, नेत्रांतून प्रेमाश्रूंचा वर्षाव होणे ही लक्षणे (अष्टसात्विक भावांची) दिसू लागतील. जो निष्कामपणे दंभ (कपट वा नाटक) न करता, अभिमान रहित होऊन माझी भक्ती (नित्य निरंतर स्मरण) करतो, हे वत्सा मी त्याचा अंकित होतो, त्याला वश होऊन अगदी त्याचा आनंदाने गुलाम बनतो (संत एकनाथांचा श्रीखंड्या). काया, वाचा मने करून निष्काम होऊन जो मला भजतो, माझ्याखेरीज त्याच्या मनाला अन्य गतिच मिळत नाही (अशा अनन्य गतिक) अशाच्या हृदयात मी नेहमी विश्रांती घेत पहुडलेला असतो.

सर्वात शेवटी गोड भक्तीयोगाचे विवरण प्रत्यक्ष श्रीरामांच्या मुखाने ऐकून खऱ्या अर्थाने लक्ष्मण सुखी झाले. अन् त्या सुखाची पावती देण्यासाठी अत्यंत विनयाने कृतज्ञतेने त्यांनी प्रभुचरणीं आपले मस्तक नमविले. असेच पुढे कित्येक दिवस राम-लक्ष्मणांचे अशा प्रकारच्या ज्ञान-वैराग्य-संत वा भक्तगुण व सदगुण अनेक प्रकारच्या नीती (धर्म, न्याय, राज धर्म इ.) यांची चर्चा करण्यात गेले.

अशा ज्ञान वैराग्य नीती विषयक चर्चा करण्यात अनेक दिवस व्यतीत झाले. पंचवटीत असतानाच एकदा रावणाची बहिण अत्यंत दुष्ट सर्पिणीप्रमाणे हृदय असणारी अशी शूर्पणखा रामाश्रमाजवळ आली. राम-लक्ष्मणांचे सौंदर्य पाहून अत्यंत कामलोलुप झाली अन् त्यांच्याशी विवाह करण्यासाठी सुंदर स्त्रीचे रुप घेऊन त्यांच्यापुढे प्रगट झाली. राम आपल्या कपटी कामुक बोलण्याला भुलत नाहीत हे पाहून तिने आपला मोहरा लक्ष्मणाकडे वळविला. तोही बधला नाही म्हणून पुन्हा ती रामांकडे गेली तेव्हा रामांनी तिला लक्ष्मणांकडे पाठवून खूण करून तिचे नाक-कान कापण्याविषयी सांगताच लक्ष्मणांनी त्वरीत तिला विरुप केली त्याबरोबर तिने राक्षसीने आपले मूळचे भयंकर रुप प्रगट केले व विलाप करीत ती तेथून पळाली. तिचे ते भेसूर रुप पाहून सीता खूप घाबरली. हे पाहताच आता ही शूर्पणखा स्वस्थ बसणार नाही हे रामांनी जाणले अन् त्यानुसारच घडले तिने खर-दूषण व त्रिशिरा इ. ना चिथवले व सारा वृत्तांत

कथन करताच ते तिघे १४,००० सैन्यासह राम-लक्ष्मणांकडे युध्द सज्ज होऊन आले . पण राम-लक्ष्मणांचे ते दिव्य-तेजस्वी व अतीव सुंदर रुप पाहून त्यांनी शूर्पणखेस विरुप केल्याबद्दल सीतेला त्यांचेकडे सोपवून दोघांनी निर्भय व्हावे अशी शिष्टाई केली. पण त्या शिष्टाईस रामांनी युध्दवीर-रणधीर बनून क्षत्रिययोग्य उत्तर दिले अन् त्या सर्वांशी युध्दास सज्ज असल्याचे कळविले अन् लक्ष्मणास सीतेला घेऊन जवळील एका पर्वत गुहेत सुरक्षित राहण्यास सांगितले. अन् रामांनी आपल्या दिव्य बाणांनी खर-दूषण-त्रिशिरा यांसह चौदा हजार राक्षस-सेनेचा एका क्षणात धुव्वा उडविला. परब्रह्म रामांनी यावेळी एक सुंदर लीला केली ती अशी की प्रत्येक योध्द्याशी विश्वरुप घेऊन रामच स्वत: लढले त्यामुळे राम-दर्शनाने व राम-राम म्हणत सर्वांना एकाचवेळी मृत्यु आला अन् सर्वांना एकदम 'निर्वाण पद' म्हणजे मुक्ती मिळाली. असे हे रघुवीर अ-कारण करुणेने जीवावर कृपा करताहेत हे पाहून आकाशातील देवांनी स्तुती करुन दुंदुभी-नादासह पुष्पवृष्टी करुन प्रभूंचे अभिनंदन केले की आभार मानले ते एक तुलसीदास वा स्वामी प्रज्ञानानंदच जाणतात !

रघुवीरांची ती स्तुती ऐकून लक्ष्मण सीतेला रामांसमोर घेऊन आले. **त्यावेळी सीतेने 'युध्दवीर' रामांचे हे रुप प्रथमच पाहीले. श्यामल, कोमल देहावर रक्तबिंदू उडलेले ते मनोहर रुप किती पाहू अन् किती साठवू असे सीतेला झाले.**

तिकडे शूर्पणखेने हा सर्व खर-दूषणादिंचा संहार एकट्या धनुर्धर रामांनी केल्याचे सांगून रामांविरुध्द रावणास चिथवले. वैभव व व्यसनांनी उपभोगप्रिय बनल्याने एक क्षत्रिय शूरवीर आर्य (मानव) शत्रू बनून तुझ्यावर चालून येणार आहे असेही सांगितले अन् राम-लक्ष्मणांसमवेत एक त्रिभुवनसुंदरी स्त्री असल्याची विशेष वार्ताही रावणाला दिली. ते ऐकून तिची कशीबशी समजूत काढून रावणाने तिला गप्प बसविले अन् मनोमन त्याने निश्चय केला की मानवरुपाने प्रत्यक्ष परमात्मा अवतरला असेल तर त्याचे हातून आता मी मरण स्वीकारेन, त्या स्त्रीला चोरून आणून त्याची कळ काढेन अन् जर सामान्य मानव असेल तर त्या दोघांनाही युध्दात सहजी जिंकेन.

रामांची सुंदर युक्ती –

पंचवटीत लक्ष्मण जेव्हा वनात कंद-मूळे,फळे आणण्यासाठी गेले तेव्हा रामांनी सीतेला आपले मूळरुप अग्नित सुरक्षित ठेवण्याची युक्ती सांगितली कारण यानंतर अनेक राक्षसांशी युध्द करताना अत्यंत सुशील व पतिव्रता पत्नीला परपुरुषाचा स्पर्शही होऊ नये यासाठी प्रेमाने घेतलेली ही दखल, काळजी अन् उभयतांच्या एकांतातील ही कृती वा युक्ती रावण वधानंतर रामांनी 'अग्निदिव्य' करवून आपली मूळ सीता परत मिळविण्याची सोय करुन धर्मवीरत्त्वाचीही जपणूक केली.

रावण-मारिच संवाद –

स्वार्थ साधण्याच्या हेतूने राजा असूनही दशमुख रावणाने मारिचाला मस्तक नमवून नमस्कार केला. अंकुश, धनुष्य, साप, मांजर हे सगळे वाकतात, नम्र होतात ते घातकारक वा मारक होण्यासाठीच ; रावणही त्याच श्रेणीत जाऊन बसला. नेहमी गुरकावून आज्ञा सोडणारा आज अगदी मृदु-मधुर-प्रिय वाटेल असे बोलू लागला. अवेळी फुलणारी फुले जशी अशकुनी भयसूचक त्याप्रमाणे रावणाच्या एकंदरीत कृतीने मारिचाने जाणले आपली वेळ बहुधा भरत आली. खर-दूषण-शूर्पणखा इ. सारा वृत्तांत मारिचाला ऐकवत रावण त्याला म्हणाला ''तूं इच्छाधारी रूपे घेण्यात पटाईत आहेस तेव्हा तूं मायावी (सुंदर) हरिणाचे रूप घे म्हणजे त्याला भुलून तो (राम) मृगासाठी तुझ्यामागे येईल म्हणजे मला सीतेला पळविणे सोपे जाईल.'' त्यावर मारिच रावणाला म्हणतो- ''हे दशानना, मानव रूप घेतलेले ते चराचराचे ईश्वर, परमेश्वर आहेत. तेव्हा बाबा जपून ! त्यांच्याशी वैर सुध्दा तुम्हाला पुरे पडणारे नाही की परवडणारे नाही. भगवंतांच्या इच्छेने चालावे. त्याने जगविले तर जगावे. त्याने मारले तर (सुखाने) मरावे. (माझा अनुभव तुम्हांला सांगतो.) विश्वामित्रांच्या यज्ञ-रक्षणाच्या वेळी तर हे आणखीच लहान होते, तरी त्यांनी एक बोथट बाण मला मारला तर एका क्षणात हा इथे शंभर योजने दूर येऊन पडलो आहे. तेव्हा त्यांच्याशी वैर करणे बरे नाही. माझी तर त्या भृंगाच्या भयाने कीटकाची जशी गती होते. त्या भृंगाच्या भीतीयुक्त सततच्या ध्यासाने तो

कीटकच शेवटी भृंग बनतो तसे त्या दोन कुमारांच्या त्या बाणाच्या प्रहाराने आजही मला जिकडे पहावे तिकडे तेच दोघे दिसत आहेत, आज-अजूनही-आत्तादेखील! दिसायला ते सामान्य नरासारखे असले तरी ते अत्यंत शूर आहेत हे नुकतेच त्रिशिरा-खर-दूषणादिंच्या वधाने सिध्द झालेच आहे. प्रत्यक्ष शिव-धनुष्यभंग करणारा भगवंताशिवाय दुसरा कोण असणार ? तेव्हा कुळासह खुशाल रहावेसे वाटत असेल तर हा विचार मनातून काढून टाक व घरी जाऊन सुखाने शांत झोप.''

रावण मनात पक्का निश्चयच करून आला होता. त्यामुळे यावर उत्तरादाखल रावणाने मारिचाचा खरपूस समाचार घेतला व शेवटी माझे ऐकले नाहीस तर तुला मारून टाकेन अशी धमकी दिली. तेव्हा मात्र मारिचाने विचार केला. या दुष्टाच्या हातून मरण्यापेक्षा प्रभूंच्या हातून मेलो तर कृतार्थ होईन.

आणि एक सुंदर दृश्य त्यांच्या अंत:चक्षूंसमोर तरळू लागले. अत्यंत सुंदर मनोहर कांचन-मृग असा मी प्रथम त्यांच्या पर्णकुटीभोवती त्या तिघांनाही मनोमन नमस्कार करुन प्रदक्षिणा घालीत आहे व सीतेचे लक्ष्य वेधून घेतले आहे. त्यामुळे प्रभु तिच्या इच्छेनुसार धनुष्यावर बाण संधातून मला लक्ष्य बनवित आहेत. त्यांचे धनुर्धारी रागाने मजवर बाणाचे लक्ष्य लावणारे ते रूप किती सुंदर, मनोहर असेल. मी त्यांच्याशी लपंडाव खेळेन अन् शेवटी त्यांना पहात पहात त्यांच्या बाणाने मला निर्वाण प्राप्त होईल. असे या आगळ्या वेगळ्या भक्ताचे त्याच्यासारखेच मनोरथ पाहता पाहता प्रभुंनी पूर्ण केले. देव-मुनींना प्रिय होईल अशी एक लीला केली. शूर्पणखेने रावणास जाऊन डिवचले की तो स्वस्थ राहणार नाही हे जाणून प्रभूंनी पुढील योजना बनवली.

आता या माया सीतेला भुलविण्यासाठी, मारिच मायावी सुवर्ण-मृग (हरिण) बनून आला. त्याचे मनोरथ व स्वप्न साकार करून त्याला सुखविण्यासाठी रघुपती सीतेच्या इच्छेनुसार त्याला मारून त्याचे चर्म (कातडे) आणण्यासाठी धनुष्य-बाण घेऊन सज्ज झाले.

प्रभूंचीच इच्छा या माया-नगरीत अनेक प्रकारची नाटके करण्याची होती. त्यानुसार त्यांनी लक्ष्मणास सावध राहण्यास बजावले. सीतेच्या

संरक्षणासाठी बुध्दि विवेक व सामर्थ्य यांचा वेळेनुसार वापर करण्याची सूचना देऊन प्रभु गेले. ठरलेल्या नाट्य-संहितेनुसार मारिचास निज-पद अर्पण करून प्रभु परत येऊं लागले तो लक्ष्मण वाटेतच भेटले. नाटकाचा दुसरा प्रसंग सीता-हरण रावणाने केले पण तिला स्पर्श करण्यापूर्वी तिला मातेसमान मानून मनोमन तिला वंदन केले अन् तिला उचलून रथात बसविले. रावण हाही या नाटकात खलनायकाचेच पात्र सादर करीत आहे. रावणाचाही अवतार तुलसीदासांनी वर्णन केल्यामुळे ही उदारता इथे दिसते. हे रामचरितमानसाचे सर्वही रामायणांहून वेगळे असे सुंदर अगम्य वैशिष्ठ्य आहे !

सीतेचा करुण विलाप –

हे प्रभो, हे नाथ, आपण या विश्वात एकमेवाव्दितीय असे शूर वीर आहांत (नुकतेच खर-दूषण युध्दांत मी पाहिले आहे). सर्वांसाठी दीनानाथ, दयासागर असणारे, माझ्यावर, आपल्या प्रियेच्यावर आपण दया का नाही करत? माझ्या हातून असा कोणता बरें अक्षम्य गुन्हा घडला आहे ? संकटहरणा या संकटातून मला लवकर सोडवा. मी आपणांस शरण आले आहे, तेव्हा आपल्या ब्रीदानुसार शरणागतास सुख द्या. हे रघुकुल रुपी सूर्याप्रमाणे या दुष्टाला भाजून काढा व कमलाप्रमाणे मजवर कृपा करा. हाय रे दैवा! हे लक्ष्मणा! मला क्षमा करा, तुम्ही दोष देण्यास पात्र नसतां मी तुमच्यावर रागावले, त्याचे हे फळ मला मिळते आहे. अशा प्रकारे कोणाचेही हृदय सहजी पिळवटून टाकेल असा करूण विलाप सीता करु लागली. तिचा तो विलाप ऐकून त्या वनातली नर-नारींसह पशु-पक्षी जे जे प्राणधारक होते ते ते सर्व वृक्ष-लता-वेलींसह सारे दुःखी झाले. पण अपरिमित स्नेह व कृपा करणारे प्रभु सीतेपासून फार फार दूर गेलेले होते. तेव्हा ही माझी विपत्ती प्रभुला कोण सांगेल व कोण या संकटातून मला सोडवेल? असे सीता मनाशी म्हणत होती.

जटायू प्रसंग (महाभागी जटायू) –

गृध्रपती-जटायूंनीही सीतेचा तो करुण विलाप ऐकला. गेली सुमारे तेरा वर्षे ते हा आवाज सतत ऐकत असल्यामुळे खूप दुरुनही त्यांनी तो आवाज नेमका ओळखला. आणि यवनांनी बळजबरीने गाय जशी ओढत न्यावी तशी

तो नीच रावण सीतेला तिच्या इच्छेविरुध्द ओढून नेताना त्याने पाहिले. व सीतेला तत्काळ दिलासा देत जटायू म्हणाले, ''सीते, मुली, भिऊ नकोस, ह्या राक्षसाच्या तावडीतून हा आत्ता मी तुला सोडवितो पहा.'' असे म्हणून अत्यंत रागाने, त्वेषाने आपले पंख फुगवून सारे बळ एकवटून आकाशातून वज्र सुटावे एखाद्या पर्वतावर तसे जटायू रावणावर तुटून पडले. त्याला सावध करून प्रथम सामोपचाराने सीतेला सोडण्याबद्दल सांगितले. त्यानंतर रामाच्या रोषाने तुझ्या समस्त कुलाचा नाश होईल असे सांगीतले. त्यासही जुमानले नाही असे पाहून त्याला आपल्या चोचीने व पंखांच्या फटकाऱ्याने परास्त केले. चोचीने त्याचे शरीर बरेचसे विदीर्ण केले त्यामुळे कांही वेळ रावण बेशुध्द पडला. परंतु त्या अवस्थेत अधर्माने जटायूने त्याला मारले नाही. उलट निःशस्त्र जटायूवर अधर्माने रावणाने आपली तलवार चालवून त्याचे दोन्ही पंख कापून टाकले. त्यामुळे जटायूचा नाईलाज झाला व तो सीता-रक्षणाच्या प्रयत्नात असफल होऊन धरणीवर कोसळला. त्याही स्थितीत रावण तिला कोणत्या दिशेस घेऊन जात आहे हे त्याने नीट पाहून ठेवले व नंतर अपार अशा वेदना होत असताना देखील १३ वर्षे जी पावले व त्या पावलांवरील पवित्र चिन्हे तो पहात होता **त्यांचे स्मरण करीत- ऊर्ध्वरेषा, ध्वज, वज्र, अंकुश व मुखाने राम-नाम घेत** रामांना हे सांगण्यासाठी केवळ प्राणांतिक यातना सोसत राहिला.

रघुवीरांचा विरह –

लक्ष्मणांना समोरून येताना पाहूनच रामांनी सीता पर्णकुटीत नाही हे तत्काळ ओळखले. सीतेने जबरीने पाठवल्यामुळे आल्याचे लक्ष्मणाने सांगताच दोघेही पर्णकुटीजवळ आले. पर्णकुटीत व आसपास पाहता सीता त्यांना दिसेना. त्याबरोबर रामांच्या चरणांवर पडून लक्ष्मणाने परोपरीने आपली काही चूक नसल्याचे सांगितले. आता दोघेही तिला शोधत शोधत पुढे निघाले. राम म्हणतात. ''हे परम पवित्र, सुशीलव्रती, गुणी सीते तूं कुठे आहेस? तूं लपून असा माझा अंत पाहू नकोस, ही चेष्टा, हा लपंडाव पुरे. चटकन पुढे, समोर ये पाहूं!'' असे म्हणत प्रभूंच्या डोळ्यातून अश्रूधारा वाहू लागल्या. आणि ते वृक्ष-लता-पशु-पक्षी साऱ्यांना संबोधून सीता कुणाला दिसली का असे विचारुं

लागले. स्त्री सौंदर्यास दिल्या जाणाऱ्या सर्व उपमांचा उच्चार करून राम म्हणतात, "हे सीते, हे सारे – हरिण,शुक,कपोत,खंजन,मृग-मीन, कोकिळा, कुंदकळ्या, डाळिंब, दामिनी, कमल इ.इ तुला जणूं तुझ्यापेक्षा वरचढ झाल्याचे सांगून हिणवत आहेत. तरी प्रिये अशी ही स्पर्धा तुला कशी सोसते? तू लवकरात लवकर प्रगट हो." ह्या रघुपतींच्या विरहाने देखील सारी सृष्टी दुःखी बनली. परब्रह्म असूनही सामान्य विरही विषयी राजकुमाराचे नाटक हुबेहूब वठवले जात होते. असे विलाप करत करत पुढे पाहतात तो जटायू रक्ताच्या थारोळ्यात पडलेले दिसले. ते पाहताच राम आपले दुःख पूर्णपणे विसरून गेले.

<u>जटायूची अद्‌भुत करणी व त्याचे फळ –</u>

कमलाप्रमाणे कोमल-आल्हादक-शीतल हाताने रामांनी जटायूंच्या मस्तकास स्पर्श केला. अत्यंत प्रेमळ व हळूवार अशा त्या दिव्य प्रभु-स्पर्शाने तत्काळ जटायूंच्या साऱ्या यातना, पीडा, हाल, कष्ट संपले. त्यांनी त्या स्पर्शाने राम-स्मरणातून भानावर येऊन डोळे उघडले अन् समोर पाहतात तो 'श्रीराम'! जटायूंच्या दुःखाने दुःखी झालेल्या रामांना मग उलट जटायूंनाच भानावर आणावे लागले. असे भगवंत भक्ताच्या दुःखाने व्याकुळ होऊन इतके भान हरपले! जटायू रामांना म्हणाले, "हे रामा, हे सर्वांच्या दुःखनाशका रामा, नाथ! त्या दुष्ट रावणाने मला असे असहाय करुन टाकल्याने मी त्यानंतर काहीही करूं शकलो नाही हो, त्याने माझ्या देखत हरिणीच्या पाडसाप्रमाणे विलाप करणाऱ्या त्या सीतेला बळपूर्वक हरण करून नेली. हे प्रभो ! तो तिला दक्षिणेकडे घेऊन गेला. खरे तर माझे प्राण तेव्हाच जायचे. पण आपल्याला ही वार्ता देण्यासाठी मी प्रयत्नपूर्वक हे प्राण राखले. यानिमित्ताने मृत्युसमयी हे कृपानिधाना तुमचे दर्शन व्हावे हा ही हेतू होताच." असे म्हणताच राम लगेच म्हणाले, "हे तात, पिताजी, हवे तर आपण अजूनही आपली ही काया-हा देह ठेवा." त्यावर स्मितहास्य करीत जटायू म्हणाले- "हे देवा, कितीही अधम (पापी) असा जीव असला तरी मृत्युसमयी त्याने तुमचे नाम घेतले तर तो जीव मुक्त होतो असे वेद सुध्दा म्हणतात. मग नाथ असे प्रभु (महाप्रभावी) आपण

साक्षात या नेत्रांसमोर मृत्युसमयी असताना, हा देह ठेऊन मी कोणते बरे सुख मिळवूं? कारण आज ना उद्यां मृत्यु हा सृष्टी नियमानुसार येणारच, मग आता तुम्हांला पहात या जीवाचे सार्थक करणे हेच श्रेयस्कर नाही कां ?'' त्यावर रामांचेही नेत्र सजळले. अश्रूपूर्ण नेत्रांनी ते जटायूस म्हणाले – ''तात ! ज्यांच्या मनात पर-हित, दुसऱ्याच्या कल्याणाचाच विचार असतो, त्याला या जगात दुर्लभ असे काय आहे बरं ! काहीही नाही. तेव्हा पूर्णकाम किंवा निष्काम अशा तुम्हाला मी आपले निज (साकेत) धाम देतो. अन् हे रुप तुम्ही टाकून माझेच रुप धारण करुन जा. फक्त सीताहरणाचा वृत्तांत माझ्या पित्याला तेथे जाऊन-भेटल्यावर मात्र अजिबात सांगू नका, कारण तो तेथे आल्यावर सकुल रावणच सांगेल. ज्या रावणाने माझी पत्नी बळाने हरण केली त्याचा नि:पात करणे हे रघुवंशी म्हणूनही माझे कर्तव्यच ठरते.'' रामांचे हे संभाषण संपताच, जटायूंनी आपले रूप टाकले व रामांपुढे त्यांच्याच रुपात –पीतांबर धारण केलेले, अनेक दिव्य अलंकारमंडित, श्यामल गात्री विशाल चार बाहु असे (शंख, चक्र, गदा, पद्मधारी विष्णू वा नारायण) रुप धारण करून प्रेमाश्रू भरल्या नेत्रांनी ते रामांची स्तुती करु लागले.

जटायु कृत श्रीराम स्तुती –

निर्गुण असूनही अनुपम रुप व गुण असणारे, विश्व-चालक दशमुखाची दहाही शिरे तोडून रघुवंशाला मंडन करणारे अशा रामा, तुमचा जय असो, मेघाप्रमाणे श्यामल गात्रांचे, कमलाप्रमाणे मुख असणारे, राजीव-नयनी हे रामा आपल्या ह्या विशाल बाहूंनी आपण भक्तांचे कृपाळूपणे नित्य निरंतर भवभयाचे मोचन करतां, अशा तुम्हाला मी वारंवार वंदन करतो. तुम्ही अनादि, अज, अव्यक्त, एकमेव अगोचर, अप्रमेय अशा बलाने संपन्न आहांत. व्द्वंव्दांचे हरण करुन, धरणीचा भार हलका करणारे, भक्त हृदयांत बसणारे –जे इंद्रिय जयी आहेत त्यांच्या, असे इंद्रियातीत असून इंद्रियजयीही आहांत. जे सतत 'राम' मंत्र जपतात, अशा संत,भक्त जनांचे आपण हे अनंता मन-रंजन करता. निष्काम-भक्त प्रिया, रामा तुम्हाला मी वारंवार नमस्कार करून विनवितो, माझे दुष्ट विकार-समूह नष्ट करा. वेद ज्यांना निरंजन, अज, विरज, ब्रह्म, विभु

इ.नावांनी वाखाणतो, अशा तुमचे ध्यान करतात. जे वैराग्य, ज्ञान,योग व्दारा मुनी कधी कधी ध्यानांत पाहू शकतात ते करुणामयी, संपूर्ण जगाला मोहविणारे सुंदर रुप जे आता मजसमोर ठाकले आहे, ते अंगप्रत्यंगातून मदन-सौंदर्य विभूषित असे ब्रह्म माझे हृदयरुपी कमलांत भृंग बनून त्या कमलाचे (भक्तीरसाचे) अखंड पान करीत राहो. जो दुर्गम्यही आहे व सुगमही आहे, सहज निर्मल आहे, कधी सम तर कधी विषम, सदैव शीतल, ज्याला योगी आपल्या मन-इंद्रियांव्दारे वश करण्याचा अखंड प्रयत्न करीत असतात, असा हा राम त्रिभुवनाचा धनी असूनही भक्तांना वश असणारा, भव शमन करणारा अशी ज्याची पावनदायक कीर्ती आहे तो रमाविलास राम सतत माझ्या हृदयात राहो. अशी स्तुती करुन जटायुने हरि-धाम प्राप्त केले. त्यानंतर रामांनी त्यांची यथोचित दाहक्रिया इ. केली. इतकेच नव्हे तर अशौच-अंत्य संस्कारही केले. जे भाग्य दशरथांना लाभले नाही ते सद्‌भाग्य प्रभुचा हस्त-स्पर्श, त्यांच्या हाताने पाणी, अग्नि संस्कार जटायूंना लाभले. अधमातल्या ही अधम जातीचा मांसाहारी (क्वचित प्रसंगी नासके-कुजके मांस खाणारा) असा हा पक्षी असून दीनवत्सल भगवंतांनी योग्यांना याचना करून जी गती मिळत नाही ती सरूपता मुक्ती दिली मिळाली- असे भगवान अत्यंत कोमल मनाचे, दीनांवर दया करणारे, अ-कारण कृपा करणारे आहेत म्हणून तर त्यांना रघुकुलाचा नाथ 'रघुनाथ' म्हणतात.

कबंधोध्दार –

त्यानंतर पुन्हा सीता शोधाचे कार्य राम-लक्ष्मणांनी पुढे चालू केले. शोध करीत जाताना वाटेत त्यांना कबंध म्हणजे अत्यंत भयंकर फक्त धड (मस्तकविरहित) प्रचंड बाहु असलेले ते अक्राळ-विक्राळ रुप दिसले. दुर्वासांच्या शापामुळे ब्राह्मणांची कुचेष्टा केल्यामुळे त्याला हे रुप मिळाले होते. रामांचे हातून वध होताच त्याला पूर्वीचे गंधर्वाचे रुप प्राप्त झाले. त्यावेळेस रामांनी त्याला बजावले विप्र-वेद जाणणारे व तसे आचरण करणारे ब्राह्मण मला अति प्रिय आहेत. किंबहुना ब्राह्मण कसेही असले तरी ते मला प्रिय आहेत हे सर्वांनी ध्यानात ठेवावे.

शबरी-भेट –

कबंधास उत्तम गती देऊन रामांची पावले अचानक शबरीच्या आश्रमाकडे वळली. शबरीने रामांना पाहिले अन् गुरुंनी सांगितलेले ते हेच राम हे तिच्या पक्के मनी ठसले. कमळासारखे विशाल नेत्र, विशालबाहू, जटांचा मुकुट, गळ्यात रुळणाऱ्या वनमाळा, असे दोन सुमनोहर सौंदर्याच्या मूर्ती- एक श्यामल व एक गौर पाहून शबरी रामांच्या पायावर कोसळली आणि तिने ते पाय घट्ट धरून ठेवले. वारंवार ती नमस्कार करूं लागली आणि रामप्रेमात ती इतकी मग्न झाली की तिच्या मुखातून शब्द फुटेना. नंतर भानावर येऊन रामांना सुंदर सुशोभित केलेल्या आसनावर बसविले व पाद प्रक्षालन करून, तिने निवडून ठेवलेली स्वादिष्ट, सुमधुर फळे ती रामाला देऊं लागली. एकेक फळाचा आस्वाद घेताना राम त्याची अमृतासमान असलेल्या रुचीची स्तुती करीत खाऊ लागले.

नंतर ती रामांपुढे हात जोडून उभी राहीली. प्रभुंकडे पाहून पुन:पुन्हा अतिप्रेमभराने तिचे अंत:करण भरून येऊ लागले. ती रामाला म्हणते- ''खरा सारख्या दुष्ट राक्षसालाही आपल्या रुपाने मोहित करणाऱ्या हे रुपसुंदरा, मी अनंत अधमाधम असलेली, निरक्षर, अडाणी अशी ही स्त्री तुमची काय स्तुती करु?'' त्यावर राम तिला म्हणतात- हे भामिनी, (भक्तीच्या सौंदर्याने नटलेल्या स्त्रिये) मी फक्त भक्तीचे नाते मानतो. भक्तीपूर्ण जीव असेल तर त्याची जात, पात, कूळ, धर्म, मोठेपणा, त्याची सांपत्तिक स्थिती, त्याचे बळ, त्याचा परिवार व नोकर-वर्ग त्याचे गुण, चातुर्य ह्यापैकी मी काहीही ध्यानी घेत नाही. फक्त तो जीव भक्तीयुक्त-भक्तीमान आहे की नाही हेच केवळ माझे लेखी महत्वाचे आहे. भक्तीविना जीव म्हणजे पाणी नसलेला (निरुपयोगी) ढग होय. तेव्हा हे शबरी, मीच तुला या भक्तीचे ९ प्रकार सांगतो, नीट सावधपणे ऐक. (जणूं भगवंतानेच ही भक्ताची स्तुती गायली). पहिली भक्ती संतांच्या संगतीत राहणे, दुसरी माझ्या कथा अत्यंत प्रेमाने त्यात रस घेऊन ऐकणे, तिसरी- मानरहित होऊन गुरु-चरण-कमलांची सेवा करणे, चौथी-निष्कपट मनाने दंभरहित होऊन माझे गुणवर्णन करणे, पाचवे-दृढविश्वास पूर्वक आपला नाम

मंत्र जपणे हे वेदांनी सांगितलेले साधन होय. सहावे- मनाचे शमन व इंद्रिय-दमन पूर्वक अनेकविध कर्मात वा साधनात गुंतण्यापेक्षा एखादेच साधन परिपूर्ण एकाग्रतेने सदाचार युक्त आचरण ठेऊन करावे. सातवे साधन म्हणजे प्रत्येक जीवात मीच आहे हे समजून त्यानुसार वागावे व माझ्यापेक्षाही संतांना अधिक मान द्यावा. आठवे साधन म्हणजे दैवयोगे जी परिस्थिती प्राप्त आहे त्यात संतोषाने-प्रसन्न मनाने रहावे व कधीही दृष्टी दुसऱ्यांच्या दोषावर ठेवू नये. नववी भक्ती म्हणजे सर्वांशी सरळ, ऋजू म्हणजे कपटरहित वागावे आणि मनात समत्व ठेवून म्हणजे ना खेद ना हर्ष अशी स्थितप्रज्ञता बाळगून माझ्यावर सर्वस्वी भार घालून, विश्वासून निश्चिंत रहावे. अशा या नऊ प्रकारच्या भक्तीपैकी एखादी भक्ती ज्याच्यामध्ये असेल तो सजीव, निर्जीव, (पशु-पक्षी)स्त्री-पुरुष कोणीही असो तो हे भामिनी मला अत्यंत प्रिय होतो. आणि तुझ्यामध्ये तर या नऊही भक्ती-सर्वच्या सर्व आहेत; त्यामुळे तू मला अत्यंत प्रिय आहेस. म्हणून योगीवृंदांनाही (प्रदीर्घ अशा तप-ज्ञान-योग साधनेने) दुर्लभ अशी सर्वोत्तम गति म्हणजे सायुज्य मुक्ती मी तुला प्रदान करतो, कारण **माझे दर्शन होणे याचे ते अनुपम असे फळ म्हणजे जीव त्याच्या स्वरुपास प्राप्त करतो.** पण ही उत्तम गती मिळण्यापूर्वी हे भामिनी, गजवरगामिनी जानकीच्या शोधासंबंधी तूं काही जाणत असशील तर सांग.

त्यावर शबरी म्हणते- हे रघुवरा, इथून पंपा सरोवराजवळ जा, तिथे सुग्रीवाशी मैत्री झाली तर तो तुम्हाला या कामी मदत करेल. हे सांगून योगाग्नी प्रगट करुन प्रभुंच्या चरण-कमलांची स्वहृदयात स्थापना करून ती प्रभुलीन झाली. **अत्यंत हीन कुलांतील स्त्रीने या मानसात निष्काम भक्तीच्या मार्गाने सर्वश्रेष्ठ अशी सायुज्यता मुक्ती मिळविण्याचे हे एकमेव उदाहरण आहे.**

शबरीने सांगितल्याप्रमाणे प्रभु-लक्ष्मणासह दक्षिण दिशेकडे पंपा सरोवराकडे जाऊं लागले. त्यावेळी वसंत ऋतू असल्याने प्रभुंना सीतेची प्रकर्षाने आठवण होऊन ते पुन्हा विरह विकल बनले व लक्ष्मणास म्हणू लागले – "हे पहा लक्ष्मणा, हे पशु-पक्षी देखील आपल्या प्रिये समवेत वा वनातुन विहरत आहेत. जणू ते मलाच चिडवत आहेत. ही वसंतातली वन-शोभा पाहून

माझे मन क्षुब्ध होत आहे. हे हरणांचे कळपचे कळप त्यांतील मृगी मृगांना म्हणत आहेत की आपल्याला भीती बाळगण्याचे कारण नाही. हे दोघे (राम-लक्ष्मण) कांचनमृग शोधत हिंडत आहेत, आपण तर साधारण मृग आहोत. हत्ती आपल्या हत्तीणींसह स्वैर संचार करीत आहेत. मी विरहामुळे बलहीन झालो हे जाणून मदन मजवर चाल करून आला खरा पण लक्ष्मणासारख्या अकाम व जितेंद्रिय पुरुषास पाहून रामांवर हल्ला करायची त्याची हिंमतच झाली नाही. मदनाने वायुस दूत म्हणून पाठवला पण लक्ष्मणांना पाहताच त्याने काढता पाय घेतला. पण मदनाने सैन्यासह तळ ठोकला असून जणूं तो योग्य संधिची वाट पहात आहे असे राम म्हणाले.

पंपा सरोवर –

प्रभु लक्ष्मणासह पंपा सरोवराजवळ पोचले. संत हृदयासारखे स्वच्छ, सुंदर, पारदर्शी असे त्याचे पाणी होते. चारी बाजूंनी सुंदर घाट होते. अनेक पशु तेथे पाणी पिऊन तृप्त होत होते. विविध रंगी कमळाचे ताटवे तर इतके घनदाट गच्च होते की अगदी जवळ जाऊनच त्याखालचे पाणी दिसत होते. त्या कमळांवर भ्रमरांच्या थव्यांवर मधुर गुंजारव सुरु होता. तर आसपास असणाऱ्या मोठमोठ्या आंबा, कदंब, तमाल, बकुळ इ. वृक्षांवर अनेक पक्षी जणू आपल्या सुमधुर नादाने प्रवासी-पांथिकांना या सरोवराजवळ बोलवत होते. पक्ष्यांच्या ध्वनीमध्ये हंस, बगळे, चक्रवाक इ. जलपक्ष्यांचाही रव मिसळलेला होता. त्या तलावाच्या काठी अनेक ऋषींचे आश्रम शोभत आहेत. फळा-फुलांवरुन येणारा वारा अनेक प्रकारचा सुगंध शीतलता मंद-मंदपणे सर्वत्र पसरून आसमंताच्या रमणीयतेला परिमलाची सुरेख जोड देत होता. ते सुरेख सरोवर पाहून राम-लक्ष्मणांनी स्नान करताच ते दोघेही परम सुखी झाले. स्नान-संध्येनंतर एका दाट छायेच्या सुंदर वृक्षाखाली ते बसले. त्यावेळी अनेक ऋषी-मुनी-देवगण प्रभुंचे दर्शन घेऊन त्यांची स्तुती करून परत गेले.

प्रभु-नारद संवाद –

तेथे सुरम्य स्थान असल्याने राम-लक्ष्मणांचा बराच काळ तेथे गेला. तेथे प्रभु लक्ष्मणांना अनेक रसाळ कथा सांगताना, अत्यंत प्रसन्न असे पाहिले

आणि नारद तेथे आले. रामांसमवेत त्यांची प्रिया वैदेही-जानकी नाही, माझ्या शापामुळे त्यांना आपल्या प्रियेचा विरह सोसावा लागत आहे हे पाहून नारद मनोमनी फार दु:खी झाले आणि रामचरित वीणेच्या झंकारावर गात गात प्रभुं पुढे हजर झाले. नारदांनी दंडवत प्रणाम करताच प्रभूंनी अति स्नेहपूर्वक बराच वेळ त्यांना आपल्या हृदयाशी धरून ठेवले. त्यांचे क्षेम कुशल विचारुन प्रभुंनी मोठ्या आदराने त्यांना आपल्या जवळ बसवून घेतले आणि लक्ष्मणांनी त्यांचे (नारदांचे) पाद-प्रक्षालन केले.

मग नारद अनेक प्रकारांनी विनंती करुन हात जोडून प्रभूंना म्हणाले, ''आपण सहज उदार आहांत, अंतर्यामी आहांत, भक्तांपुढे आपले हृदय-प्रगट करणारे आहांत. हे जाणून हे प्रभो थोडासा उध्दटपणा करून एक वरदान मागतो.''

''हे प्रभो, वेदांनुसार आपली अनेकविध नांवे असली तरी 'राम' हे आपले नाम सर्व नामांहून अधिक श्रेष्ठ असावे, ठरावे कारण हे नाथ, ते विचाररुपी सूक्ष्म पापांचाही समूह नष्ट करणारे असे आहे. सर्व नामांत हे कसे शोभून दिसावे सांगू? – **भक्ताच्या हृदय-आकाशात सदैव भक्तीची पौर्णिमेची (शारदीय) रात्र असावी, अन् 'रामनाम' हा त्यातला पूर्णचंद्र असावा व इतर (श्रुतीउक्त) नामे ही त्या भोवतालची विमल नक्षत्रे असावीत.** हे नारदांचे सुंदर मागणे ऐकताच प्रभूंनी 'एवम् अस्तु किंवा तथास्तु' म्हणून त्यावर शिक्कामोर्तब केले. त्याबरोबर नारदांनी प्रभू चरणांवर आपले मस्तक नमविले.

त्यानंतर नारद म्हणाले तुमच्या त्या मायावी विश्वमोहिनी राजकुमारीशी तुम्ही मला कां नाही लग्न करु दिलेत? त्यावर प्रभूंनी तुझ्या सारख्या अ-मानी, बालक भावाच्या भक्ताचे रक्षण करणे हे माझे कर्तव्य म्हणून मी तसे केले. कारण स्त्री रुपी ऋतू सहाही ऋतूंमध्ये भक्ताला मोहात अखंड गुंगवून, गुंतवून टाकतो. म्हणून त्या मोहरूपी नारीपासून तुझ्या कल्याणार्थ मी तुझी सुटका केली. त्यानंतर नारदांनी राम-मुखाने संत-लक्षणे ऐकण्याची इच्छा व्यक्त करताच राम म्हणाले-

" हे मुने, ज्या गुणांस्तव भक्तांना मी वश असतो, ते संतांचे गुण वा लक्षणे मी तुला आता सांगतो ती ऐक. काम-क्रोध-मोह-मद-माया मत्सर हे सहाही विकार त्यांनी पूर्णतः जिंकलेले असतात. त्यामुळे ते अनघ म्हणजे निष्पाप व अकाम असे असतात. त्याचे मन स्थिर असते. अकिंचन दीन म्हणजे माझे या जगात काहीही नाही, जे आहे ते सारे भगवंताचे अशी त्यांची दृढ धारणा बनलेली असते. असा हा माझा भक्त अंतर्बाह्य-शुध्द-पवित्र असा असतो. त्यामुळे तो पूर्ण सुखी, जणूं सुखाचे सदनच असा असतो. ब्रह्मज्ञान त्याच्याकडे या गुणांना आकृष्ट होऊन जणूं आपोआप चालत येते. असे ज्ञान, विज्ञान, मुमुक्षा अशी कोणतीही इच्छा त्याचे ठायी नसते इतका तो निरिच्छ बनतो. साधन-धामरुपी शरीर चालवण्यापुरते अन्न-पाणी-झोप इ. चा भोग घेऊन तो मितभोगी बनतो. सदैव सत्याची कास धरुन राहतो. कवि कोविद म्हणजे ज्ञानी, पंडित-दूरदर्शी असा तो आपसुकच बनतो. तो सदैव सावध असतो. मायामय संसारात राहूनही या मायापाशात आपण कणभर वा क्षणभरही गुंतत नाही ना, याबाबत तो सदा-सर्वदा दक्ष-जागृत, जागरुक राहतो. स्वतः मानाभिमान रहित राहून बाकी सर्वांना मात्र नेहमी मान देतो. धर्मगती जाणण्यात निपुण असून धीरपणाने प्राणपणाने धर्म पाळतो. थोडक्यात काय तर माझा भक्त सर्व सदगुणांचे आगर असाच असतो. संसार-दुःखरहित, सर्व संशय-रहित होऊन केवळ माझ्या पद-कमलांवर पूर्ण प्रेम-श्रध्दा-विश्वास निष्ठा ठेवून राहतो इतका की त्याला त्यापुढे आपल्या घरादाराचे नव्हे तर स्वतःचे देहभानही रहात नाही. या त्याच्या गुणांची स्तुती त्याच्यासमोर करताच त्याला अतिशय संकोच होतो. पण तो मात्र इतरांचे गुण-गान ऐकून अतिशय आनंदी होतो. सर्वांशी प्रेमाने वागतो अन् कधी चुकूनही कुणाचे मन न दुखवता (कोणीही कितीही छळले, निंदले तरी) शांतच राहतो. जगात जगताना नीती सोडून कधीही वागत नाही. कोणत्याही मातेने आपल्या शिशुवर करावे तसे हा सर्वांशी सहजतेने

सरळ व प्रीतीयुक्त अंत:करणाने वागतो. आपल्या दिनक्रमात व्रत,जप,तप, इंद्रिय दमन, संयम, नियम यात अतिशय काटेकोर असतो. अन् हे सारे कुणीतरी लादल्यासारखे रागाने बळेबळे आदळआपट न करता अत्यंत प्रेमयुक्त अंत:करणाने करतो. आपले सदगुरु, संत, भगवंत व वेदवित् ब्राह्मण यांच्या ठायी प्रेमादरपूर्वक पायांवर डोके ठेवून नमन करतो.

दया, क्षमा, मैत्री श्रध्दा आणि प्रसन्नता हा जणू याचा स्व-भावच बनतो. आणि माझ्या पदीचे त्याचे प्रेम नित्य नव्याने वाढतच जाते. ज्ञान, विज्ञान, विवेक, वैराग्याने तो अगदी शिगोशिग भरलेला असतो. पण तरीही दंभ – मान – मद चुकूनही याचेकडे फिरकत नाहीत. म्हणूनच कल्पनेतही हा कधी वाइट मार्गाने जात नाही. सामान्यत: हा सदैव माझे नाम – गुण - रुप ध्यान –भजन कीर्तन – यशोगान हे करण्यात वा ऐकण्यात तल्लीन झालेला असतो. त्याचाच अर्थ त्याचे मन – बुध्दि – चित्त – अहंकार यांना त्याने सदैव कायमचे माझ्याकडे पाठवलेले असते. आणि त्यातूनही नि:स्वार्थीपणे दुसऱ्यांचे हित – कल्याण – चांगले – भले करण्यासाठीच हा नेहमी धडपडत; प्रयत्नरत असतो. हे नारद – मुने, या माझ्या सज्जन–साधु भक्तांचे गुण प्रत्यक्ष वेद , शारदा, शेष इ.पूर्णपणे वर्णन करु शकणार नाहीत. असा हा अपार अगाध गुणसागर म्हणजे माझा भक्त होय.

अशा प्रकारे दीनबंधू कृपाळू रामांच्या मुखातून ही संत-लक्षणे ऐकून नारद धन्य झाले. आणि आपल्या या हरिरंगात रंगून गेले. वारंवार प्रभुंना वंदन –नमन करून आपल्या वीणेवर भगवंत व संत वा भक्तांचेही गुणगान करीत करीतच नारद ब्रह्मलोकी निघून गेले.

अरण्यकांड फलश्रुती –

अरण्यकांड ही तिसरी मायापुरी ( माया मोक्षनगरी) आहे. त्यामुळे या मायेतून सुटण्याचा एकमेव मार्ग म्हणजे–रावणारि रामाचे यश–कीर्ती गान- करणे वा ऐकणे. त्यात रमण्यासाठी मनाची पूर्वपीठिका जपरुपी तपस्येने वैराग्य युक्त होऊन प्रभूशी योग जमविणे – प्रभुशी दृढभावे एकरुप होणे.

हे मना, काम-मदरुपी कामिनीच्या व्यक्त रुपात पतंग बनून आसक्त होऊ नको व स्वत:चा नाश करुन घेऊ नको. त्यासाठी हे सारे षड्विकार सोडून दे आणि रामाला काया-वाचा-मने समर्पित हो. पण त्यासाठी मुख्य पथ्य आहे, संत-संग, सत्संग !

कारण हे संत-सदगुरुच आपल्याच हृदयातल्या आत्मारामास, निद्रिस्त आत्मारामास जागवून त्याच प्राप्ताची प्राप्ती करून देणारे महान उपकारकर्ते आहेत. अगणित जन्मातही हे ऋण फिटणारे नाही. म्हणून तर संत तुकोबाराय सांगतात-

*संत-चरण रज लागतां सहज.....*

*हृदयीं प्रगटे रामरुप!*

(अरण्य काण्ड समाप्त)

तृतीय सोपान समाप्त

# किष्किंधा कांड – (काशी मोक्षपुरी)

मंगलाचरण –

वैदेहीचा शोध करीत प्रत्येक वृक्षाला व हरिणाला जानकी मानून गाढ आलिंगनाव्दारे त्यांना मुक्ती देणारे, आत्महिताच्या मार्गाने जाणाऱ्या (साधक-सिध्दादि ऋषी-मुनींना) आपला शोक प्रलापांव्दारे स्त्रीविषयक वैराग्य देणारे, कामांधाचे जन्ममृत्युभयप्रद चरित्र वा लीला करुन दाखविणारे राम आमचे रक्षण करोत.

(जन्म-मृत्युच्या) महाभयातून निवारण करणारे, कलिच्या मलरुप पापांना जाळणारे, भ्रमरुपी अज्ञान नाश करणारे, निज सुखाचा प्रकाश देणारे सूर्यच जणूं, मदन-शत्रू भगवान शंकरांना सुखदायक असे रामनाम हे मानवा (नित्य अखंड) स्मरण कर.

कुन्द पुष्पाप्रमाणे गौरवर्ण व नीलकमलाप्रमाणे सुंदर श्यामवर्ण, सर्व प्रकारचे बल, विज्ञान यांचे आगर, अत्यंत शोभायमान, श्रेष्ठ, धनुर्धर, वेदांनी प्रशंसिलेले गायी –ब्राह्मण समूह ज्यांना प्रिय आहेत असे, सद् (सत्य) धर्माचे वर्म सांभाळून सर्वहित करण्यासाठी, मायेने मानवी रुप धारण करून सीता शोधासाठी वनातील मार्गावरून तत्परतेने जाणारे हे दोघे रघुवंशी (लक्ष्मण व राम) आम्हाला भक्ती प्रदान करून आमचे रक्षण करोत.

ब्रह्मरुपी समुद्रातून निर्माण झालेले, कलि-मलांचा नाश करणारे, नित्य किंवा अविकारी, श्रीशंभूच्या मुखचंद्रात सदासर्वदा अत्यंत शोभायमान असणारे, संसार-रोगाचे औषध, सुखी करणारे, श्रीजानकीचे जीवन असलेले हे रामनाम रूपी अमृत जे सतत पितात ते (पुण्यवान) धन्य होत.

भूमीवरील मोक्ष-नगरी, ज्ञानाची खाण, पाप-नाशिनी, जेथे उमेसह शंभूंचा सतत निवास असतो अशी काशीनगरी सेव्य नाही असे होईल कां?

समस्त देव-समुदाय भयंकर विषाने जळत असता, तेच विष प्राशन करणारे असे कृपालु शंकरांसारखे दुसरे कोण आहे, मग हे मूर्ख मना, तू त्यांची भक्ती कां बरे करीत नाहीस?

रघुराय पंपा सरोवरापासून पुढे निघाले ते ऋष्यमूक पर्वताजवळ येऊन पोचले. त्या पर्वतावर आपल्या मंत्र्यांसह सुग्रीव रहात होता. त्याने ह्या दोन अतुलनीय बलशाली पुरुषांना दूरवरुन येत असताना पाहिले आणि भयभीत होऊन सुग्रीव हनुमानाला म्हणाले- "तूं बटुरुप घेऊन जा व मला खुणेने ते कोण आहेत ते सांग, त्यांचा हेतू काय आहे ते जाणून घे . वालिने पाठवलेले ते दोघे कपटी असतील तर ताबडतोब हाही पर्वत सोडून मी पळ काढीन." या आपल्या राजाच्या आज्ञेनुसार मंत्री हनुमान लगेच प्रौढब्राह्मण विप्रवराचे रुप घेऊन राम-लक्ष्मणांपुढे उभा राहिला. स्वत: विप्र असूनही त्या क्षत्रियांच्या दिव्य तेजास दिपून यानेच त्या दोघांना नमस्कार केला अगदी मस्तक नमवून, व विचारु लागला,

राम हनुमान संवाद –

"तुम्ही अत्यंत वीर असे राजबिंडे दोघे- एक सावळा व एक गोरा असे श्रेष्ठ दिसतां, तेव्हा तुम्ही कोण आहांत? हे स्वामी, या कठीण अशा भूमीवर आपल्या कोमल पद-कमलांनी आपण कां बरे विचरण करीत आहांत ? अत्यंत मृदु (मुलायम) मनोहर व सुंदर अशा आपल्या या देहाला ऊन-वारा-पाऊस यांचे दु:सह दु:ख या वनामध्ये (फिरताना) कां देत आहांत ? तुम्ही ब्रह्मा-विष्णु-महेश या त्रिदेवांपैकी कोण आहांत की तुम्ही नर व नारायण आहांत? कां या जगाचे (मूळ उपादान) कारण असणारे, या धरणीचा भार हरण करून तिला तारण्यासाठी अखिल ब्रह्मांडनायक मानव रुपाने अवतार घेऊन आला आहात की काय?"

त्यावर राम उत्तरतात – "कोसल देशाचे राजे दशरथ, त्यांचे आम्ही दोघे पुत्र आहोत. पित्याचे वचन पाळण्यासाठी या वनात आलो आहोत. माझे नांव राम, हा माझा बंधू- लक्ष्मण, आणि आमच्या बरोबर अत्यंत सुंदर-सुकुमार अशी माझी पत्नी वैदेही ही देखील होती, पण कोण्या राक्षसाने तिला पळवून नेली, म्हणून तिचा शोध घेण्यासाठी आम्ही असे वनात हिंडत आहोत. हे विप्रवरा ! आमचा सर्व परिचय व हकिकत आम्ही तुम्हांला सांगितली, तेव्हा तसा आपणही आपला परिचय द्यावा ही विनंती."

हे रामांचे बोलणे ऐकताच हनुमानाने हेच आपले प्रभु-स्वामी-नाथ हे ओळखले. त्याबरोबर प्रभुचरणांवर तो कोसळलाच. त्यावेळचे त्याचे ते सुख केवळ अनिर्वचनीय आहे. त्याचे अष्टसात्विक भाव उमलले. सर्व शरीर रोमांचित झाले, कंठ अवरुध्द झाला, त्याचवेळी प्रभूंची वल्कल-वस्त्रे व धनुष्य-बाण या सुंदर रुपाकडे हनुमान बघतच राहिले. मग कसाबसा धीर एकवटून हनुमंतांनी प्रभूंची स्तुती करण्यास प्रारंभ केला-

<u>हनुमानकृत स्तुती (चित्रा नक्षत्र स्तुती) –</u>

रामांच्या बाल्यावस्थेतपासूनच त्यांनी हनुमंताचा सेवक म्हणून स्वीकार केला होता. त्याची स्मृती जागी झाल्याने ते इथे प्रभूला 'निजनाथ' म्हणतात. त्यावेळी त्यांचा हर्ष हृदयाकाशात मावत नाही. तो अश्रूंवाटे बाहेर पडतो. म्हणून मग जुना प्रगाढसेवक-भाववश होऊन थोडेसे लटके भांडण आपल्या प्रभूशी करतात. बालक जसे खोटे खोटे आईला 'मी नाही बोलत जा' म्हणते नां, त्याच थाटात ! हे प्रभो, सचिव किंवा (सुग्रीव) राजाचा मंत्री या न्यायाने मी तुम्हाला ओळख विचारली. पण तुम्हीही (परब्रह्म असून ) एका अगदी सामान्य मानवाप्रमाणे मला असे काय प्रश्न विचारतां ? हे 'प्रभु' म्हणून योग्य आहे-शोभते कां ? तुमच्या मायापाशात गुरफटल्यामुळे मी तुम्हांला माझे स्वामी म्हणून ओळखले नाही. याचे कारण मी मायावश जीव बनल्यामुळे मूर्ख, कुटील, अज्ञानी बनलो. आणि आता त्यावर असे हे प्रश्न विचारून मला 'मूर्ख सम्राट' बनविणे आपल्याला साजेसे आहे कां हो ? मी जरी आपला दोषी, अपराधी (न ओळखल्याचा गुन्हा) असलो तरी हे नाथ हे माझे कर्तृत्व नव्हे, हे तुमच्याच मायेचे-विद्यामायेचे-आदिशक्तीचे कर्तृत्व बरें ! आणि यातून सुटका याला केवळ तुमची आणि तुमचीच 'कृपा' आवश्यक !'

परंतु हे रघुवीरा ! मी हे ही जाणून आहे की आपला सहवास सुटल्यापासून ना आपले पूजन स्मरण कांहीही केले नाही, हे अगदी शपथपूर्वक सांगतो. पण नवजात शिशु जसा सर्वस्वी मातेवर अवलंबून असतो तसा मी 'आपण कधी ना कधी भेटून कृपावर्षाव कराल' याच भरवंशावर मात्र जीव धरून तगून होतो आत्तापर्यंत. शिशु जसा तहान-भूक लागली तरी रडतो, प्रेमाने

आईने जवळ घेतले तरी रडतो,पण त्याचा रडण्याचा नेमका सूर आई जशी ओळखते तसे हे प्रभो ! हे रामाई ! हा तुमचा बालक तुमच्या दर्शन-अनुग्रह-कृपा आदिंच्या प्रेम पान्ह्यासाठी आसुसलेला, व्याकुळलेला, भुकेला- तहानला आहे. त्याला जवळ घेऊन तुमचा प्रेम पान्हा पाजून तृप्त करा. दूर लोटूं नका. बाळाने कितीही खोडकरपणा, खोडसाळपणा, हट्ट केला तरी त्याची आई त्याला दूर सारते कां ? मग हे माते ह्या बाळाला इतके दिवस लांब ठेवून जो दुरावा आहे तो लवकरात लवकर दूर कर. असे म्हणता म्हणता हनुमंताच्या अत्यंत सरळ-ऋजु-प्रेमभावामुळे त्यांचे विप्ररुप गळून पडले व कपिरुप प्रगट झाले. त्याबरोबर रामाई-रघुपतींनी त्यास आपल्या हृदयाशी धरून ठेवला इतकेच नव्हे तर त्याचेवर आपल्या प्रेमाश्रूंच्या अभिषेकांची संततधार धरली. (कारण हा शिवावतार असल्याने-अभिषेक प्रिय आहे हे ते कृपानाथ जाणून आहेत.)

यें हृदयीचे तें हृदयी (समग्र भक्तीरस ओतून) झाल्यानंतर राम हनुमंतास म्हणतात – कपि तूं मनाला काहीही लावून घेऊं नकोस. तूं मला लक्ष्मणापेक्षाही-त्याच्या दुप्पट – म्हणजेच अत्यंत प्रिय आहेस. ब्रह्म म्हणून सगळेजण जरी मला समदर्शी म्हणत असले तरीही मी थोडासा पक्षपात करतोच. कारण जो अनन्यगतिक असा सेवक असतो तो मला सर्वात प्रिय असतो. हे हनुमंता, अनन्यगतिकाची व्याख्या ऐक, **जो स्वतःला प्रभुसेवक समजून प्रत्येक जीवात (कणाकणांत) आपल्या प्रभुचेच, भगवंताचे रुप पाहतो (व तसे वागतो) तो अनन्यगति-सेवक होय.**

अशा प्रकारे आपल्या प्रभूला अतिप्रसन्न, आनंदित पाहताच हनुमंताचे सारे हृदयातले सल शांत झाले. मग हनुमंताने राम-लक्ष्मणांना आपल्या खांद्यावर बसवून आपल्या राजाकडे, सुग्रीवाकडे ऋषमूक पर्वत-शिखरावर नेले. सुग्रीवाची सीता-शोध कार्यात बहुमोल मदत होईल हे सांगून हनुमंताने त्यांच्याशी रामांना मैत्री करण्याची विनंती केली. आणि सुग्रीव व राम यांची एकमेकांना सर्व ओळख सांगून अग्निसाक्षीने दोघांची मैत्री कायमची दृढपक्की केली. मैत्रीचा अग्निसाक्ष संस्कार संपन्न होताच लक्ष्मणांनी सीताशोध घेत

उभयातां वनात फिरत आल्याचे सांगितले. त्याबरोबर सुग्रीवाला आठवले आणि त्याने 'आकाशमार्गे' रथातून जाताना विलाप करणाऱ्या स्त्रीने आपल्या एका वस्त्राच्या तुकड्यात कांहीसे बांधून 'हरि हरि' म्हणत फेकले होते, खरे ! ते वस्त्र व त्यात बांधलेली (अनसूयेने दिलेली दिव्य आभूषणे) सीतेचीच हे ओळखून राम ते वस्त्र अलंकार उराशी धरून अतिशय दु:ख करु लागले. तेव्हा सुग्रीवाने रामांना वचन दिले की 'सीता-शोध करून तुम्हां उभयतांची भेट घालून देण्याची सेवा मी मित्र या नात्याने करेन.'

## सुग्रीवाचे दु:ख –

त्यानंतर सुग्रीवाला रामांनी असे पर्वतावर राहण्याचे कारण विचारले. त्यावर सुग्रीव म्हणाला, नाथ ! मी व वाली हा माझा भाऊ, आमच्या दोघांत अतीव प्रीती होती. एकदा मय राक्षसाचा पुत्र मायावी अर्धरात्री आपल्या दाराशी येवून आव्हान देऊं लागला. ते आव्हान सहन न झाल्याने वाली त्याचेकडे धावताच तो दूर पळाला-वालीही त्याच्यामागे पळाला मग मीही. एका गुहेत तो राक्षस शिरताच वालीने मला बाहेर एक पंधरवडा वाट पहात रहा असे सांगून तो राक्षसामागे गुहेत गेला. मी एक महिनाभर तेथेच त्याची वाट पाहिली, त्यानंतर एक रक्ताची भली मोठी धार गुहेमधून बाहेर वहात आलेली पाहून, वाली महाबलशाली असा माझा भाऊ गेला असे वाटून मी राज्यात-किष्किंधेत परत आलो. येताना तो राक्षस पुन्हा येऊ नये म्हणून भल्या मोठ्या शीळेने त्या गुहेचे दार पक्के पूर्ण बंद केले. राज्यात येताच. माझे कांही ऐकून न घेता सर्व मंत्र्यांनी जबरीने मला 'राजा' बनविले. त्यानंतर काही दिवसांनी त्या राक्षसाला मारून वाली परत आला व 'मी राज्य बळकावले' असा त्याचा ग्रह झाल्याने त्याने माझी पत्नी व राज्य दोन्ही हिसकावून बेदम मारून मला हद्दपार करून हाकलवून लावले. त्यामुळे त्याच्या भयाने मी असा रानी-वनी-पर्वती भटकत राहतो. मतंग ऋषींच्या शापामुळे वाली केवळ या पर्वतावर येऊं शकत नाही म्हणून मी येथे तळ ठोकला आहे. तरीही वालीची भीती काही केल्या माझ्या मनातून मात्र जात नाही.

सुग्रीवाची ती दु:खद कथा व अवस्था ऐकून रामांच्याही डोळ्यात पाणी तरळले व ते म्हणाले, 'हे मित्रा, सख्या सुग्रीवा मी एकाच बाणाने वालीला मारून त्याच्या भयापासून तुला मुक्त करीन, अगदी ब्रह्मदेव-शंकर यांना शरण गेला तरीही ते देखील माझ्या बाणापासून त्याला वाचवूं शकणार नाहीत. अशी प्रतिज्ञा करून त्यांनी या निमित्ताने सुग्रीवास मित्रधर्म सांगायला सुरुवात केली.

मित्रधर्म –

मित्राचे दु:ख बघून ज्याला दु:ख होत नाही अशाचे मुख पाहणे हे सुध्दा पाप आहे. कारण उत्तम मित्र तोच की ज्याला मित्राचे धुळीकणाइतके क्षुल्लक दु:ख मेरुपर्वताप्रमाणे प्रचंड वाटते व त्यापुढे आपले पर्वतप्राय दु:ख क्षूद्र रज:कणासमान भासते. अशी ज्यांची निसर्गत:च मित्रहितकारी बुध्दि नसते, ते लबाड मग मैत्री तरी कशाला करतात ? आपला मित्र चुकून मार्गभ्रष्ट होऊन वाईट मार्गास लागला तर त्याला सन्मार्गाला लावण्याचे काम-कर्तव्य, आद्य कर्तव्य मित्राचे आहे. एकांतात त्याच्या एखाद्या दोष वा अवगुणांमुळे तो बिघडत असेल तर त्यास सावध करणे ह्याला खरा मित्र म्हणतात. आणि आपल्या मित्राच्या उत्तम गुणांचा परिचय, सन्मान सर्वांना समाजात जो करून देतो तो आदर्श मित्र होय. मित्राला कोणत्याही प्रकारची मदत केव्हाही एका क्षणाचा विलंब न लावता जो करतो तो उत्तम जिवलग होय. कोणाही प्रकारे आपल्या मित्राचे हित-कल्याण कसे होईल हे जाणून, त्याच्या संकट वा दु:खाचे काळी जो नेहमीपेक्षा शेकडो पटींनी प्रेम करतो, त्याचे नैराश्य दूर करतो, त्याला धीर देतो त्याला सच्चा मित्र म्हणावे असे वेदसुध्दा सांगतात.

याउलट जे मित्राच्या तोंडावर फक्त गोड गोड बोलून त्याचे मागे त्याच्या अहिताचे कट-कारस्थान रचतात त्यांना सापासारखे कुटिल समजून त्यांचा त्याग करावा. कारण लबाड नोकर, कंजूष राजा, चारित्र्यहीन स्त्री, आणि कपटी मित्र हे चौघेही सतत भाल्याचे टोक टोचत रहावे तसे सतत त्रास देत राहतात, तेव्हा अशांचा त्याग करणेच शहाणपणा आहे. हे सख्या, तुझ्या सर्व चिंता, काळज्या तूं आता माझ्यावर सोपव, आणि निश्चिंत हो. तुझे सर्व इच्छित कार्य लवकरच पूर्ण होईल.

पण वालीचा धिप्पाड देह व त्याचे बळ सुग्रीवाने चाखलेले असल्याने नुसत्या या शब्दांनी सुग्रीवाला रामांचा विश्वास वाटेना. ते ओळखून रामांनी दुंदुभी राक्षसाच्या हाडांचा भला मोठा ढीग एका लाथेने सहज दूर उडवून लावला. आणि एकाच रेषेतील सात ताल वृक्ष एकाच बाणाने छेदून दाखविले. तेव्हा सुग्रीवाला राम-सामर्थ्याची प्रतीती पटली. अन् या प्रतीतीमुळे त्याचे रामांवरचे प्रेम खऱ्या अर्थाने वाढीस लागले. कारण राम आपले पूर्णतः संरक्षक व संकटनाशक व सुखदायक आहेत याची खात्री पटली. त्यामुळे सुग्रीवाने रामांना प्रेमभराने नमस्कार करताच रामांनी आपला कृपाहस्त त्याच्या मस्तकावर ठेवला अन् आश्चर्य, विषयी-विरही सुग्रीव, एकदम ज्ञानी बनला !

## सुग्रीवाचे (क्षणिक) ज्ञान –

हे प्रभो, मोठेपणा, (सत्ता), सुख परिवार संपत्ती या सर्वांचा त्याग करुन मी आपली सेवा करेन. कारण ह्या साऱ्या गोष्टी रामभक्तीत बाधा आणतात. सर्व संत एकमुखाने तुमच्या पदकमलांची आराधना करावी असाच उपदेश देतात. शत्रू-मित्र, सुख-दुःख इ. व्दंव्दांनी भरलेले हे जग ही माया आहे. पण एकदा कां तुमच्या पदकमलांच्या प्रीतीचा-परमार्थ जुळला की ही कोणतीही व्दंव्दे आड येत नाहीत. वालीने माझा त्याग केला हा जणूं मला प्रसाद रूपच बनला. कारण त्यामुळे तुमचे दर्शन-भेट-मैत्री-उपदेश सारे सारे मिळाले. त्यामुळे माझे सर्व दुःख दूर झाले. स्वप्नातही वालीशी युध्द झाले तरी जागे होताच लाज वाटावी असे त्याचे सतत सलणारे दुःख तुमच्यामुळे संपेलच. तेव्हा हे प्रभो, आणखी एक कृपा करा की हा सारा वैरभाव, स्त्री-आसक्ती राज्य मोह इ. सर्व सोडून रात्रं-दिवस तुमच्या भक्तीतच हे जीवन आता इथून पुढे व्यतीत व्हावे.

ही सुग्रीवाची वैराग्याची भाषा ऐकून रामांनी स्मित केले व आपण हाती धनुष्य-बाण घेऊन सुग्रीवासह तेथून वालीकडे निघाले. वालीला आव्हान देण्यास प्रभूंनी सांगितले. त्यानुसार सुग्रीवाची आव्हान गर्जना ऐकून वालीपत्नी तारा वालीला सावध करते पण तिला न जुमानता वाली सुग्रीवास एका बुक्कीतच जेरीस आणतो व पळवून लावतो. वाली सुग्रीव एकसारखे असल्याने

प्रभु एक पुष्पमाला सुग्रीवाच्या गळ्यात खुणेसाठी घालून त्याला वालीशी लढायला पाठवतात व एका झाडाआडून बाण मारून विध्द करतात. वरवर बोलताना वाली रामांना कठोर-बोचरे बोलतो पण अंत:करणातून रामांचे परब्रह्मत्व जाणून त्यांना नमन करून, शरण जाऊन त्यांच्याकडे आपला पुत्र अंगदास सोपवून प्रभु-दर्शन करता करता विना-सायास प्राण सोडून वैकुंठास जातो. त्याच्या मृत्यूनंतर परम व्याकुळ होणाऱ्या त्याच्या पत्नीस, तारेस, राम सूत्रबध्द पण अत्यंत मोलाचा सुंदर उपदेश करतात. ते म्हणतात- 'पृथ्वी-आप-तेज-वायु-आकाश' या पंचमहाभूतांपासून बनलेले हे शरीर त्यातला ईश्वरी अंश चैतन्य गेल्यामुळे अत्यंत अधम हीन झाला आहे. तो जीव तर सच्चिदानंद-शिवस्वरुप आहे व तो नित्य आहे. त्याने फक्त आपली खोळ बदलली इतकेच, हे शरीर तर झोपल्याप्रमाणे तुझ्यासमोरच पडले आहे मग तूं रडतेस कोणासाठी? शरीरासाठी? शरीर तुझ्यासमोरच आहे त्यामुळे त्यासाठी, नश्वरासाठी रडणे व्यर्थ, आणि त्यातला चैतन्यतत्व 'जीव' हा तर नित्य, अमर आहे. मग त्यासाठीही रडणे व्यर्थ. असे केवळ शब्दांव्दारे त्या प्रज्ञावंत तारेस ते ब्रह्मज्ञान मिळताच तिचा शोक नष्ट झाला व तिने भगवंतांकडून परमभक्ती मागून घेतली. त्यानंतर सुग्रीव-अंगदाकडून वालीचे सर्व अंत्यसंस्कार यथाविधी करून घेतले. सुग्रीवास राजा व अंगदास युवराज बनविले. राम-लक्ष्मणांनी सुग्रीवाला दोन महिने राज्य व स्त्री भोगार्थ किष्किंधेत पाठविले व आपण उभयतां प्रवर्षण पर्वताच्या गुहेत वर्षा ऋतूचे दोन महिने स्वस्थ शांत राहिले.

## रामस्पर्शित वनाची सुंदरता –

वाली सारख्या दुर्जनाचा नि:पात होताच त्या वनाला आपले पूर्वीचे सौंदर्य जणूं नव्याने प्राप्त झाले. सर्वत्र सुंदर सुंदर रंगी-बेरंगी सुगंधी फुले फुलली. त्यावर भुंग्यांचे थवे गुंजारव करू लागले. बहरलेले फळ-फुलांनी लगडलेले वृक्ष सारी सृष्टी हिरवीगार, संपन्न दिसू लागली. प्रवर्षण-पर्वतही प्रभुस्पर्शाने एक आगळ्या वेगळ्या तऱ्हेने शोभिवंत दिसू लागला. प्रभु अवतारापूर्वीच्या ब्रह्मदेवाच्या अनुज्ञेने तेथल्या साऱ्या निसर्गाचे रूप (पर्वत-झाडे-वेली-पशु-पक्षी) देवांनीच धारण केलेले असल्याने सर्वच सौंदर्याला असा

दिव्यत्वाचा स्पर्श झालेला जाणवत होता. निर्भय बनलेले सिध्द, ऋषी-मुनी तेथे येऊन प्रभूंची सेवा करूं लागले. लक्ष्मणांसह रामांची चर्चा भक्ती, वैराग्य, विवेक, राजनीती इ. उत्तरोत्तर रंगू लागली.

वर्षा ऋतू वर्णन – संपूर्ण आकाश ढगांनी व्यापून गेले आहे. मेघांच्या गडगडाटाने आसमंत भरून गेला आहे. (धर्माने वागणारा) वैराग्ययुक्त गृहस्थ हरिभक्ताला पाहून जसा आनंदित होतो, तसे हे मोरांचे थवे पाण्याने भरलेल्या काळ्या ढगांना पाहून आनंदाने नाचत आहेत. नभांच्या ह्या घोर गर्जनेने माझ्यासारखा धीरोदात्त ही मनातून घाबरतो तर सीतेची, प्रियेची अवस्था काय होत असेल ? दुष्टाचं प्रेम कायम टिकणारं स्थिर नसतं तशी ही ढगात चमकणारी बिजलीची चमक चंचल आहे. पाणी घेऊन येणारे हे मेघ अगदी भूमीपर्यंत येतात. म्हणजे ज्ञानी जसे विनयाने नम्र होतात तसेच हे नम्र झालेले दिसताहेत. पावसाचे थेंब प्रथम पर्वतशिखरावर आघात करतात. संतांनी दुष्टांची कठोर निंदा आनंदाने सहन करावी तसे हे पर्वत हा बिंदुघात सोसताहेत. अल्प धनाने जसे दुष्ट माजतात तशा या क्षुद्र (फक्त पावसाळी ) नद्या या थोड्याशा पावसानेही धों धों आवाज करीत वहात आहेत. पाणी मेघात असते तोवर शुध्द पण भूमीचा स्पर्श होताच, त्या मातीने पाणी गढूळ, मातकट बनते. **मूळचा शुध्द जीव मायेच्या वेष्टनात (देहाच्या उपाधीत) जखडला की जसा अशुध्द होतो** तसेच तलाव, सरोवरे इ. या पावसाच्या पाण्याने हळूहळू भरूं लागतात जसे सज्जनांत हळूहळू सदगुणांची दाटी वाढतच जाते. नदी सागराला जाऊन मिळताच जशी शांत तृप्त होते तसेच हा जीव जेव्हा ब्रह्मात मिसळतो तेव्हा असाच शांत-तृप्ततेने तेथे स्थिरावतो. त्या भूमीने हिरवागार शालू परिधान केला आहे. हा घनदाट असल्याने साऱ्या वाटा-पायवाटा ह्या हिरव्या गवतात लपून गेल्या आहेत जसे पाखंडी (दंभी वा नास्तिक) लोकांच्या व्यर्थ कुतर्कवादाने सद्ग्रंथ लोप पावतात. चहूंकडे बेडकांचा डराव डराव ध्वनी उठतो आहे. जणूं काही एका मागोमाग एकेका बटूंनी (नव्याने) वेद पठणाचे धडे गिरवावेत असेच वाटते आहे. साऱ्या वृक्षांना हिरवीगार नवीन पालवी फुटली आहे. जणूं साधकाच्या मनाला विवेकाचे नवनवीन धुमारे फुटावेत असे वाटते आहे. रुई, मांदार, धमासा यांची पाने पावसाने गळावीत तसे उत्तम राज्यात दुष्टांचे उद्योग

गळून जातात. पावसाळ्यात जसा धुळीला कोठेही थारा नसतो, तसेच राग (क्रोध-रोष) आला की सारी धार्मिक वृत्ती, धर्म यांना थारा रहात नाही. दानी, परोपकारी माणसाचे वैभव जसे त्याला शोभून दिसते, तसे ही धरणी सुजलां सुफलां बनून शोभिवंत दिसूं लागली आहे. दांभिकजनांचे समूहच्या समूह एकत्र यावेत तसे हे काजवे काळ्याकुट्ट घनदाट रात्रीत चमकत आहेत. स्त्री स्वतंत्र (एकटी) राहील्यानंतर जशी भ्रष्ट होते, बिघडते तसे अतिवृष्टीने शेतातले बांध फुटून विखरत आहेत. शेतकऱ्यांनी खुरपणी करून शेतातले तण काढून टाकावे तसे हे ज्ञानीजन आपल्या मनात उगवणारे मान मद इ. तण वारंवार काढून फेकून देतात. ओसाड भूमीवर कितीही पाऊस पडला तरी तेथे गवतसुध्दा उगवत नाही तसे भक्तजनाच्या मनात काम, इच्छा, वासना उगवतच नाहीत. प्रजेला उत्तम राजा मिळताच त्याची जशी भरभराट होते, तसे पावसामुळे या भूमीवर अनेक प्रकारचे जीव-जंतू अगदी भरून गेले आहेत. पावसाळ्यामुळे जसे प्रवासी जागोजाग वस्ती करून थांबून राहिले आहेत तसे ज्ञान होताच इंद्रियांची बाह्यात्कारी धांव तिथल्या तिथे थांबते (थोपून राहते.). सोसाट्याचा वारा जसा ढगांना जिकडे तिकडे पळवतो, तसे कुपुत्र निपजला तर तो अपकृत्यांनी कुल सद्धर्माचा नाश करून टाकतो. पावसाळ्यात जसे दिवसा ढगांमुळे दाट काळोख पसरावा तर दुसरेच क्षणी सूर्य प्रगट होऊन स्वच्छ प्रकाश पडावा तसे सुसंगात ज्ञानाचा प्रकाश पडतो व तोच जीव कु-संगात राहील तर तेथे ज्ञानाचाही नाश होऊन तो वाम-मार्गाने जाऊं लागतो.

## शरद ऋतु वर्णन –

काश गवताच्या पांढऱ्याशुभ्र तुऱ्यांनी ज्याअर्थी सारी पृथ्वी झाकाळून टाकली आहे त्याअर्थी वर्षाऋतू संपून शरद ऋतूचा प्रारंभ झाला आहे. सूर्याच्या तापाने शरदागमनावर जणूं शिक्कामोर्तब केले आहे. रस्त्यातले साचलेले पाणी पूर्णपणे शोषल्याने रस्ते कोरडे बनले आहेत. जसे मनात संतोषाचे आगमन झाले की लोभाला जागाच रहात नाही. नद्या-तलावांचे पाणी आता अगदी शुध्द बनले आहे. जणूं संतमन मद-मोहरहित होऊन स्वच्छ असावे तसे. आता हे पाणी हळू हळू सुकत चालले आहे. जसे ज्ञानीजन आपल्या मनातून आसक्ति काढून टाकतात तसे. योग्यवेळी सुपुण्ये फळाला यावीत त्याप्रमाणे शरदाचा

योग्य काळ जाणून खंजन पक्षी झाडाकडे येत आहेत. नीतीमान राजाची कृती (राज्यकारभार) अशी शोभायमान असते तशी ही धरणी छान शोभून दिसते आहे कारण आता ना धूळ ना चिखल. मूर्ख गृहस्थ (सकुटुंब) जसा धनहीन असतो, तसे (नद्या तळी इ) जलहीन होत चालल्याने मासे व्याकूळ होत आहेत. वर जिकडे पहावे तिकडे आकाश मात्र स्वच्छ, निरभ्र दिसत आहे. जसा भक्त सर्व आशा सोडून ईश्वरभक्तीत सुंदर दिसतो तसे. कोट्यवधी जनांमध्ये जसा एखादाच कुणी माझी भक्ती करतो तसे शरद ऋतूत क्वचित केव्हातरी तुरळक थोडासा पाऊस पडतो. शरदासारखा उत्तम ऋतू जाणून अनेक हेतूस्तव वेगवेगळे लोक प्रवासाला बाहेर पडू लागले, राजे-सीमोल्लंघनास, तापसी-तपश्चर्या-यात्रा इ. साठी, व्यापारी-व्यापारासाठी आणि भिकारी. जणूं हरिभक्तीची प्राप्ती होताच चारी आश्रमातील व्यक्तींनी आशांचा त्याग करावा तसे. खोल सरोवरातले मासे मात्र भरपूर पाण्यामुळे असे सुखी आहेत की हरिशरणागतास जसे भगवंतांनी सर्व संकटे हरण करुन सुखी करावे तसे. **अशा सखोल सरोवरात कमळांचे ताटवेच्या ताटवे फुलून ते सुंदर दिसावे, कसे तर निर्गुण ब्रह्म सगुण रुपात जसे अत्यंत मनोहारी दिसते तसे.** त्या कमळांवर मधाच्या आशेने भुंग्यांचे थवेच्या थवे झेपावून त्यांचा नाद-गुंजारवही आसमंतास नादमाधुरी देतो. शरदांच्या सुंदर रात्री चक्रवाकांना मात्र दुःखद ठरतात जसे दुष्टांना पर-संपत्ती पाहून दुःख होते. चातकाचे एकसारखे रटणे, तहानेने अति व्याकुळ झाल्याचे जाणवत आहे, शिवद्रोह्याला कधीही शान्ती लाभत नाही तसे. शरदाच्या चटकणाऱ्या उन्हाचा त्रास जसा चंद्रकिरणांनी रात्री शमतो तसे संतदर्शन सर्व पापांपासून निवारण करते. भगवंताच्या दर्शनाने भगवद्भक्त जसा परम आनंदी, संतोषित होतो तसे चंद्राला पाहून चकोरांचे थवे तृप्त होत आहेत. थंडीच्या कडाक्याने जसे डास इ. नाश पावतात तसे ब्राह्मण-द्रोह कुळांचा नाश करतो. पावसाळ्यातले क्षुद्र कृमी कीटकांचे समुदाय शरदात जसे नष्ट होतात तसे भ्रम-तर्क-संशय-शंका इ. चे समुदाय सद्गुरु मिळताच नाश पावतात.

पूर्ण दोन ऋतूंचा चातुर्मास संपत आला तरी सुग्रीव आपल्या राज्य व स्त्री भोग-कोषातून बाहेर येत नाही. भोग-लालसांपुढे सीता-शोधाचे मित्रकार्य

तो विसरला बहुतेक, असे रामांनी लक्ष्मणांस सांगून त्यास भीती दाखवून पण समजावून स्मरण देण्यास सांगून पाठवले.

तर तिकडे हनुमानांना सीता-शोधाची सुग्रीवांकडून काहीच हालचाल नाही याबद्दल एक उत्तम सचिव व रामसेवक या नात्याने काळजी वाटू लागली. सुग्रीवाला मग हनुमंतांनी साम-दाम-दंड-भेद आणि तथ्य-सत्य-पथ्य-प्रिय या चारही प्रकारांनी समजावून राम-प्रभाव जाणवून तत्काळ सीता-शोधार्थ कपि-सैन्याच्या तुकड्या पाठविणेस सांगितले. त्याप्रमाणे कार्यवाही होते न होते तोंच लक्ष्मण भिवया चढलेले, रागाने लालीलाल होऊन धनुष्यावर बाण चढवून सुग्रीवाकडे येताना हनुमानाने पाहिले. या बाणाने सारी किष्किंधा जाळून टाकतो असे त्यांचे रागारागातले बोल ऐकून प्रथम अंगद व हनुमान नंतर तारा हात जोडून त्यांचे पुढे आले व राम किर्तींचे सुंदर गान करून, लक्ष्मणांचे नगरीत यथार्थ स्वागत-पाद-प्रक्षालन इ. केले व सुग्रीवाने क्षमा मागून सीता-शोध कार्य सुरु केल्याचे सांगितले अन् सारेजण रामांसमोर हजर झाले.

सुग्रीवाची रामांना विनवणी –

**विषयी जीव प्रत्यक्ष भगवंत-दर्शन-स्पर्श लाभूनही कसा विषयात पुनः रममाण होतो याचेच प्रतीक म्हणजे सुग्रीव होय.** रामांच्या पायावर डोके टेकवून, हात जोडून सुग्रीव म्हणतो- ‘‘हे नाथ! यात काहीही दोष, अपराध वा गुन्हा माझा नाही. कारण देवा, आपल्याच प्रबळ मायेचा हा सारा प्रभाव आहे. त्यातून सुटण्याचा एकमेव उपाय म्हणजे आपली कृपा ! या जगांत देव-मानव-मुनी सारेचजण विषयांना वश होऊन, त्यांचे गुलाम होऊन राहतात. हे स्वामी ! मी तर अत्यंत क्षुद्र असा पशु. माकड असल्याने अति कामुक बनलो. हे प्रभो, जो स्त्री मोहात अडकत नाही, क्रोध रुपी घोर अज्ञान-निद्रेच्या रात्रीतून जागा होतो, ज्याच्या गळ्याला लोभाचा पाश (फास) लागला नाही असा काम-क्रोध-लोभ जिंकणारा तुमच्यासारखा कोण बरे मानव आहे ? कोणीही नाही. तेव्हा असे हे काम-क्रोध लोभाचे नष्ट होणे कित्येक साधनांनी, प्रयत्नांनी साधणारे नाही तर हे रघुराया तुम्ही त्या जीवावर दया-करुणा केली तर तुमच्या कृपेने तो जीव असा गुणी बनू शकेल, अन्यथा नाही; नाहीच !

त्यावर रामप्रभु हसले व त्याला म्हणाले, (प्रभु दर्शन होताच सुग्रीवांचा स्त्रीमोह, राज्यलोभ गळून पडला (म्हणून हसले). हे सुग्रीवा, तू मला भरतासारखा प्रिय आहेस. आता मात्र मनापासून सर्व प्रकारे कसून प्रयत्नांना सुरुवात कर की जेणे करुन लवकरात लवकर सीतेचा शोध लागेल. हा दोघांचा संवाद सुरु असतानाच सर्वही दिशांकडून वानरांच्या झुंडीच्या झुंडी तेथे आल्या. ते भव्य-अफाट असे वानर सैन्य होते. राम प्रभूंनी क्षणभर विश्वरुप धारण करुन प्रत्येक कपिपुढे प्रगट होऊन त्यास त्याचे कुशल विचारले. तोच सर्वांसाठी सुग्रीवाने घोषणा केली, जे या रामकार्यात सहभागी होतील, त्यांचे माझ्यावर अनंत उपकार होतील. तेव्हा चारही दिशांना हे वानर समूहांनो तुम्ही जा आणि सीता-शोध घेऊन एका महिन्यात मला येऊन वृत्तांत सांगा. (do the work and report हा मिलीटरी खाक्याच आहे.) जे या मुदतीनंतर येतील त्यांना नाईलाजाने मला मारणे भाग पडेल हे लक्षात ठेवा. ही आपल्या राजाची आज्ञा ऐकून सर्व वानर सर्व दिशांना पांगले.

पैकी दक्षिण दिशेकडे कूच करणारी विशेष तुकडी होती. त्यात होते हनुमान, अंगद, नल, नील, व जांबुवान. हे सगळे बुध्दिमान, धीर व सुजाण असल्याने सुग्रीव त्यांना विशेष महत्वपूर्ण जाणून, त्यांचेकडून काम होणार या आत्मविश्वासाने त्यांना सुग्रीवाने राजाच्या भूमिकेतून विशेष उपदेश केला.

सुग्रीव गीता –

तन-मन-वचनपूर्वक अथक प्रयत्न करुन तुम्ही सर्वांनी रामचंद्रांचे कार्य तडीस न्यावे; सफल करावे. ऊन-वारा-पाऊस यांची कसलीही तमा न बाळगता हे कार्य करावे. छल-कपट रहित होऊन हे स्वामीकार्य जीव ओतून करावे. या कार्यात स्वामी माझा सर्वस्वी पाठीराखा आहे हे समजून हे काम-रामसेवा समजून करावे. या कार्यामध्ये विघ्नरुपाने येणाऱ्या सर्व मायांचा त्याग करुन, मायाजनित दु:खांपासून सर्वथैव दूर राहून ही स्वामी सेवा करावी. हे बंधो, **समस्त कामनारहित होऊन रामांची सेवा करण्यासाठीच हा देह आहे हे जाणावे. अशी परिपूर्णतेने जो ही सेवा करेल, तोच खरा गुणवान, तोच भाग्यवान होईल.** आणि इथून पुढे त्याची ही रामचरणांची प्रीती अखंड

वाढतच राहील. त्यानंतर सर्वांनी सुग्रीव व रामांना नमस्कार केला व त्यांचेच (रामांचेच) स्मरण करीत सारे आनंदाने रवाना झाले.

रामांचा हनुमानांस विशेष निरोप –

सर्वांत शेवटी हनुमानाने रामांना नमस्कार करताच रामांनी त्यास जवळ बोलावून घेतले. प्रेमाने त्याच्या मस्तकावरून आपला करकमल फिरवला व हा आपला दास सेवक आहे (हाच नक्की सीतेला शोधून काढणार हे जाणून) त्याचे हाती अंगठी दिली, व राम म्हणाले – विविध प्रकाराने सीतेचे सांत्वन कर आणि माझे बल (सामर्थ्य-वानरसेनेने वाढलेले) सांगून माझी विरह व्यथाही तिला सांग आणि त्वरेने (परत फिरून मला सर्व सांग) ये. रामांनी आपल्याला खास सेवा दिल्याबद्दल हनुमानास आपला जन्म सुफल झालासे वाटले. कृपानिधान रामप्रभुंना आपल्या हृदय-सिंहासनावर नव्याने अधिष्ठित करुन ते या कार्यासाठी निघाले.

ही विशेष तुकडी दक्षिण दिशेस रवाना झाली. सारी वने, पर्वत, गुहा, असा सारा प्रदेश त्यांनी पिंजून काढला. त्यावेळी मार्गात आड आलेल्या राक्षसांना एकेका थपडेत यमसदनास पाठवले तर कुणी कुणी ऋषी-मुनी भेटताच त्यांना घेरा घालून सीतेबद्दल माहिती विचारीत. अशा प्रकारे शोध घेण्याच्या या राम-कार्यात ते आपली तहान-भूक, देह-ममता पार विसरुन गेले. त्यानंतर बऱ्याच काळाने असा कित्येक मैलोन मैल ओसाड उजाड प्रदेश उन्हाने रुक्ष झालेला पाहताच त्यांना तहानेची जाणीव झाली पण आसपास कुठेही पाणी दिसेना. पाण्याविना सर्वांची अगदी प्राण जाण्याची वेळ आल्याचे पाहून हनुमान तेथील एका उंच शिखरावर चढले व चारी दिशांच्या पर्वतरांगा पाहता पाहता, एके ठिकाणी त्यांना अनेक प्रकारचे पक्षी खाली विवरात जाऊन वर येताना तृप्त व पाण्याने भिजलेले पंख असे दिसले. ते सर्वांना घेऊन त्या जागी गेले व त्या गुहेत किंवा त्या विवरात सर्वात पुढे होऊन हनुमंताने प्रवेश करताच सारे त्यांच्या मागून गेले. बराच वेळ चालल्यानंतर त्या विवरातच एक सुंदर उपवन, मध्यभागी सरोवर, त्या सरोवरात अनेक कमळे फुललेली असे सुरेख रमणीय दृश्य दिसले. सरोवराशेजारील एका मनोहर मंदिरात एक

तेज:पुंज स्त्री स्वत: ध्यान-तपस्या मग्न अशी दिसली. त्या सर्वांनी तिला दुरूनच प्रणाम केला व सारे तिथे का व कसे आले ते सविस्तर तिला सांगितले. तिच्या परवानगीने त्यांनी त्या सरोवरात स्नान करून तिथली मधुर फळे खाऊन, पाणी पिऊन ते तृप्त झाले. व तिने आपले पूर्ववृत्तानुसार वानर-सहकार्य परिपूर्ण होताच रघुनाथाकडे जाण्यासाठी ती निघाली. रामाज्ञेनुसार ती 'स्वयंप्रभा' बद्रिनाथला राम-चरण कमलांचे ध्यान हृदयात करीत प्रभूंनी दिलेल्या अनपायिनी भक्तीत मग्न होऊन राहिली.

जाण्यापूर्वी तिने सर्व वानरांना डोळे मिटून घेणेस सांगितले होते. त्यानुसार डोळे मिटून परत उघडताच ती तपस्विनी स्वयंप्रभा हिच्या तप: स्थलीहून ते सारे एका क्षणात सागरतीरावर पोचले. (हे तिचे तप:सामर्थ्य !).

दृष्टीच्या पैलतीरापर्यंत पोचणारा तो भला मोठा सागर सुमारे १०० योजनांचा विस्तीर्ण असा पाहून सारे वानर चिंताग्रस्त झाले. हा पार करून जाणे व सीता-शोध लावणे अशक्य वाटू लागले. शोध-कार्य अपुरे करुन परत जावे तर सुग्रीवाकडून मारले जाणार. तेव्हा इकडे सागर तिकडे मृत्यु अशी त्यांची व्दिधा अवस्था झाली. रामकार्यात आपण परिपूर्ण होत नाही या विचाराने ते फारच दु:खी झाले. सारेजण दर्भ पसरून त्यावर जांबुवंतांचा उपदेश ऐकत एकीकडे वैफल्यामुळे अश्रू गाळत बसले. जांबुवंतांनी रामांच्या ब्रह्मत्वाचे मर्म सर्वांना स्पष्ट करुन सांगितले.

तोच जवळच्या एका पर्वत गुहेतून 'संपाती' नावाचे एक महाकाय गिधाड त्यांचे समोर त्या सर्वांना खाण्यासाठी जवळ येवू लागले. ते पाहून अंगदाने जटायूची अदभूत करणी व रामांनी त्यावर केलेली कृपा यांचे वर्णन प्रसंगावधान राखून सुरु केले. **जटायूसारखा राम-कार्यात आपला देह समर्पण करणारा महाभाग्यवान दुसरा कोणी नाही** इ. ते ऐकताच संपातीने त्या सर्वांना अभय-दान देऊन जटायूची सर्व हकीकत त्यांचेकडून सविस्तर ऐकली, व आपल्या धाकट्या भावास तिलांजली देऊन त्याची क्रिया इ. केली. 'चंद्रमा' मुनींच्या उपदेशानुसार संपातीने वानरांना सीता रावणाच्या लंकेतील अशोकवनात अशोक वृक्षाखाली दु:खाश्रू ढाळित आहे असा नेमका सीतेचा

पत्ता सांगितला.

पण हा शंभर योजने सागर ओलांडून सीतेचा निरोप घेऊन परत येण्यास समर्थ कोण- अशी चर्चा चालू झाली. जांबुवान वृध्द म्हणून, नल-नील केवळ शिल्पज्ञ, अंगद अल्पशक्तिमान, असे शोधमोहिमवीर एकेक बाद ठरले. तर हनुमान सर्व समर्थ असूनही एका कोपऱ्यात शांतपणे ध्यान-जप-मग्न बसलेला पाहून जांबुवंतांनी त्यास त्याच्या शक्तिचे, त्याच्या जन्माचे रहस्य उलगडून स्मरण करविले. जांबुवान म्हणतात – हे हनुमाना, समस्त वानर-सेनेचा नायक म्हणून सीतेपर्यंत जाण्यास तुम्ही सर्वथैव समर्थ आहांत. प्रत्यक्ष वायुचा पुत्र असल्याने वायुचे अपार बल तुमच्यात आहे. शिवाय या शारीरिक बलासमवेत अनेक देव-ॠषी-मुनींच्या वरदानाने प्राप्त अशी विवेकपूर्ण बुध्दी, विशेष ज्ञान यांचे भांडारच आहांत. शिवाय रामकार्यासाठीच हा तुमचा अवतार असल्याने या जगात असे कोणते कार्य आहे की ते तुम्ही करुं शकणारं नाही ! तुम्हांला अशक्य असे (कितीही कठीण असले तरी) कोणतेही कार्य नाही! हे केवळ जांबुवंतांचे प्रेरक शब्द ऐकले मात्र ..........

हनुमानाचा देह आपोआपच 'वाढता वाढता वाढे भेदिले शून्य मंडळा' यानुसार बल व तेज:पुंज असा जणूं सोन्याचा भला मोठा पर्वत असावा असा दिसूं लागला. ते सामर्थ्य त्यांना स्वस्थ बसू देईना, वारंवार सिंहासारख्या डरकाळ्या-बुभु:कार ते करु लागले व म्हणाले अगदी सहज खेळात उडी मारावी तसे हा सागर मी पार करीन. रावणाला मारूंन टाकून, संपूर्ण त्रिकूट पर्वतच (ज्याच्यावर लंका वसली आहे) उपटून आणतो. तेव्हा हे तात्, (जांबुवंता), यापैकी नेमके मी काय, कोणते काम करूं याबद्दल आपण मला उपदेशपर मार्गदर्शन करा.

त्यावर ज्ञान-वय-तपोवृध्द जांबुवंत हनुमानांना सांगतात, ''बाळा, वत्सा, सीतेला भेटून रामांनी दिलेली खुणेची अंगठी तिला देऊन तिचा निरोप

फक्त घेऊन या. बस्स इतकेच करायचे आहे". स्वतःच्या बाहुबलावर रावणाला मारण्याचे काम नंतर रघुवीर सहजी करतील, कौतुक म्हणून. आपल्या कपि-सेनेलाही त्या युध्द-कार्यात मग भाग घेता येईल. अशा रीतीने वानर-सेनेसह राम सर्व निशाचरांचा नाश करुन सीतेला परत आणतील व त्यांचे हे त्रैलोक्य-पावन करणारे यश व किर्ती देव-मुनी-नारदादिक सारे सारे गातील व ते ऐकून, गाऊन, समजून सामान्य मानव-तुलसीदासांसारखे रघुवीर-पदांच्या अनन्य भक्तीच्या शिदोरीच्या सहाय्याने या परमार्थ पथाने अंती- 'परम-पद' परम विश्रांती मिळवतील.

## किष्किंधा कांड-फलश्रुती –

रघुनाथांचे असे त्रिभुवन यश जे स्त्री-पुरुष ऐकतील त्यांच्या भव-रोगाचे हे औषध ठरेल आणि त्यांचे सर्व मनोरथ त्रिपुरारी (भगवान शंकर) पूर्ण करतील.

म्हणून नीलकमलाप्रमाणे श्यामवर्णी कांतीच्या कोट्यवधी मदनांहूनही अधिक सुंदर शोभायमान असा श्रीरामांचे गुण-समूह (सतत) ऐकावेत. तसेच त्यांचे 'नाम' ही पापरूपी पक्ष्यांचे (रवरुपी आकाश-विचारातील) पापांचे नाशक असे 'रामनाम' सतत कानी पडावे.

॥ चतुर्थ सोपान किष्किंधा कांड समाप्त ॥

# सुन्दरकाण्ड (कांची मोक्षपुरी)

मंगलाचरण –

१) श्रीरामचंद्र स्वत: ज्याच्या ऋणातून उत्तीर्ण होऊ शकले नाहीत, भक्तांमध्ये अग्रगण्य असे , दुष्ट समूहांचे विनाशक-विध्वंसक, संसार सागर पार करण्याचा निश्चय झालेल्यांना सहाय्यकारी, वानरांचे मृत्युभयातून प्राण वाचविणारे, अंजनीपुत्र वायुसुत कपीश्वर-हनुमान यांना मी वंदन करतो.

२) ज्यांच्या (कृपा) अनुग्रहरुपी सूर्य किरणांमुळे सर्व दृश्य (संसार) लयास गेला अशा ब्रह्मवेत्त्या श्रेष्ठ आणि केवळ चैतन्यमूर्ती अशा श्रीगुरुंना मी प्रार्थना करतो.

३) शांत, शाश्वत (नित्य), अप्रमेय (अतर्क्य), निष्पाप, निर्वाण-शान्ती (मोक्ष) देणारे, ब्रह्मा, विष्णू, महेश-शेष इ. ज्यांची सतत सेवा करतात, अशा वेद-वेदांगांनी ज्यांना जाणणे शक्य आहे अशा व्यापक, जगदीश्वर, देवांचेही देव, राम नावाचे मायेने मनुष्य रुप घेणारे, सर्व राजांचे मुकुटमणी अशा करुणाकर रघुवरांना मी वंदन करतो.

४) हे रघुपते ! माझ्या हृदयात इतर कोणतीही इच्छा नाही, आपण अखिल विश्वाच्या अन्तरात विलासणारे आहांत, तेव्हा मी आपल्याला खरे तेच सांगतो. हे रघुकुलातील श्रेष्ठ पुरुषोत्तमा, निर्भरा अशी आपली भक्ती मला द्या आणि माझे मन कामादि (षड्विकार) दोष रहित करा.

५) अतुलनीय अशा सर्वप्रकारच्या (मानसिक, शारीरिक, बौध्दिक, नैतिक इ.) सामर्थ्यांचे आश्रयस्थान असणाऱ्या, पर्वताप्रमाणे प्रचंड देहाची कांती असणारे, राक्षसरुपी वनांना खाऊन टाकणारे जणूं अग्निच असे, सर्व ज्ञान्यांमध्ये सर्वप्रथम स्थानी असणारे, सर्व सदगुणांचे आगार, वानरांच्या (मनाचे) राजे, रघुपतीना अत्यंत प्रिय किंवा ज्यांना रघुपती अतीव प्रिय अशा वायुपासून जन्मलेल्या (वायुपुत्र) हनुमानास मी नमस्कार करतो.

## शिवकांची

जांबुवंतांचा उपदेश ऐकून हनुमंतांना अतिशय आनंद झाला. तो उपदेश त्यांनी आपल्या चित्तात साठवून धारण केला. त्यानंतर हनुमंतांनी सर्वांचा निरोप घेताना म्हटले, ''हे बंधो, मी सीतेचा शोध घेऊन नक्की परत

येईन. कारण आता माझ्या मनात ज्या आनंद-उर्मि उसळत आहेत त्याच कार्यसफलता (आताच) सूचित करीत आहेत. तेव्हा हे कार्य पूर्ण करून येईपर्यंत तुम्ही सारे इथेच माझी वाट पहात रहा. या भागात मिळणाऱ्या कंद-मूळ-फळांवर राहून ऊन-वारा-पावसाचे दु:ख सहन करा.'' असे म्हणून हनुमंतांने सर्वांना मस्तक नमवून वंदन केले, ह्रदयात रघुनाथाचे ध्यान धरूनच मोठया आनंदाने रामकार्यासाठी ते निघाले देखील!

त्या सागर किनाऱ्यावरील एक उत्तुंग सुंदर पर्वत (महेंद्र) पाहून सहजी हनुमंताने त्यावर उडी घेतली. पुन:पुन्हा रघुवीरांचे स्मरण करताच मारुतीचे त्याच्या अंतर्मनाचे बल व शारीरिक बल प्रचंड प्रमाणात उसळले. त्यामुळे उड्डाण झेप (take off) घेण्यासाठी त्या पर्वतावर जोराने पाय रोवताच तत्क्षणी तो पर्वत पाताळात जाऊन पोचला. **रघुपतींचा बाण जसा अत्यंत वेगाने व अमोघ जातो तसाच हनुमान गेला.** समुद्रावरुन उड्डाण करणाऱ्या हनुमानास पाहून समुद्राला त्याची सेवा करावीशी वाटली. त्याबरोबर समुद्रातून मैनाक नावाचे एक पर्वत शिखर हनुमंताजवळ गेले व त्याने थोडावेळ तेथे विश्राम करण्याची विनंती केली.

हनुमानाने त्याचा आदर करण्याचे भावनेने त्यास फक्त हस्तस्पर्श केला व विनयाने प्रणाम करीत म्हटले, ''आता रामकार्य पूर्ण होईतो विश्रांती नाही.''

हनुमंतांची प्रथम परीक्षा –

(स्वर्गातून) देवांनी पवनसुताला उड्डाण करीत जाताना पाहीले व त्याच्या बुध्दीच्या बळाची परीक्षा पाहण्यासाठी सुरसा नावाच्या सर्प जननीस पाठविले. ती (खाली हनुमानासमोर येऊन) त्यांना म्हणते, ''वाहवा ! देवांनी आज मला तुझ्या रुपाने उत्तम आहार दिला आहे. (मी तुला आता खाणार)'' ते ऐकताच पवन-कुमार तिला म्हणतो, ''माते, मी रामकार्यासाठी निघालो आहे ते मला पूर्ण करु दे. सीतेची वार्ता रामांपर्यंत पोचवू दे. मग मी आपण होऊन येवून तुझ्या मुखात शिरेन, अगदी खरे खरे सांगतो.'' पण कितीही प्रकारांनी

प्रयत्न करुनही ती हनुमानाला पुढे जाऊच देईना. तेव्हा हनुमान म्हणाला– उगाच मला त्रास नको देऊं. (पण तिने ते न ऐकताच आपली लीला चालूच केली.) तिने आपले मुख एक योजनभर पसरले, तर हनुमान दुप्पट बनले, सोळा योजने मुख करताच हनुमंतांनी आपले शरीर ३२ योजनांचे केले. ती जसजसे मुखाचा आकार वाढवीत गेली तसतसे हनुमानही आपला आकार दुप्पट करत गेले. जेव्हा तिने शंभर योजनांचे मुख केले त्यावेळी पवनसुताने अतिशय लघुरुप धारण करुन तिच्या मुखातून शिरून ते बाहेर आले सुध्दा व तिला नमस्कार करुन तिची आज्ञा मागितली, त्यावेळी ती म्हणते – ज्यासाठी देवांनी मला पाठवले ते माझे कार्य झाले. तुमची बुध्दी व शरीर दोन्हींचेही सामर्थ्य मला कळले. तुमच्या सारखा बौध्दिक व शारीरिक बलाने संपन्न अशा रामभक्ताकडून हे सर्व रामकार्य उत्तम तऱ्हेने पार पडेल असा आशीर्वाद देऊन सुरसा जाताच हनुमंतांनी पुढे मार्गक्रमण सुरु केले.

## हनुमंतांची व्दितीय परीक्षा –

त्या समुद्रात एक राक्षसी रहात असे. ती समुद्रावरुन उडणाऱ्या पक्ष्यांना कपटाने पकडीत असे. जे जीव आकाशातून त्या समुद्रावरुन उडत असतील त्यांची सावली पाण्यात पाहून त्या सावलीस धरुन ठेवी अशा तिच्या विशिष्ट छाया-शक्तीने सावलीस पकडताच तो पक्षी अचूक तिच्या मुखात येऊन पडे व ती त्याला खाई. तसा ती हनुमंतांचा छळ करु लागली. कपिंनी तिचे ते कपट बरोबर जाणले. त्याबरोबर तिला एक टोला असा जबरदस्त लगावला की ती मेलीच. अन् हे बुध्दिमंत, धैर्यवंत समुद्रपार करुन पैलतीरास पोचले.

## लंकेचे सौंदर्य –

तेथे जाताच वनशोभा पाहून हनुमान थक्क झाले. फुलांनी डंवरलेल्या वृक्षांवर मधाच्या लोभाने भुंगे गुंजारव करीत आहेत. अनेक तऱ्हेच्या फळा-फुलांनी लगडलेले सुंदर वृक्ष आहेत. त्यामुळे तेथे अनेकविध पशु-पक्षी समूहाने विहरत आहेत. असे रमणीय दृश्य हनुमंतांच्या मनाला सुखावून गेले. तेथील समोरच्याच एका विशाल पर्वतावर निर्भयपणे हनुमान सहज पळत जाऊन चढले. यात कपिस विशेष ते काय ! हे सर्व प्रभू-प्रतापामुळेच चालले होते-

त्यामुळे प्रत्यक्ष त्यावेळी काळ-मृत्यु जरी आला असता समोर तरी हनुमंतांनी त्यासही खाऊन टाकला असता. त्या पर्वतावरून हनुमान लंकेचे सूक्ष्म-निरीक्षण करूं लागले. विशेष दुर्गम रचना केलेला तो (समुद्र) जलदुर्ग होता. चारी बाजूंनी उंचच उंच समुद्राच्या झेपावणाऱ्या लाटांनी सतत तडाखे बसत होते. या जलदुर्गाच्या चारी बाजूंच्या सुवर्णकोटांची सुंदर सोनेरी किरणे समुद्राच्या पाण्याला सोनेरी बनवत होती.

संपूर्ण सुवर्णाच्या कडेकोट बंदोबस्तात सुवर्णाची रत्नखचित मजबूत घरे दिसत होती. चौक, बाजार, सुंदर-सुबक-स्वच्छ रस्ते, गल्ल्या सर्वांचीच रचना सुरेख असल्याने एकूणच नगरी फार सुंदर दिसत होती. हत्ती, घोडे, खेचरे, रथ व पायदळ यांचे समूहचे समूह अगणित असे त्या रस्त्यावरुन ये-जा करीत होते. राक्षसांचे समूह वेगवेगळ्या रुपात होते. राक्षसी-सेनेचे बळ तर वर्णनातीत होते. वने, बागा, उद्याने, घरापुढच्या वैयक्तिक बागा, तलाव, सरोवरे, विहीरी सर्व काही मनोहर होते. अन् त्या सर्वांना अधिक शोभा येत होती ती त्यातून विहरणाऱ्या मानव-नाग-गंधर्व-देव यांच्या तरुण सुंदर मुली ! त्यांचे सौंदर्य पाहून मुनींचेही मन मोहित व्हावे इतक्या त्या रुप-सुंदरी होत्या. तर पर्वतप्राय देह असलेले मल्ल आपल्या तुल्यबलाशी आखाड्यात भिडताना दिसत होते. तर कोठे अशा मल्लांच्या गर्जना घुमत होत्या. तर कुणी व्द्वंव्दयुध्दांत एकमेकांना मारुन परास्त करीत होते. तर महा-महाकाय प्रचंड देहांचे शूर-वीर सैनिक चारी दिशांनी सतत झटून नगरीच्या रक्षण-कार्यात मग्न होते. तर रस्त्यातून जाता जाता सहज एखादा राक्षस (धटिंगण) एखादा रेडा, मनुष्य, गाय, गाढव, बकरा तोंडात (लाडू वा पेढा टाकावा तसा) टाकत होता. तुलसीदास यांच्या या कथा एवढ्यासाठीच सांगत आहेत कारण हे सारे रघुवीर-बाण रुपी तीर्थात पडून आपला मूळ देह टाकून पवित्र बनून उत्तम गती (मोक्षपद) मिळवणार आहेत हे त्रिवार सत्य आहे. सर्वत्र नगर-रक्षकांचा सततचा वेढा व पहारा पाहून कपिने मनांत असा विचार केला की चिलटा एवढे अतिलघुरुप घेऊन रात्रीचेवेळी नगरात प्रवेश करु.

तिसरी परीक्षा –

त्याप्रमाणे चिलटाएवढे रुप घेऊन कपिने नररुप हरीचे – श्रीरामांचे

स्मरण करुन लंकेत प्रवेश केला. त्याबरोबर लंकिनी नगर रक्षिकेने हनुमंतास अडविले. ती म्हणते- "माझ्या परवानगी विना; माझा अवमान करुन कुठे आत निघालांस? अरे लबाडा, तूं माझे मर्म जाणत नाहीस? लंकेत शिरणारे सारे चोर हे माझे भक्ष्य (भोजन) आहेत." हे ऐकताच कपिने तिला एकच मुष्टिप्रहार केला त्या बरोबर ती रक्त ओकत धरणीवर कोसळली. नंतर थोडीशी सावरून उठली व भीतभीत (साशंक मनाने) हात जोडून हनुमंतांना विनवू लागली, "ब्रह्मदेव जेव्हा रावणाला वर देऊन गेले तेव्हा जाता जाता त्यांनी मला एक लक्षण सांगितले होते. ज्यावेळी तू कपिच्या माराने विकल होशील तेव्हाच समज की राक्षस कुळाचे दिवस भरले. हे तात् ! माझे पूर्वपुण्य महान म्हणून तुमच्यासारख्या रामदूताचे मला दर्शन घडले." **स्वर्गासह मोक्षसुख एका पारड्यात व क्षणभराचे सत्संगाचे सुख दुसऱ्या पारड्यात घातले तर दुसरे पारडेच भारी पडेल.**

"आपण नगरीत प्रवेश करा. मात्र हृदयात राजा-रामाची प्रतिष्ठापना करुनच. ( राम सानिध्यामुळे काय होईल) विष अमृत बनेल, शत्रू मित्र बनतील, सिंधू-समुद्र गायीच्या खुरातील पाण्याप्रमाणे (सहज लंघनीय) बनेल, अग्नी शीतल होईल. हे गरुडा ! सुमेरु सारखा महापर्वत (रामभक्ताला) धुळीप्रमाणे होतो. कारण त्याचेवर सतत रामकृपेची पाखर मेहर नजर असते."

अशा प्रकारे हनुमंतांनी अत्यंत लहान रुप घेऊन लंकेत भगवंत-स्मरण पूर्वक प्रवेश केला. प्रत्येक घरा-घरात शिरुन शोध घेऊन पाहिले, नगरीत सर्वत्र योध्दयांचे अगणित ताफे सतत गस्त घालीत होते. दशाननाच्या महालात सर्वत्र फिरुन पाहिले, त्याची अत्यंत सुंदर चित्र-विचित्र रचना न्याहाळली. त्याच्या शयन-मंदिरांत अनेक स्त्रिया झोपल्या, (अस्ताव्यस्त लोळत-घोरत पडल्या होत्या) परंतु कोठेही त्याच्या डोळ्यांना वैदेहीचे दर्शन घडेना.

जवळच एक रम्य असे भवन (भक्त-निवास) पाहिले. तिथे जवळच सुंदर विष्णु-मंदिर खास सुबक बनवलेले पाहिले.

धनुष्य-बाण, अशा (रामायुध) आयुधांनी अंकित असलेले ते सुरेख घर, बाहेर अंगणात तुळशी वृंदावनासह तुळशी-वन पाहून कपिराजाचे मन तेथे गुंतले, गुंगले, आनंदाने डोलूं लागले.

हनुमंत-विभीषण भेट –

हनुमान मनांत विचार करूं लागले, लंकेत तर सर्वत्र राक्षसच दिसतात. किंबहुना ही राक्षसांचीच नगरी आहे. मग इथे (दुष्टांच्या संगात) कोण सज्जन असणार ? अशा विचारात असतांनाच विभीषण त्याचवेळी जागे झाले आणि ''रामनाम'' मोठ्याने उच्चारायला त्यांनी सुरुवात केली. मग तर हनुमानाची बाह्य लक्षणांसह ह्या आंतरिक लक्षणांनी पक्की खात्रीच पटली की हे घर कोणा ना कोणा साधु-संत सज्जनाचेच असणार. यांच्याशी मुद्दाम परिचय करून घेऊ, कारण साधु कार्यहानी तर करणार नाहीतच, (उलट रामकार्यात कांही मदतच करतील.) असा निश्चय करून हनुमंतांनी विप्ररुप घेतले व 'राम राम' म्हणत विभीषणाच्या दारात जाऊन थांबले. 'राम राम' हा परवलीचा शब्द कानी पडताच बिभीषणांनी सत्वर त्यांना आत घेतले. त्यांना नमस्कार करुन त्यांचे कुशल विचारुन त्यांना त्यांची ओळख देण्यास सांगितले. पण बिभीषणच आधी विचारू लागले – आपण कोणी हरिभक्त-हरिदास आहांत कां? कारण तुमच्या विषयी उगाचच माझ्या मनात प्रेम-स्नेह दाटून येत आहे. कां मजवर-माझ्या दीन-पामरावर प्रेमाने कांही विशेष कृपा करुन मला महाभाग्यवान बनविण्यासाठी आपण कृपासिंधू राम तर आला नाहीत ना ?

मग हनुमंताने आपले मूळ रूप प्रगट केले व सर्व रामकथा (सारांशाने) सांगून स्वत:चे नांव सांगितले. रामकथा सांगताना भगवंताचे गुण-वर्णन करताना व ऐकताना हनुमंताचे व बिभीषणाचे-दोघांचेही मन रामप्रेमाने भरून ते प्रेम-रोमांच-प्रेमाश्रूंव्दारा थोडेसे प्रगटही झाले. बिभीषण म्हणतात – हे पवनसुता, आमचे आयुष्य म्हणजे बत्तीस दातात जशी जीभ केविलवाणी होऊन राहते तसे आहे. रघुनाथ, माझ्या अशा दुष्टसंगातल्या अनाथा-वर कृपा करतील कां हो? कारण हा देह तर तमोगुणी, त्यामुळे कणभराचेही साधन हातून होत नाही, आणि भगवंत चरण कमलांविषयी प्रीती तर काहीच नाही. पण तरीही एक विश्वास वाटतो आहे, ज्या अर्थी तुमच्यासारख्या रामभक्ताचे दर्शन झाले त्या अर्थी एक ना दिवस रघुवीर मजवर कृपा करून त्यांचे दर्शन देतीलच. कारण त्यांच्याच कृपेमुळे तुमची भेट झाली (ही या मार्गावरची पहिली खूण

आहे.) त्यावर हनुमंत म्हणतात– बिभीषणा ऐका, प्रभूंची रीतच अशी आहे की ते आपल्या दासावर नेहमी प्रेमच करतात. माझे असे कोणते पवित्र कुल आहे, उलट अत्यंत चंचल व हीन असा साधा मी एक माकड, अहो जे सकाळी सकाळी आमचे नांव घेतील त्यांना दिवसभरात अन्न-दर्शनही घडत नाही. हा आमचा प्रताप ! असा इतका अधम असलेला मी, अशा माझ्यावरही जर रघुवीर कृपा करतात हे सांगता सांगताच हनुमानाचे डोळे वाहू लागले-रामप्रेमाने. हे सख्या, असे हे आमचे स्वामी अकारण कृपाळू आहेत हे जाणूनही जे त्यांना विसरून विषयात रमतात, ते दुःखी होतील यात नवल ते काय? असे म्हणून रामांचे गुण हनुमान गायला लागले. **त्या अखंड अविरत गुण-श्रवणाने दोघांनाही अनिर्वचनीय असे सुख लाभले.**

त्यानंतर बिभीषणाने सीता अशोक वनात असून तिला केव्हा भेटावे इ. युक्त्या हनुमंतास सांगितल्यावर हनुमानाने लगेच त्यांचा निरोप घेऊन तो तिथून निघाला.

सूक्ष्म रुप धारण करुन हनुमान अशोक वनात गेले. सीतेला पाहताच दुरुनच त्यांनी तिला प्रणाम केला. तिथेच अशोक वृक्षावर बसून योग्य संधीची वाट पहात राहीला. माता जानकीचे हनुमानाला घडलेले प्रथम दर्शन !

अत्यंत कृश झालेली, केसांची एकच जटारुपी वेणी बनलेली, नजर स्वतःच्या पायाकडे व मन रघुपतींच्या गुण-गान-स्मरणात मग्न,पण तरीही विरहामुळे अत्यंत दुःखी झालेली अशा जानकीला पाहून हनुमान अतिशय दुःखी झाला. जानकी ज्या अशोकवृक्षाखाली बसली होती त्याच झाडाच्या पालवीत हनुमान लघुरुपाने लपून योग्य संधीची वाट पहात राहिला.

त्यावेळी रावण-मंदोदरी व इतर राण्यांसह सीतेला वश करण्यासाठी आला. 'तुला मी पट्टराणी करेन इ.' अशा प्रकारे साम-दाम-भय-भेद यामार्गाने तिला विनवू लागला. परंतु सीता कोणत्याही प्रकाराला बधली तर नाहीच उलट एक गवताची काडी आड धरून रावणास जणूं कस्पटासमान मानून अत्यंत बाणेदारपणे ती श्रीराम स्मरणपूर्वक उत्तरली.

सीतेचे रावणास बाणेदार उत्तर –

"हे दशमुखा (दाही इंद्रियांनी भोग घेणाऱ्या विलासी राक्षसा), रघुवीर हे सूर्यासमान असल्याने तुझा उजेड त्यांचेपुढे काजव्यासमान फिकाच पडणार. काजव्याच्या उजेडाने कधी कमळ फुलते कां? पर्णकुटीत एकट्या स्त्रीला कपटाने चोरणे हे तुझे नीच कर्तृत्व, याबद्दल तुला लाज कशी नाही वाटत? रघुवीरांचे बाण पाहून, त्याचा टणत्कार ऐकून तुझा सारा अभिमान, धुंदी क्षणार्धात उतरेल." हा सीतेने सर्वांसमोर केलेला पाणउतारा ऐकून रावणाने रागाने आपली चंद्रहास नावाची तलवार काढली व तिला मारण्यास धावला पण तेवढ्यात त्याच्या मंदोदरीने त्याला त्या नीच कृत्यापासून परावृत्त केले. शेवटी जाता जाता त्याने सीतेला महिन्याभरात वश न झाल्यास मारण्याची धमकी दिली व तिच्या पहाऱ्यावरील राक्षसींना तिला छळण्यास सांगून तो निघून गेला. त्याप्रमाणे राक्षसींनी सीतेला भीती दाखवायला सुरुवात करताच त्रिजटा नांवाची बिभीषण-कन्या सात्विक असून त्या राक्षसींची प्रमुख होती, पण तीही वडीलांप्रमाणेच रामभक्त, विवेकी अशी होती. तिने सर्व राक्षसींना सीतेला छळण्यापासून परावृत्त केले व स्वत:चे स्वप्न सांगू लागली.

त्रिजटेचे स्वप्न –

सीतेची सेवा करण्यातच तुमचे हित आहे का व कसे ते ऐका. एका कपिने लंका पूर्ण जाळून टाकली. सारी राक्षससेना पराभूत झाली. दशमुख-रावणाची दहा मुखे तोडली गेली, वीसही बाहु उखडले गेले. आणि नग्नावस्थेत गाढवावरून धिंड काढून तो दक्षिण दिशेला जाताना मला दिसला. बिभीषण लंकेचा राजा बनला. सर्व लंकानगरीत रघुवीरांचाच जयजयकार दुमदुमू लागला व त्यानंतर सीतेला रघुवीरांनी सन्मानपूर्वक बोलावून घेतले. हे माझे पहाटेचे स्वप्न दोन-चार दिवसांतच खरे होईल हे मी अगदी निश्चयपूर्वक ठासून सांगते. हा त्रिजटेचा स्वप्न-वृत्तांत ऐकून त्या साऱ्या राक्षसिणी घाबरल्या व सीतेच्या पायांना लवून नमस्कार करूं लागल्या. त्यानंतर त्या साऱ्याजणी इतस्तत: विखुरल्या. मग मात्र सीतेला रावणाने एक महिन्याची मुदत दिल्याची चिंता मनास सतत ग्रासू लागली. राम विरहाने निराश झालेल्या सीतेची वैफल्यग्रस्त

अवस्था आत्महानी पर्यंत जाऊन पोचली. म्हणून ती त्रिजटेला अग्नी आणून देण्यास सांगू लागते. अशोक वृक्षाकडे अंगार मागून आपला विरहाग्नी कायमचा संपविणेस सांगते. पण सारेच प्रयत्न निष्फळ ठरतात व मोठ्या आशेने तिने अशोक वृक्षाकडे त्याची लालसर पालवी अग्नीचे अंगार समजून देत आहे या कल्पनेने ओंजळ पसरली.

सीता-हनुमान संवाद –

सीतामाईंना एकटे पाहताच, यासंधीचा नेमका फायदा हनुमानाने उचलला व त्याने राम-मुद्रिका सीतेच्या ओंजळीत टाकली. ती मुद्रिका पाहताच आश्चर्य, आनंद व दुःख या भावनांचे संमिश्रण सीता-मुखावर दिसताच हनुमानाने श्रीराम गुण-वर्णन करायला सुरुवात केली. सुग्रीव भेटीपासूनची रामांची सारी विरह कथाही सांगितली. त्यावर सीता म्हणते इतके सुंदर माझे दुःख दूर करणारे जे कोणी वचनामृत बोलत आहे ती व्यक्ती समोर का नाही येत? असे म्हणताच हनुमान सीतेसमोर प्रगट झाले. त्याबरोबर एका माकडाला समोर पाहताच सीतेने चटकन आपली मान त्याच्या विरुध्द दिशेस वळविली. तेव्हा हनुमंतांनी स्वतः रामदूत म्हणून माते मी आपल्याकडे आलो आहे. हे अगदी करुणा-निधान रामांची शपथ घेऊन सांगतो असे म्हटले. रामांनी स्वतः ही मुद्रिका (अंगठी) तुम्हांला ओळख पटावी म्हणून खास खूण म्हणून पाठविली आहे असे म्हणताच सीता म्हणते, ''पण मनुष्य व वानर यांची संगत कशी काय घडली?'' हे विचारताच सुग्रीवाशी मैत्री घडून रामकार्यार्थ रामदास बनून सीताशोधकार्यार्थ स्वतः आल्यापर्यंतची कथा हनुमान सांगतात व ते सांगताना केवळ राम-प्रभावामुळे हे कार्य सफल झाले हे सांगताना सद्‌गदित होतात. यावरुन सीतेची हनुमंताबद्दल तो सच्चा रामभक्त असल्याची पक्की खात्री पटते. व ती म्हणते ''बाळा ! हनुमाना ! या विरह समुद्रात मी खोल खोल बुडत असतां, तू अगदी नेमका जहाज बनून आलास हं! आता इडा पिडा टळो ! श्रीरामांचे अनुजांसह क्षेम-कुशल आहे नां? मग इतके कोमल मनाचे कृपाळू असे रघुवीर हे कपि ! माझ्याच बाबतीत इतके निष्ठूर कां बरे बनले ? सेवकांना सदैव सुख देणारे, असे त्यांचे सहज ब्रीद असतां, त्यांना हे माझे दुःख

अजून कसे बरे दिसत नाही? रघुनायक कधीतरी माझी आठवण काढतात कां रे? बाळा, आता केव्हा त्यांच्या कोमल-गात्रांचे दर्शन माझ्या नेत्रांना होणार, कधी ती दर्शन शीतलता मला प्राप्त होणार, सांग बरं? अरेरे, नाथ मला विसरले बहुतेक !'' यानंतर तिच्या मुखातून शब्द निघेना, नुसता नेत्रांतून अश्रूंचा पूर वाहू लागला. ती अत्यंत विरह-व्याकुल झालेली जाणून हनुमान म्हणाले, ''आई, प्रभू अनुजासह कुशल आहेत बरं! आणि ते तुमच्या प्रमाणेच तुमच्या विरहाने दु:खीही आहेत. तुमच्यावर त्यांचे अतीव प्रेम आहे. तुम्ही मनांत कोणताही किंतू नका बाळगू!

रघुपतींचा संदेश ऐका. असे म्हणून हनुमान स्वत:च सद्‌गदित होऊन अश्रू भरल्या नेत्रांनी सांगू लागतो. सीते, तुझ्याविना हे सारे सारे मला विपरीत (उलटे-त्रासदायक) बनले आहेत. कुमुदांनी (रात्रविकासी कमळे) प्रफुल्लीत अशी वने मला भाल्याप्रमाणे टोचत आहेत. पावसाळी मेघ जणूं तापलेले तेल मजवर बरसत आहेत, नवीन वृक्षांची कोवळी पालवी मला अग्नी सारखी दाहक होते आहे, काळ विशेषत: रात्र काळरात्र भासते आहे तर रात्रीचा चंद्र सूर्याप्रमाणे मला जाळीत आहे. तुझ्या सहवासात ज्या त्या साऱ्या गोष्टी मला सुखद, हितकारक होत्या त्या साऱ्या मला पीडा देत आहेत. शीतल-मंद सुगंधी वारा जणूं सापाच्या फुत्काराप्रमाणे मला त्रास देतो आहे. दु:ख दुसऱ्याला सांगून थोडे कमी होते पण हे माझे दु:ख जाणणारा कोण आहे. तेव्हा हे कोणाला व कसे सांगू? ''**तुझ्या व माझ्या मनालाच आपल्या या दिव्य प्रेमतत्वाची खरी जाण आहे. पण हे माझे मन तर तुझ्याच जवळ आहे (कायमचे गहाण पडले आहे) यातच तूं काय समजायचे ते समज. (हा प्रीतीरस केवळ तूं आणि तूंच जाणूं शकतेस.)**'' हा प्रभूंचा निरोप ऐकताच त्या रामप्रेमात सीता 'वैदेही' बनून देहभान हरपली. ते पाहून हनुमान तिला म्हणतो – ''हे माते! थोडासा धीर धर! राम सेवकांना सदैव सुख देणारेच आहेत हे ध्यानी घे. रघुपतींचा महीमा, प्रभाव मनीं साठव, आठव. आणि या रामांच्या निरोपावर भरोसून तुझ्या मनातील भीती पार घालवून टाक. निराशा-वैषम्य यांना हद्दपार कर. अग रघुपतीचे बाण सुटू लागले की अग्नीवर पतंग जे आपोआप येऊन पडतात तसे

हे सारे राक्षस समूह आपोआप मरुन पडतील. आता तुझा त्यांना ठाव-ठिकाणा कळला आहे. तेव्हा रामांना जाऊन सांगताच ते कपिसैन्यासह रावणावर चाल करुन येतील, सर्व राक्षस सेनेचा क्षणार्धात फडशा पाडतील व हे माते तुला येथून घेऊन जातील. आता थोडी कळ काढ, माझ्या प्रमाणे सारे वानर तुझे पुत्रच आहेत असे समज.'' यावर सीता म्हणते- तुझ्यासारखेच जर सगळे छोटे छोटे असले तर या महाधिप्पाड राक्षसांपुढे त्यांचा पाडाव कसा लागेल? कारण तुला पाहून मलाही शंका येते. त्याबरोबर हनुमानांनी आपले लघुरुप टाकून महान रुप धारण करताच सुवर्णाचा प्रचंड पर्वत समोर ठाकल्याचे सीतेने पाहीले. व ते भयंकर, उग्र, लढवय्या योध्दयाचे रुप पाहताच सीतेला हायसे वाटले. मग पुन्हा हनुमानाने लघुरुप धारण केले व म्हणाला, माते आमची सर्वांची बुध्दी व बल एका फांदीवरुन दुसऱ्या फांदीवर उड्या मारण्याइतकीच. पण प्रभुंच्या आधारावर-पाठिंब्यावर-अधिष्ठानावर आम्ही लढणार तेव्हा गरुडाने सर्प-पिलांना खेळवून सहज मारावे, तसे आम्ही या राक्षस सेनेवर तुटून पडू. हनुमंताचे रामांवरील भक्तीने रामांच्या बल-प्रताप व तेजाने निथळणारे ते शब्द ऐकून सीतेला अतिशय समाधान झाले व तिच्या मुखातून आपोआपच आशीर्वादाची वाणी उमटली- ''बाळ ! तू बल-चारित्र्यसंपन्न होशील. अजर, अमर होऊन सर्व सद्‌गुणांची खाण होशील. आणि रघुनायक तुझ्यावर खूप खूप कृपा करतील.'' **श्रीरामांची कृपा होईल हे शब्द ऐकताच हनुमान रामप्रेमात, भक्तीरसात अगदी गाढ बुडून गेला.** भानावर येऊन सीतेला वारंवार नमस्कार करुन हात जोडून म्हणाला- ''माते ! आता आज मी खरा कृतार्थ झालो ! कारण तुझा अमोघ असा आशीर्वाद मला मिळाला.'' इथे खऱ्या अर्थाने रामकार्याचा एक प्रमुख टप्पा पार होताच आता हनुमानाचे स्वत:च्या देहाकडे व आसपास लक्ष गेले आणि ''या अशोकवनातले फळाफुलांनी लगडलेले वृक्ष पाहून आता मात्र मला आपल्या भुकेची अगदी कडकडून जाणीव होत आहे. तेव्हा तुझी परवानगी असेल तर मी ही फळे खाईन.'' पण सीतेने स्त्री- व मातृसुलभ भावनेने राक्षसांचे वाटणारे भय सांगताच हनुमान म्हणाले, त्याची तू काळजी करु नको. त्यावर जानकी म्हणते ठीक आहे. रघुपती-पदांचे हृदयात स्मरण ठेऊन तुला हवे ते कर. ह्या मधुर फळांनी आपली भूक भागव.

हनुमंतांचा लंकेतला दिव्य प्रताप --

सीतेला विनयपूर्वक मस्तक नमवून नमस्कार केला व हनुमान बागेत शिरून फळे खाऊन झाडे तोडून टाकू लागला. बागेचा होत असलेला विध्वंस पाहून तेथले रक्षक हनुमानाला मारूं लागले-त्याबरोबर हनुमानांनी अनेक रक्षकांना यमसदनास पाठवले. त्यामुळे ही वार्ता रावणापर्यंत पोचली. त्याबरोबर त्याचा अक्षकुमार नावाचा एक मुलगा सैन्यासह सुसज्ज होऊन त्याचेवर चाल करुन आला. त्याला पाहताच तेथील एकेक वृक्ष उपटून त्या वृक्षांनीच त्याने सर्वांचा फडशा पाडला. सारे क्षणार्धात मरून पडले ते ऐकताच रावण अतिशय चिडला व त्याने इंद्रजिताला या माकडाला जिवंत घेऊन आणण्यास पाठवले. दोघांमध्ये तुंबळ व्दंव्द युध्द झाले. कपटानेही हनुमान जिंकला जात नाही हे पाहून मेघनादाने ब्रह्मास्त्राचा प्रयोग हनुमानावर केला. ब्रह्मास्त्राचा –ब्रह्मदेवांचा मान राखण्यासाठी हनुमानाने जाणीवपूर्वक मूर्च्छा आल्याचे नाटक केले व पडता पडता अनेक राक्षसवीरांना त्यांनी आपल्या अंगाखाली चिरडून सहजी मारले. हनुमान बेशुध्द होताच मेघनादाने त्याला नागपाशात बांधून रावण-दरबारात आणून उभे केले. रावण सभेत हनुमानाने सर्वांकडे अगदी सहज निर्भयपणे पाहिले.

हनुमान-रावण संवाद –

हनुमानाला-माकडाला आपल्या दरबारात पाहताच रावण रागाने आणि पुत्रवधाच्या दु:खाने चिडून म्हणाला – काय रे माकडा, कोण तूं? कुणाच्या बळावर माझे हे अशोकवन विध्वंसलेस? माझा पराक्रम-प्रताप कधी ऐकला नाहीस म्हणून असे निर्लज्ज कृत्य केलेस काय? माझ्या राक्षसांना का मारलेस? तुला प्राणांचे अभय आहे. सारे खरे खरे सांग. त्यावर हनुमान म्हणतो– ज्याच्या बळावर ब्रह्मांडाचे समूह (अगणित ब्रह्मांडे) ही माया निर्माण करते, ज्याच्या बळावर ब्रह्मा-विष्णू-महेश आपले उत्पत्ती, स्थिती, लय ही कार्ये करतात, ज्याच्या बळावर हा सहस्त्रमुखी शेष अनेकावधी पर्वत अरण्यांसह ही ब्रह्मांडे आपल्या मस्तकावर धारण करतो, ज्याने शिव-धनुष्याचा भंग केला, तुझ्यासह सर्व नृपसमूहांचा अभिमान ज्याने जिरवला, खर, दूषण, त्रिशिरा, वाली अशा अनेक बलवानांना ज्याने मारले, ज्यांच्याबळावर तूं हे सारे

चराचर जिंकलेस, त्यांचा मी दूत आहे. (आणखी महत्वाची खूण म्हणजे) ज्यांची त्यांना अत्यंत प्रिय अशी पत्नी तू चोरून आणलीस त्यांचा मी दूत आहे.

तुझा पराक्रम मी चांगलाच जाणून आहे. सहस्रार्जुनाबरोबर झालेली तुझी लढाई (फजिती) वालीबरोबर तुला लाभलेले यश (अपयश), हे सारे मला माहिती आहे. मी अत्यंत भुकेलेला असल्याने फळे खाताना, कपिस्वभावानुसार काही फळे, झाडे मी तोडली. मला जे मारायला आले त्यांना मी मारले. कारण प्रत्येकाचेच आपल्या देहावर प्रेम असतेच नां? मग तुमच्या मुलाने असे इथे बांधून आणले, त्यात लाज कसली ? कारण हे माझ्या प्रभूचे कार्यच आहे. त्यात येणारी ही छोटी छोटी विघ्ने त्याला कसली आली आहे लाज ?

<u>हनुमंताचा रावणास उपदेश –</u>

रावणा, तुला मी हात जोडून विनयपूर्वक सांगतो ते ऐक. नीट विचारपूर्वक ही शिकवण स्वीकार. तुझ्या पुलस्त्यासारख्या उत्तम पवित्रकुळाचा विचार कर आणि सीतापती रामांला शरण जा. कारण सारे चराचर, देवा-राक्षसांना गिळणारा तो विराट पुरुष आहे. त्यामुळे प्रत्यक्ष काळ मृत्युदेखील त्याला घाबरतो. म्हणून त्याच्याशी वैर, विरोध नको करुं. माझे ऐक, अन् त्याची पत्नी जानकी त्याला परत कर. शरणागताचे रक्षण करणारे असे अत्यंत कृपाळू असे रघुनायक आहेत बरं! खरा सारख्या युध्द करणाऱ्या शत्रूलाही निर्वाण-मोक्ष देऊन त्याचे अपार गुन्हे माफ करणारे असे भक्तवत्सल रघुपती आहेत.

रामांचे चरण – कमल हृदयात पक्के बिंबव आणि कायमची लंकेवर तुझी अधिसत्ता गाजवीत रहा. अत्यंत शुचिर्भूत अशा पुलत्स्य कुळाला तुम्ही कलंक बनू नका. विचारपूर्वक सारा मद, मोह टाकून द्या. कारण रामनामाशिवाय वाणीला शोभा नाही, हे रावणा, सुंदर स्त्री सर्व अलंकार मंडित आहे पण जर ती वस्त्रहीन जशी अशोभनीय ठरते तसे **रामनामाविण वाणी किंवा रामविन्मुख झालेल्यांची संपत्ती देखील असून नसल्यातच जमा आहे बरं !** पावसाळी नद्यांप्रमाणे रामविन्मुखाची ही संपदा अल्पकालिन व क्षणभंगुर असते हे ध्यानी घे. आणि सर्वात महत्वाचे म्हणजे रामविमुखाचा रक्षणकर्ता (चौदा भुवनात)

कोणीही नाही, अगदी ब्रह्मा, विष्णू, महेशांसारख्याचेही सहस्त्रवधी बळ रामद्रोह्याचे रक्षण करू शकत नाही हे ध्यानी घे. मोह (देहासक्तीचे विपरीत ज्ञान) हेच सर्व दुःखाचे क्लेशांचे मूळ कारण आहे. म्हणून त्या मोहातूनच निर्माण होणारा मान अभिमान सारा सोडून दे. आणि रघुनायकांना शरण जा. ते कृपेचे सागर व भगवंत असलेने तुला नक्की क्षमा करतील. अशा प्रकारे नीती, वैराग्य, विवेक व भक्तीयुक्त उपदेश हनुमंताने रावणास केला. पण हनुमानाचे सारे बोलणे ऐकून रावण मोठ्याने हसून उपहासाने म्हणाला वाहवा ! आम्हाला एका ज्ञानी माकडाचा आज गुरु-उपदेश मिळाला. तुझाच मृत्यु जवळ आलेला दिसतो असे म्हणून आपल्या सेवकांना त्याला मारण्याची आज्ञा दिली. इतक्यात बिभीषण तेथे आले व त्यांनी राजनीतिनुसार दूताला मारणे योग्य नाही, फार तर त्याला काही शिक्षा करा असे सांगताच रावणाने त्याची शेपटी पेटवून देणेस सांगितले. हनुमंताने शेपटीवर तेल ओतताच पुनःपुन्हा शेपटी लांब करण्याचा खेळ सुरु केला. त्यामुळे लंकेतली सारी वस्त्रे-तेल-तूप सारे संपले. शेवटी त्याला अग्नी लावताच हनुमानाने लघुरुप धारण केले व तो वायुपुत्र असल्याने ४९ प्रकारचे वारे त्याच्या मदतीला धावून आले. त्यामुळे लंकेत सर्वत्र तो अग्नी वेगाने पसरला व सारी सोन्याची लंका जळून भस्मसात झाली. केवळ एक बिभीषणाचे घर वगळता साऱ्या लंकेत अग्निच्या थैमानाने हाहाःकार पसरला. प्रत्यक्ष रामांचा दूत बनून गेल्याने हनुमानाला त्या अग्निचा त्रास न होता त्याला तर तो शीतल बनला. अशा तऱ्हेने सारी लंका जाळून त्याने आपली शेपूट सागरात विझवली व पुन्हा लघुरुप धारण करुन सीतेपुढे हात जोडून तिचा निरोप व खूण घेण्यासाठी उभा राहिला. तेव्हा सीतेने आपल्या केसांतील 'चूडामणी' काढून दिला व जयंत प्रसंगाची खास आठवण सांगून रामप्रभूंना लवकरात लवकर येऊन संकटमुक्त करविण्याचा निरोप दिला. पुन्हा जाताना हनुमानाने लवून नमस्कार करताच सीतेचे डोळे पाणावले.

हनुमानाने जाता जाता पुन्हा मोठ्याने बुभुत्कार केला त्यामुळे राक्षसींचे त्या भीतीने गर्भपात झाले. अशा रीतीने रामकार्य यशस्वी करून हनुमान सागरपार त्या कपिंच्या विशेष तुकडीजवळ पोचला. त्याच्या मुखावरील तेजावरुनच काम फत्ते झाल्याचे सर्वांना कळले. मग त्या आनंदाप्रित्यर्थ खास

सुग्रीवाच्या 'मधुवनांत' त्यांनी जाऊन फळे खाण्यास सुरुवात केली. त्यावरुन सुग्रीवानेही रामकार्य झाल्याचे जाणले. जांबुवंतांनी हनुमानाची प्रशंसा राम-लक्ष्मण सुग्रीवासह सर्व कपींसमोर खुल्या दिलाने केली. प्रथम तो सर्वांचा कसा प्राणरक्षक, लंका विध्वंसक बनला इथपर्यंत सारा वृत्तांत रामांना सांगितला.

विष्णूकांची (राम-हनुमान संवाद) –

ते सारे ऐकून रामांनी अत्यानंदाने हनुमानांना आपल्या हृदयाशी कवटाळले व त्यांच्याकडून सीतेचा निरोप ऐकला तो असा ''तन-मन-वचनपूर्वक हे नाथ, मी आपली दासी असतां, माझ्या कोणत्या अपराधास्तव आपण माझा त्याग केला आहांत? माझा मात्र एक मोठा दोष मी मान्य करते की आपल्या विरहातही मी अजून जिवंत आहे. पण विरहाग्नीने सारे शरीर सतत जळते आहे पण आपले दर्शन होईल या आशेने नेत्र मात्र स्वत:च्या लाभाच्या आशेने सतत जलवर्षाव करीत राहतात व देह त्यामुळे विरहाग्नीने जाळूं शकत नाही. आणि डोळ्यातले अश्रू तो अग्निही सतत विझवित राहतो.'' असे सांगून तिने दिलेला चूडामणी हनुमानाने रामांकडे सुपूर्द केला व म्हटले, ''हे प्रभो, सीतेची विपदा संकट महाभयंकर आहे, ते शब्दांत सांगताच येत नाही. तेव्हा हे करुणानिधे, आपण लवकरात लवकर लंकेवर स्वारी करुन रावणाकडून तिची सुटका करावी कारण तिचे एकेक निमिष तिला एकेका कल्पाप्रमाणे प्रदीर्घ भासत असून तिची अपार हानी करीत आहेत''. असा सारा वृत्तांत ऐकून रामांच्या राजीव (कमलाप्रमाणे) असणाऱ्या विशाल नेत्रांत अश्रू मावेनासे झाले. व पुन्हा प्रभूंनी हनुमंताला हृदयाशी कवटाळून त्याची स्वमुखे प्रशंसा केली. ते म्हणाले ''तू एक कपि असूनही या विश्वात तुझ्यासारखा माझा उपकारकर्ता कोणीही नाही, ना देव, ना मानव ना ऋषी-मुनी, हे कपि, या तुझ्या ऋणातून मी मुक्तच होऊं शकत नाही. असे म्हणताच हनुमंत रामांच्या पायांवर अत्यंत व्याकुळ होऊन कोसळला व 'हे प्रभो, माझे रक्षण करा, रक्षण करा' असे अश्रूपूर्ण नेत्रांनी म्हणत उन्मनी अवस्थेस जाऊन पोचला व त्याने रामांकडून 'अनपायिनीभक्ती' मागताच प्रभुंनी ती त्याला सुखेनैव दिली. त्यानंतर रामांनी सुग्रीवास लंकेप्रत जाण्यासाठी सर्व कपिसैन्य सज्ज करायला सांगितले. त्याबरोबर सारी वानरसेना रामांच्या कृपादृष्टीने अत्यंत बलवान होऊन लंकेकडे निघाली सुध्दा. सागर तीरावर येऊन पोचली देखील.

तिकडे हनुमान लंका-दहन करून गेल्याने सर्व राक्षसांच्या मनांत भीतीची दहशत पसरली. मंदोदरीला तिच्या दूतांकडून वानरसेना सागरतीरावर पोचल्याचे कळताच तीही मनातून फार धास्तावली व एकांतात तिने रावणास उपदेश केला तो असा –

'हे कान्त ! नाथ! तुमच्या हिताचा विचार करुन कांही चार शब्द मी तुम्हांला सांगते ते नीट ऐका. भगवान विष्णूशी वैर करणे हे योग्य नाही, यात तुमचा सर्व कुळासह नाश दिसतो आहे. कारण केवळ ज्यांच्या दूतामुळे जर आपल्या राक्षस गृहिणींचे गर्भपात झाले, तर मग त्याचा स्वामी आल्यावर काय होईल ? आणि पहा जेव्हापासून सीता या लंकेत आली आहे तेव्हापासून आपला राक्षस-कुळाचा विध्वंस सुरु झाला आहे. तेव्हा आपल्या सचिव-दूत यांच्याबरोबर सन्मानाने रामांकडे तिची पाठवणी करा व आपले हित साधा. कारण त्याशिवाय प्रत्यक्ष भगवान शंकर, ब्रह्मदेव कोणीही तुमच्या रक्षणासाठी येणार नाही. रामांच्या बाणांचा वर्षाव सुरु होण्यापूर्वीच तुम्ही प्रयत्नपूर्वक आपल्या कल्याणाचा हा मार्ग स्वीकारा. हे मंदोदरीचे बोल ऐकून रावण हसला, तिला आलिंगन देऊन म्हणाला, 'देवांना सुध्दा जिंकणारा असा त्रिभुवन सम्राट रावण तुझा पती असताना तूं अशी घाबरतेस हे हास्यास्पदच नव्हे काय?' असे म्हणून दरबारात गेला. व तिथेही त्याने वानरसेना सागर-पार आल्याने आपण काय करावे असे विचारताच सारे सभासद म्हणाले, 'महाराज, वानरसेनेची आपण राक्षसांनी भीती ती काय बाळगायची?'

पण बिभीषण त्या सभेत येताच त्याने रावणास सांगितले – हे दादा, ज्याला स्वत:चे कल्याण व्हावे, उत्तम कीर्ति, उत्तम सुखे व मरणोत्तर उत्तम गती मिळावी असे वाटते, त्याने सर्वप्रथम परस्त्री माते-समान मानली पाहिजे. इतकेच नव्हे तर परस्त्रीचे दर्शन हे सर्वथा त्याज्य मानावे. आणि कोणाचाही द्रोह न करता काम-कोप-मदरहित होऊन सन्मार्गाने आपले जीवन व्यतीत करावे. आणि हे करतांना रघुवीरांचे सतत स्मरणपूर्वक प्रत्येक कार्य करावे असे सर्व संत ज्या मार्गाने जातात तोच मार्ग अवलंबावा. कारण हे दादा, राम हे वरवर सामान्य राजकुमार दिसत असले तरी ते ब्रह्म-स्वरुप आहेत, त्यामुळे सर्व भुवनांचे-ईश्वर-परमेश्वर-काळाचेही काळ असे आहेत. जे मूळ निर्गुण निराकार

ब्रह्म तेच पृथ्वी, ब्राह्मण, गायी व देव यांच्या हितासाठी सगुण साकार रुप घेऊन 'राम' म्हणून आले आहेत. ते वेद व धर्म रक्षणार्थ आलेले आहेत. तेव्हा त्यांच्याशी वैर करणे योग्य नाही. त्यांची वैदेही त्यांना परत द्या. त्यांचा हा अपराध ही ते भक्तवत्सल, शरणागत रक्षक असल्याने तुम्हांला क्षमा करतील. आपले आजोबा पुलत्स्य मुनी त्यांनी त्यांच्या शिष्याकडून हा निरोप तुम्हांला देण्यास कळविले होते. तो आज तुम्हांला सांगत आहे. यानंतर माल्यवंत या दुसऱ्या सुजाण सचिवानेही या बिभीषणाच्या नीतीस दुजोराच दिला. तो म्हणतो, 'बिभीषणांनी राजनीती व धर्म या दृष्टीने हे सांगितलेले अतिशय योग्य असे तुम्ही अंमलात कृतीत आणा'. त्यानंतर पुन्हा बिभीषणाने हे नाथ! असे म्हणून रावणास समजावण्याचा प्रयत्न केला. सुमती असेल तेथेच संपत्ती राहते, वाईट बुध्दि- अहितकारक अशी कृती संकटांनाच आमंत्रण देते. सीतेला चोरुन आणल्यापासून राक्षस-कुळावर काळरात्रच पसरत चालली आहे. तरी हे दादा, हे प्रभो, तुमचे पाय धरुन मी तुम्हांला विनवून सांगतो की, तुम्ही सीता रामांना परत द्या. त्यातच तुमचे हित आहे. असे इतके सज्जनपणाने सांगूनही रावणाने बिभीषणास लाथ मारुन आपल्या लंकेतून हद्दपार केले. अशा लंकेतल्या त्या एकमेव सज्जनाची अवज्ञा, अपमान केल्यामुळे रावणाचे अकल्याण, हानी हे निश्चितच झाले.

बिभीषणाला लंकेतून हाकलून दिल्याने त्याला रामांना शरण जाणे अतिशय सोपे झाले व तो आनंदाने निरनिराळे मनोरथ करीतच रामांकडे निघाला. ज्याच्या लालसर, मृदु अशा चरण-कमलांचा स्पर्श अहिल्येला झाला, ज्या पद-कमलांमुळे दंडक-वन पवित्र झाले, जी चरण कमले सीतेने आपल्या हृदयात धारण केली आहेत, जी पद--कमले कपटी कांचन-मृगामागे तिच्यासाठी धावली, जी पद-कमले भगवान शंकर आपल्या मन-मानसात सदैव धारण करुन असतात व ज्या पद-कमलाच्या पादुकांची पूजा सदैव करुन त्यांची स्थापना भरत-मनामध्ये कायमची झाली आहेत अशी ती पावन-तम श्रीरामांची चरण-कमले मी आज पाहून धन्य धन्य होईन. बिभीषण रामांकडे आल्याचे कळताच राजनीतीनुसार सुग्रीवाने त्याला बंदी बनवावे असे सुचविले परंतु राम म्हणाले, "हे सख्या, सुग्रीवा, राजनीती म्हणून तुमचा हा सल्ला अगदी योग्य आहे. परंतु जो कोणी शरण येतो त्याला अभय देऊन त्याचे रक्षण करणे हा

माझा बाणा आहे. कारण कितीही कोट्यवधी पापे त्याने केलेली असली तरी मजसमोर येताच त्याची सर्व पापे क्षणार्धात भस्म होतात. शिवाय जो दुष्ट, दुर्बुध्दी असेल तो मला शरण येतोच कशाला? कारण तो भक्तीमार्गापासून नेहमीच खूप दूर असतो. जर तो शत्रू म्हणून तो आला असेल तर त्याचा नि:पात करायला एकटा लक्ष्मण समर्थ आहे व शरण आला तर मात्र मी त्याचे माझ्या प्राणांप्रमाणे रक्षण करेन. तेव्हा कोणत्याही दृष्टीने विचार करतां तो आपली कोणतीही हानी करु शकणार नाही.'' हनुमानाला या राम-वचनांनी फार फार आनंद झाला.

त्या नंतर बिभीषण रामांना 'त्राही त्राही रघुवीर' असे म्हणत दंडवत प्रणाम करीतच शरण आला. त्याबरोबर राम प्रभूंनी त्याला उठून आपल्या हृदयाशी धरले. व त्याला अगदी प्रेमाने आपल्याजवळ बसवून घेऊन 'लंकेश' असे त्याला संबोधून त्याचेशी बोलायला सुरुवात केली. दुष्टांच्या संगतीत राहूनही तुमचा सज्जन धर्म कसा टिकवून ठेवला आहे असे अत्यंत प्रेमभराने विचारले. त्यावर बिभीषण म्हणतो, हे प्रभो, एकदा हृदयात तुमची प्रतिष्ठापना केली की तुमच्या कृपेमुळेच केवळ माझ्यासारखा अत्यंत अधम, निशिचर दुष्ट संगात राहूनही आपल्या कृपेच्या बळावरच स्वधर्म राखू शकतो. जसे बत्तीस दातांमध्ये जीभ राहते तसे. अन् त्याच आपल्या कृपेमुळे आज आपले चरण-कमल या नेत्रांनी पाहण्याचे सद्‌भाग्य लाभले. तेव्हा बिभीषणाला राम आपला बाणा, स्वभाव वा ब्रीद सांगतात- संपूर्ण चराचराचा द्रोही जरी असला तरी जर तो मला शरण आला,पण कसा तर सर्व मोह, मद, छल कपट टाकून आपण पापी आहोत या भीतीच्या भावनेतून, तर मी त्याला तत्काळ संत बनवतो. माता-पिता, भाऊ, स्त्री-पुत्र, सुहृद-परिवार, धन इतकेच नव्हे तर जो आपला देह – या सर्वांच्या आसक्तीचे धागे तोडून मन माझ्या पायी घट्ट जखडून ठेवतो तो मला तुमच्या सारखा संत म्हणून प्रिय होतो. जो हर्ष-शोक-भय रहित होतो त्याचेवर माझा समदर्शीत्वाच्या स्वभावास थोडासा अपवाद करुन मी विशेष लोभ करतो. जे दुसऱ्यांचे सदैव हित करतात तसेच जे दृढ नेमपूर्वक सगुणाची उपासना करतात, ब्राह्मणांविषयी ज्यांना प्रेमादर असतो, असे मानव मला प्राणांप्रमाणे प्रिय होतात.- ''हे सारे गुण लंकेशा, तुमच्यात आहेत म्हणून तुम्ही मला अत्यंत प्रिय आहांत.'' हे ऐकताच बिभीषण तृप्त झाला न् तत्क्षणी रामांचे

त्याने वारंवार पाय धरले व त्यांचेकडे **'शिव-मन-भावनी' अशी भक्ती स्तुतीपूर्वक मागीतली. त्यावर रामांनी 'तथास्तु' म्हटले.**

नंतर समुद्राच्या पाण्याने बिभीषणास 'लंकाधिराज' म्हणून राज्याभिषेक-प्रतिकात्मक केला अन् हे करतांना प्रभूंना अतिशय संकोच ही वाटत होता (प्रत्यक्ष राज्य न दिल्यामुळे). त्यानंतर लंकेत जाण्यासाठी सागर-पार होण्याचे हेतूने बिभीषणाचा सल्ला विचारताच त्याने सखा-राजा म्हणून सागराची प्रार्थना करण्याचा सल्ला दिला. तो सल्ला लगेच लक्ष्मणाच्या मनाविरुध्द असूनही रामांनी शिरोधार्य मानून तीन दिवस सागरापुढे दर्भासनावर बसून अन्न पाणी न घेता प्रायोपवेशनपूर्वक त्याची प्रार्थना ते करीत राहिले.

बिभीषणा पाठोपाठ रावणाने आपले गुप्तहेर पाठवले. त्यांनी बिभीषणास रामांनी लंकाधिपती म्हणून राज्याभिषेक केल्याची वार्ता व सागरास प्रार्थना केल्याची वार्ता रावणास दिली. तीन दिवस सागराची प्रार्थना करुन त्याची काहीच प्रतिक्रिया नाही हे पाहताच रामाने लक्ष्मणास सागरावर बाण सोडण्यास सांगितले. त्याचबरोबर प्रत्यंचेवर बाण चढताच सागर विप्ररुपाने रत्नभांडारचा नजराणा घेऊन रामांना शरण आला व त्याने प्रभूंची क्षमा मागितली. सागरानेच नल-नीलांकरवी सेतू बांधण्याची कल्पना रामांना सांगताच रामांना आनंद झाला. प्रत्यंचेवरील बाण सागराच्या उत्तर-तीरावरील दुष्टांचा संहार करण्यासाठी वापरला.

समुद्र आपल्या स्थानी परतला, तो रघुपतींच्या उदार गुणाची प्रशंसा करीतच.

फलश्रुती –

रघुनायकाचे सारेच गुण सर्वांचे मंगल करणारे असे आहेत. असे गुण जे गातांत, प्रेमादराने ऐकतात ते कोणत्याही जहाजाविना हा भवसागर सहज पार करूं शकतात. म्हणून हे शठ-लबाड मना, तू हे रघुपतींचे गुणगान सतत करीत रहा. या रघुपतींच्या गुण-गानांमुळे सर्व संशय विनाश पावतील, दुःख निराशा इत्यादीचे दमन होईल व हृदय हे (रघुपती) सुख-सदन होईल मग तेथे या कलिकाळाच्या दोषांना अवसर कुठला?

॥ सुंदर काण्ड समाप्त. ॥

# लंकाकांड

अनुवादक कृत मंगलाचरण –

(१) अहंकार रुपी दशानन , मोहरुपी कुंभकर्ण आणि कामरुपी मेघनाद अशा सर्व शत्रुंचा त्यांच्या समस्त परिवारासह समूळ नाश करुन मिथिलापती राजकन्या सीतारुपी शांतीसह असणारे राम मला अभय देवोत.

(२) मनुष्य पुष्कळ अमृत पिऊन जरी रोगांपासून मुक्त झाला तरी ते स्वर्गीय अमृत जन्मभय व प्रपंच यांचे निवारण करु शकत नाही. तेव्हा महाभयाचे निवारण करणारे श्रीगुरुचरणाचे प्रक्षालन तीर्थ अतिपुण्यरुपी धनाने तोषविलेला प्रभूकृपांकितांनाच मिळते .

मूळ मंगलचरण –

(१) शंकर सेवित कालरुपी मदोन्मत्त हत्तीचा सिंह जसा नाश करतो तसे भवभयाचे हरण करणारे योगीजनात श्रेष्ठ, केवळ ज्ञानानेच जाणले जाणारे, गुणसागर , अजिंक्य असे व निर्गुण निराकार , मायातीत, परमेश्वर, दुष्टांचा वध करण्यात तत्पर, जे ब्रह्मवृंदांचे मुख्य देव आहेत, (किंवा ब्राह्मण ज्यांना वंदनीय आहेत) मेघाप्रमाणे कांतीमान व कमलनयन असे या पृथ्वीचे पति वा देव – राम त्यांना मी वंदन करतो .

(२) शंख व चंद्र याप्रमाणे सुंदर शरीर असणारे, व्याघ्रांबर नेसलेले, काळासारखे भयानक सर्प व भूषणे (नरमुंडमालादी ) धारण करणारे, गंगा व चंद्र यांना प्रिय असणारे, काशीपती, कलिच्या पापांचा ओघ नाश करणारे, कल्याणाचे कल्पवृक्षच, असे गुणनिधी, कामदेवाला नाश करणारे, गिरीजेचे पती, स्तुती करण्यास योग्य अशा शंकरांना मी वंदन करतो .

(३) श्लोक – संत- सज्जनाना अत्यंत दुर्लभ असा मोक्ष देणारे आणि दुष्टांना दंड देणारे शंकर मला (रामभक्ती रुपी सुख वा कल्याण ) देवोत.

दो. – लव निमेष ,परमाणु, युग वर्ष काल रुपी भयंकर बाण ज्यांच्या भात्यात आहेत किंबहूना काळ हेच ज्यांचे धनुष्य आहे. अशा रामाला हे मना तू कां भजत नाहीस?

सागराचे म्हणणे ऐकताच सचिवांना राम म्हणतात आता सेतू बंधन कार्यात विलंब का होत आहे? लवकर सेतू बांधा म्हणजे सारे वानर सैन्य सागरपार जाईल. त्यावर जांबुवान हात जोडून रामांना म्हणतो, **हे नाथ तुमच्या नामसेतुने मानव हा भवसागर (सहजी) पार कारतात.** त्यापुढे हा सागर फारच लहान आहे. आता सेतू बांधून तयार होईल; फक्त आपण आज्ञा द्यावी. त्यानंतर रामाज्ञा होताच नल- नीलांनी क्षणार्धात रामनामांकित भल्या मोठ्या शिळा प्रस्तरांनी रामसेतू तयार केला देखील! अन् त्या सेतुवरुन सारी वानर सेना सागरपार गेली सुद्धा! ते पाहून सागर पार जाताच रामांनी शंभूची स्थापना करण्याचा मनोदय व्यक्त करताच सुग्रीवाने वानरांच्या खांद्यावरुन अनेक ऋषी मुनींना तेथे आणले अन तेथे **रामांनी 'रामेश्वर' स्थापना करुन यथासांग पूजा स्तुती करीत शंकराचे - रामेश्वर महात्म्य खास स्वमुखाने गायले.**

सागरावर सेतू बांधून त्यावरुन वानरसेनेसह राम-लक्ष्मण आल्याची वार्ता कळताच मंदोदरी व रावणपुत्र प्रहस्त, माल्यवान रावणाला सीता परत देण्याविषयी पुन:पुन्हा सांगतात. पण रावण सर्वांकडे दुर्लक्ष करीत गाण्या-बजावण्याच्या जलशात आपले मन रमवितो.

तर तिकडे सुवेल पर्वत-शिखरावर साऱ्या वानरसेनेचा तळ पडतो. अन् रामांना चंद्रातील डागाचा श्यामवर्ण पाहून भरताची व चंद्रकिरणांनी विरहाग्नी प्रज्वलित झाल्याने सीतेची आठवण होते. पण त्याच चंद्राच्या डागातील श्यामलतेचा अर्थ हनुमान चंद्रहृदयातील राममूर्ती असा करतो.

रावण रमत असलेल्या त्या जलशात तो मंदोदरीलाही तिच्या मनातील विचारांची दिशा बदलण्यासाठी घेऊन जातो. त्या टाळ-मृदुंगांचा आवाज व विजेसारखी चमकणारी मंदोदरीची कर्णफुले राम आपल्या बाणांनी छेदून रावणाच्या छत्र व मुकुटासह धरणीवर पाडण्याची विचित्र लीला करतात. तेव्हा मंदोदरी अधिकच धास्तावते व रामांचे परमेश्वरी विराट रुप वर्णन करुन पुन्हा रावणाला उपदेश करते पण तोही तिचा प्रयत्न व्यर्थ ठरतो.

इकडे राम जांबुवानाच्या सांगण्यानुसार अंगदास रावणाकडे शिष्टाई करण्यासाठी पाठवतात.

अंगद शिष्टाई –

रावण सभेत जाण्यापूर्वी मदोन्मत्त रावण-पुत्राने अंगदाला लाथ मारताच तोच त्याचा पाय धरुन अंगद त्याला यमसदनी पाठवतो. ते पाहून धास्तावून त्याला आपोआपच रावण-सभेचा रस्ता राक्षस दाखवतात व त्यातल्या एकाला तो स्वत: आल्याची वर्दी देण्यासाठी पाठवतो. अन् रावण-दरबारात प्रवेश करताच त्याच्या तेजाने सारे सभासद आपोआप उठून त्याला उत्थान देतात. हे पाहून रावण मनातून चांगलाच चवताळतो. साम-दाम-दंड-भेद अशा चारही प्रकारांनी रावणाला सीता परत करुन रामशरण्य स्वीकारायला अंगद सांगतो. वाली, सहस्त्रभुज यांच्यापुढे रावण क्षूद्र ठरल्याचे सांगून भर सभेत त्याचे नैतिक खच्चीकरण करतो. तर रावण कैलास पर्वत हलवण्याचे व आपली दहाही शिरे शंकराला अर्पण केल्याच्या कथा सुनावतो. अन् जेव्हा रामाला 'नर' किंवा 'मनुज' म्हणून त्यांचा अपमान करतो तेव्हा अंगदातला रामभक्त खवळतो अन् चवताळून तो आपला हात इतक्या जोराने आपटतो की भूकंप झाल्याप्रमाणे सारी सभा दोलायमान होते. बरेच सभासद आपापल्या जागेवरुन पडतात अन् रावणही सिंहासनावरुन हलल्याने त्याचे मुकुट खाली पडतात. त्यापैकी काही मुकुट अंगद चटकन रामांच्या दिशेने फेकतो. दुरुन येत असलेले ते तेज:पुंज मुकुट न ओळखल्यामुळे उल्कापाताच्या भीतीने सारे वानरगण भितात. तेव्हा राम सर्वांना ते रावणाचे मुकुट अंगदाने फेकलेले येत असल्याचे सांगताच सारे शांत होतात. या अंगदकृतीने धास्तावलेल्या सभेस धीर देऊन रावण त्या कपिस- अंगदास धरुन आपटून मारण्याची आज्ञा देतो. तेव्हा तर प्रभूस्मरणपूर्वक अंगद आपला एक पाय ठाम रोवून उभा राहतो अन् प्रतिज्ञा करतो की हा माझा पाय उचलून दाखवाल तर सीता आम्ही हरलो असे समजून राम तुमच्याशी युध्द न करता परत जातील. तेव्हा तर रावण त्वेषाने एकेका शूरवीरांना त्याचा पाय धरुन त्याला आपटा असे पुन्हा सांगतो पण मेघनादापासून एकापेक्षा एक पराक्रमी शूर वीर अंगदाचा पाय हलवूही शकत नाहीत. तेव्हा रावण स्वत: सिंहासनावरून उठून त्याच्या- अंगदाच्या पायाला हात लावताच अंगद म्हणतो, "अरे दशानना, माझे पाय धरण्यापेक्षा करुणासागर श्रीरामांचे चरण धर, त्यात तुझे कल्याण आहे." तेव्हा लाजून

रावण आपल्या सिंहासनावर खाली मान घालून बसतो. अशा प्रकारे रावणाचे-शत्रूचे नैतिक, बौध्दिक व शारीरिक बलाचे खच्चीकरण करुन अगंद रामांकडे 'रिपुहित आमचे कार्य करावे' – हे रामवचन सफल करुन परततो.

अशाप्रकारे राजनीतीदृष्ट्या अंगद शिष्टाई असफल होते व राम अंगदाचे कौतुक करुन रावणाचे मस्तकीचे मुकुट तुमच्या हाती कसे सापडले असे विचारताच अंगद चतुरतेने सांगतो साम-दाम किंवा दान-दंड व भेद हे राजाचे चार गुण रावणाला सोडून आपल्या आश्रयास मुकुटाचे रुपाने आले आहेत.

राम-रावण युध्द –

नंतर सुग्रीव, बिभीषण व जांबुवान यांच्या सल्ल्याने चार दिशांना सेनापती नेमून चार तुकड्यांमध्ये वानरसेनेची विभागणी करुन राम युध्दाचा प्रारंभ लंकेवर आक्रमण करुन करतात.

तर तिकडे शेवटचा एक प्रयत्न म्हणून चौथ्यावेळी रावणाची समजूत काढण्याचा प्रयत्न मंदोदरी करते. हनुमानाने अखयास मारले व लंकेचा विध्वंस केला. अंगदाने आणखी एक पुत्र मारुन वानर-बल-प्रदर्शन भरसभेत केले. लक्ष्मणरेषा साधी ओलांडता आली नाही. मारीचाने सांगितलेला रामबाणाचा प्रताप ध्यानी घेतला नाही- हे सारे सीता लंकेत आल्यापासून लंकेतली शांती हरपल्याचे मंदोदरी सांगते व शेवटी म्हणते एवढीच सीतेची अभिलाषा होती तर त्या जनकसभेत धनुर्भंग करुन वा तेव्हाच रामाशी युध्द करुन तिला जिंकून आणायची होती. 'विनाशकाले विपरीत बुध्दी' त्यागा अन् अजूनही सीतेला सन्मानाने परत करा पण हा तिचा शेवटचा प्रयत्नही असफल ठरला.

शेवटी वानरसेनेचा लंकेभोवती वेढा पडला अन् वानर तटा-बुरुजावरुन लंकेत मोठमोठ्या शिळा, पत्थर, झाडांचे ओंडके यांचा मारा करु लागले. तर (पश्चिमेकडे) हनुमानाने एक मोठा पर्वत मेघनादावर टाकला अन् रथ, सारथ्यासह त्याचा नि:पात करुन एक लाथ मारुन त्याला बेशुध्द केले. त्याबरोबर दुसऱ्या एका सूताने त्याला दुसऱ्या रथातून लंकेत राजवाड्यात नेले. तर इकडे वानरांनी सुमारे अर्धे राक्षस सैन्य सलामीलाच गारद केले.

शुध्दीवर आल्यानंतर रणांगणातून परत आणण्याबद्दल इंद्रजिताने सूताचा धिक्कार केला. पण मनातून लाजून रावणाला आपला पराक्रम उद्या दाखवेन असेही म्हणाला. अन् त्याप्रमाणे दुसरे दिवशी मेघनादाने तुंबळ मायावी युध्द केले व लक्ष्मणावर वीरघातिनी ही तेजस्वी शक्ती सोडून त्यास बेशुध्द केले.

हनुमानाने बेशुध्द लक्ष्मणाला रामांपुढे ठेवताच जांबुवानाने सुषेण वैद्याला आणण्यास सांगितले. त्यानुसार सूर्योदयापूर्वी संजीवनीचा उपचार झाल्यास लक्ष्मण सावध होईल असे सांगितले, त्याबरोबर हनुमान संजीवनी आणण्यासाठी निघाले.

राम-विलाप –

लक्ष्मणाची आजवर कधीही अनुपस्थिती न जाणवल्याने रामांना त्यांचा विरह असह्य झाला अन् अत्यंत हृदयद्रावक असा अति करुण विलाप राम करुं लागले. पत्नीसाठी प्रिय भावाला गमावून अयोध्येत मी आता सुमित्रेला कसे तोंड दाखवूं? प्राणाधार असा तूं मला उठून समजावीत कां नाहीस? तर हनुमंताने सुषेणाला नेल्याचे कळताच त्याच्या कार्यात विघ्न निर्माण करण्यासाठी रावणाने कालनेमीची नियुक्ती केली, पण रामकृपेने त्या संकटातून निर्विघ्नपणे पार पडून हिमालयातील संजीवनीचे शिखर (पर्वताचा एक भाग) घेऊन पुन्हा असे विघ्न नको म्हणून हनुमंत मार्ग बदलून अयोध्येवरुन लंकेकडे निघाले. अयोध्येवरुन महाकाय राक्षस कोण जात आहे या शंकेने भरतांनी एक बोथट बाण मारताच 'राम राम' म्हणत हनुमान त्या शिखरासह कोसळले. 'राम' ध्वनी ऐकताच भरतांनी रामस्मरणपूर्वक हनुमंतास बेशुध्दीतून जागे केले. त्यांचे कडून सारी वार्ता कळताच भरत पुन्हा आत्मग्लानीने हळहळले. तेव्हा त्याच बाणावरुन त्वरीत जाण्याची युक्ती भरतांनी सांगताच एक क्षणभर अभिमानग्रस्त हनुमंत झाले पण रामकृपेने त्वरीत सावरले व रामस्मरण व भरतबाहुबल प्रतापाच्या स्मरणाने त्वरीत रामांजवळ पोचले. लगेच सुषेणांनी उपचार करताच लक्ष्मण उठून बसले.

सुषेण वैद्यामुळे लक्ष्मण उठून बसल्याची वार्ता हेराकडून कळताच रावणाने कुंभकर्णाला झोपेतून उठवण्याचा प्रयत्न सुरु केला. अथक प्रयत्नांनी जेव्हा कुंभकर्ण जागा झाला तेव्हा रावणासह सर्वांची म्लानमुद्रा बघून रावणाने सीता-हरणापासून सर्व वृत्तांत त्याला कथन केला व युध्द करण्यासाठी त्याचे पुढे आहार म्हणून कोट्यवधी मदिरांचे घट व रेडे ठेवले. त्या तामसी आहारामुळे एक क्षण आठवीत असलेले रामरुप तो विसरला अन् खाऊनपिऊन मदोन्मत्त होऊन एकटाच अस्त्र-शस्त्राविना युध्दभूमीवर पोचला. रावणापेक्षाही तो बलवान व प्रतापी असल्याने वानरसेनेत एकच पळापळ सुरु झाली. हनुमंतासारख्या बलवीराला तर त्याने क्षणार्धात मुर्च्छित केले. ते सारे पाहून रामांनी समोर चाल करुन येणाऱ्या कुंभकर्णाला एकाच बाणाने संपविले. पण त्याचे तेज प्रभूंनी आपल्या मुखात सामावून घेतलेले पाहून देवांनी स्तुती करुन पुष्पवृष्टी केली.

कुंभकर्णवधाने चवताळलेला मेघनाद तुंबळ युध्द करु लागला. लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण साऱ्यांना बाणांनी जर्जर करुन त्याने रामांना नागपाशात बध्द केले. पण नारदांनी त्वरीत गरुडाला पाठवून त्यांचेकरवी रामांना पाशमुक्त केले. जांबुवानाने त्रिशूल मारुन मेघनादाला मूर्च्छित केले. मूर्च्छेतून जागा होताच रावणाला समोर पाहून तो फार लाजला, आणि पर्वतगुहेत जाऊन 'अजय-यज्ञ' करु लागला.

तेव्हा रामांनी सर्व वानरांना यज्ञ विध्वंस करण्यास सांगितले व त्या गुहेतून बाहेर येताच लक्ष्मणांनी रामस्मरण करून त्यास अत्यंत भयंकर बाणांनी विध्द करुन ठार मारला.

कुंभकर्ण, मेघनाद व असे भले भले रणशूर योध्दे व बरेच सैन्य नाश पावल्यावर आता रावण स्वत: रथात बसून अस्त्र-शस्त्र सज्ज होऊन रामांविरुध्द लढण्यासाठी निघाला. पूर्ण तयारीनिशी सैन्य व सेनापती-रावण समोर येताना पाहून बिभीषण रामांकडे पाहून धास्तावला. रामांवरच्या अतीव प्रेमाने काळजीत पडून तो रामांना म्हणतो, समोर शत्रू इतका सज्ज होऊन रथातून येत आहे अन् आपल्या पायांत पादत्राणही नाही तेव्हा अशा परिस्थितीत आपण रावणावर

विजय कसा मिळवणार? तेव्हा रामांनी भक्त बिभीषणाला निश्चित विजय प्राप्त करुन देणारा धर्मरथ स्वत:जवळ असल्याचे फार सुंदर तऱ्हेने सांगितले. रावणाच्या या अस्त्र-शस्त्र सज्ज रथावरुन त्याला एखादेवेळी विजय मिळेल किंवा नाहीही. पण माझ्याकडे सदैव आणि निश्चित जय देणारा असा धर्मरथ आहे पहा –

स्वधर्म-स्वकर्तव्य-सुकर्माचा 'धर्म' हाच माझा रथ आहे. शौर्य आणि धैर्य ही दोन चाके या रथाला आहेत. सत्य आणि सुशील (उत्तम चारित्र्य व स्वभाव) ही दृढपताका व ध्वज या रथावर नेहमी झळकत असतात. सामर्थ्य, विवेक, इंद्रियदमन व परहित करण्याची बुध्दी हे चार घोडे या रथाला जोडलेले आहेत. क्षमा, कृपा व सर्वत्र समभाव हा त्रिपेडी लगाम या घोड्यांना नियंत्रित करतो. भगवंतचरणी दृढविश्वास व श्रध्दापूर्वक भजन व सेवा हा या रथाचा सुजाण-समंजस सारथी आहे. संतोषाची तलवार व वैराग्याची ढाल, दानाचा परशु, उत्तम सद्‌बुध्दी रुपी प्रचंड शक्ती नावाचे शस्त्र, श्रेष्ठ विज्ञानरुपी कठीण धनुष्य, आणि शम-यम-नियमरुपी अनेकविध बाण असून खांद्यावरील मागे बांधलेला भाता म्हणजे अत्यंत स्थिर व निर्मल मन होय. विप्र आणि गुरुपूजेचे अभेद्य असे कवच वा चिलखत सदैव अंगी बाळगल्यावर अशा धर्मरुपी रथावर आरुढ झाल्यावर खरं तर समोर समान बुध्दिमुळे शत्रूच उरत नाही. (अजातशत्रू). अन् यदाकदाचित असलाच एखादा छुपा शत्रू तर तो या सर्व अस्त्र-शस्त्र सज्ज रथापुढे टिकाव धरेल काय? हे रामांचे सुंदर बोलणे ऐकून बिभीषण शांत झाला.

## निकराचे राम-रावण युध्द –

रावण मायावी युध्द करुन अगणित राम-हनुमान निर्माण करुन वानरसेनेस भयचकित करुं लागला. हनुमान-रावण, लक्ष्मण-रावण, यांची ही तुंबळ युध्दे झाली. पण सर्वांनी रामांची प्रार्थना करुन युध्दास आरंभ केल्याने रावणावर त्या सर्वांना विजय मिळाला. रावण बेशुध्द होताच सारथी त्याचा रथ रणांगणातून दूर नेई. एकदा जांबुवंतानेदेखील रावणाला परास्त केले होते. एकदा जेव्हा रावणाने बिभीषणावर शक्ती सोडली तेव्हा भगवंतांनी त्वरीत

त्याला मागे खेचून ती शक्ती आपणावर घेतली. त्या दिव्य शक्तीने राम कांही काळ मूर्च्छित झाले, हे पाहून बिभीषण रावणावर गदा घेऊन धावला. नंतर रामांनी अनेक बाण सोडून त्याची दहा शिरे व वीस बाहू छेदले की ते पुन्हा पुन्हा नव्याने निर्माण होत-शंकर वरदानामुळे. त्यामुळे रावण आपले मरण जणूं विसरला व त्याने रणांगणावर थैमान सुरु केले. शेवटी इंद्राने मातली या आपल्या दिव्य सारथ्यासह रथ पाठवला. त्या रथावर आरुढ होताच वानरसेनेला नव्याने उत्साह भरला. बिभीषणाकडे प्रश्नार्थक नजरेने पाहताच बिभीषणाने रावणाचे बेंबीत अमृत असल्याचे सांगितले. तेव्हा रामांनी आपल्या धनुष्यावर संधान करुन एकाच वेळी एकतीस बाण सोडले. १० बाणांनी मस्तके, २० बाणांनी बाहू छेदित एका बाणाने बेंबीतील अमृतावर प्रहार करताच रावण संपला. मृत्युसमयी त्याचेही तेज प्रभुमुखात सामावले. त्याबरोबर सर्व ब्रह्मांडात 'जय रघुवीर' हा नाद घुमला. देवांनी स्तुती व सुमने यांचा वर्षाव केला. गंधर्व-गान, अप्सरा-नृत्य व देव स्तुती या सर्वांची एकच झुम्मड उडाली.

मंदोदरीने रावणाचा प्रताप वर्णन करीत व रामगुण गात विलाप केला. ते पाहून बिभीषणही दु:खी झाला. रघुनाथांच्या आज्ञेने लक्ष्मणाने लंकेत जाऊन बिभीषणाकरवी यथोचित उत्तरक्रिया केली व त्यानंतर बिभीषणाचा 'लंकापती' म्हणून राज्याभिषेक केला. त्यानंतर हनुमंताने सर्व वृत्तांत सीतेला कथन केला. मग बिभीषणाने राक्षसींकडून सीतेला अभ्यंग स्नान घालवून विविध आभूषणे घालून पालखीतून रामांजवळ आणली, तेव्हा रामांनी लक्ष्मणास अग्नी प्रदीप्त करायची आज्ञा दिली. अग्निदिव्यानंतर प्रत्यक्ष अग्निनारायणाने (पूर्वी त्याचेकडे ठेव म्हणून सुरक्षित ठेवलेली) सीता रामांना अर्पण केली. ते सीता-राम मीलन पाहून पुन्हा सर्व देव, ब्रह्मदेव, इंद्र यांनी आकाशातून रामांची स्तुती विविध प्रकारे गायली. शंकरांनी मात्र रामांजवळ येवून अष्टसात्विक भावयुक्त अशी रामस्तुती करुन अयोध्येत पुन्हा राज्याभिषेक सोहळा पाहण्याची इच्छा प्रदर्शित केली.

त्यावेळी स्वर्गातून दशरथही रामांचे रावणवधाबद्दल अभिनंदन करुन सगुणभक्ती मागून पुन्हा परत गेले.

आता रामांना भरताची अनिवार आठवण होऊं लागली, म्हणून बिभीषणास त्यांनी पुष्पक-विमानातून अयोध्येप्रत जाण्याची इच्छा सांगताच बिभीषणाने त्या पुष्पकातून अगणित मणि रत्नांचा वर्षाव केला व बिभीषण-अंगद-सुग्रीव-हनुमान, जांबुवान अशा प्रमुख वानरगणांसह पुष्पकातून रामांनी अयोध्येकडे प्रयाण केले.

वाटेत रामेश्वर, दंडकवन, अगस्ती आश्रम, चित्रकूट, प्रयाग गंगा व अयोध्या असे करीत पुन्हा प्रयागात मुक्काम करुन सीतेचा गंगा-नवस फेडून, हनुमंताचेकडून भरताला निरोप देऊन मग पुन्हा पुष्पकातून अयोध्येकडे विमान वळविले.

फलश्रुती –

जे ह्या रघुवीराची समर-गाथा सुजाणपणे सावधपणे गातात, ऐकतात त्यांना भगवंत नेहमीच विजय, विवेक व वैभव प्रदान करतात.

ह्या भयंकर अशा कलि-मलिन काळात **रामनामाशिवाय** हे मना, विचार करुन बघ, तुला दुसरा अन्य कोणताही आधार नाही.

।। लंकाकाण्ड समाप्त ।।

# उत्तरकांड

अनुवादककृत मंगलाचरण –

(१) दिवस असूनसुध्दा मेघपटलाच्या आड असलेला सूर्य जसा दिसत नाही, तसा तो राम मिथ्या मायेच्या आवरणात असल्यामुळे कधीही व काहीही केले तरी मनाने किंवा डोळ्यानी पाहता येणे शक्य नाही. पण श्रीरामाने प्रेरित केलेल्या प्रबळ गुरुकृपारुपी वायुने अज्ञान व भ्रांतीरुपी मेघाला पळवून लावला म्हणजे जो प्रगट झाल्यासारखा वाटतो तोच आत्मारामरुपी राम होय.

(२) वैराग्यरुपी लक्ष्मण, विवेकरुपी हनुमान (वायुनंदन), शमादिषट्‌करुपी भरत, व मुमुक्षारुपी शत्रुघ्न यांना मी वंदन करतो.

(३) आत्मस्वरुपी सिंहासनस्थाच्या मांडीवर स्थिर बसलेली, सर्व क्लेश हरण करणारी विदेहस्थिती व वैराग्य इ. अलंकारांनी भूषित असलेली अनंत सौख्यरुपी दिव्य तेजाने तळपणारी स्वात्मशांतीरुपी विदेह राजकन्या माझे रक्षण करो.

मूळ मंगलाचरण –

(१) मोराच्या कंठाप्रमाणे नीलवर्णाचे, सर्व देवांत श्रेष्ठ, विप्रचरण, कमलचिन्हाने सुशोभित, अत्यंत शोभासंपन्न, पीतांबरधारी, कमलनयनी, सदैव सुप्रसन्न, हाती धनुष्य-बाण धारण केलेले, बंधू लक्ष्मण-सेवित, वानर समूहानेयुक्त, पुष्पकविमानात बसलेले, जानकीपती, स्तुती करण्यायोग्य अशा रघुकुल श्रेष्ठ रामांना मी निरंतर वंदन करतो.

(२) कोसलपुरीचे स्वामी श्रीरामचंद्रांचे सुंदर व कोमल दोन्ही चरण ब्रह्मदेव व शिवांकडून वंदित असे आहेत. जानकीच्या करकमलांनी गोंजारलेले – (अशा राम चरणांचा) चिंतकाचा मनरुपी भ्रमर त्यावर आसक्त झालेला आहे.

(३) कुंदपुष्याप्रमाणे (कोमल), चंद्राप्रमाणे (तेजस्वी ) व शंखाप्रमाणे (गंभीर) असा गौरवर्ण व सुंदर असलेले अंबिकेचे पति इच्छिलेले फळ देणारे, करुणाशील, सुंदर कमलनयनी, कामापासून सोडविणारे असे जे शंकर त्यांना मी नमस्कार करतो.

रामदर्शनासाठी आतुर, विह्वल झालेला आसुसलेला भरत आपल्याच मनाशी म्हणतो आहे की मी अति अधम कपटी म्हणून रामांनी मला आपल्याजवळ ठेवले नाही. त्यादृष्टीने खरोखरच लक्ष्मण महाभाग्यशाली आहे. रामदर्शनाविनाच हा देह अग्नीत जळून नष्ट होणार की काय ? असे आत्मग्लानी वश अश्रूपात करीत असताच विप्ररुपाने तेथे हनुमान आले व त्यांनी राम-सीता-लक्ष्मणासह रावणावर विजय मिळवून येत असलेली अतिसुंदर बातमी दिली. ते ऐकताच भरतांनी हनुमंतास अश्रूभरल्या नेत्रांनी प्रगाढ आलिंगन दिले. अन् ती आनंदवार्ता भरतांनी स्वत: जाऊन गुरु वसिष्ठ व सर्व मातांना सांगितली. त्या मंगलवार्तेने सारी अयोध्या हर्षभराने प्रभुंच्या स्वागतासाठी सज्ज झाली . सर्वत्र गुढ्या–तोरणे उभारली गेली, सर्वत्र केशर-अत्तरांचे सडे घालून रांगोळ्यांनी सारी अवधपुरी सुशोभित झाली. चौकाचौकात प्रत्येक घरात सुवर्ण कलश, पंचारत्या घेऊन सुवासिनी षोडश शृंगाराने सजून रामांना औक्षण करण्यासाठी थव्या-थव्याने मंगलगान करीत निघाल्या.

आपल्या जन्मभूमी अयोध्येचे व अतिपावन शरयू (नदी) मातेचे गुण गान करीत रामांनी पुष्पकविमान शरयूतीरावर उतरवले व त्या विमानास त्याच्या मूळ मालकाकडे – कुबेराकडे जाण्याची अनुज्ञा दिली. वसिष्ठमुनी समोर दिसताच रामांनी आपले धनुष्य-बाण खाली ठेवले व धावत जाऊन त्यांचे चरण धरले. त्यानंतर सर्व विप्रवर –माता, भरत, शत्रुघ्न व प्रजा **प्रत्येकाच्या अभिलाषेनुसार प्रभु सर्वांना विश्वरुप घेऊन एका क्षणात भेटले.** सर्वांनी एकमेकांचे कुशल मंगल सांगण्यात दिवस संपला. सुग्रीव, हनुमान, बिभीषण, जांबुवंत, अंगद या सर्वांनी मानवी देह धारण केले. त्यांची सर्वांना ओळख करुन देत त्यांच्यामुळे रावणाबरोबर युध्दात विजय मिळाला असे अत्यंत विनयाने राम सर्वांना सांगू लागले. सर्वांची भोजने विश्रांती उरकली.

दुसरे दिवशी प्रभाती रामांनी स्वत: भरत-लक्ष्मण व शत्रुघ्नांच्या जटा सोडवून त्यांना अभ्यंग स्नान घातले. स्वत: आपल्या जटा सोडवून सुस्नात व राजभूषणांनी विभूषित झाले. सीतेला सर्व मातांनी मिळून अभ्यंग स्नान घातले व तिलाही षोडश शृंगाराने नटविले. सूर्यालाही लाजवेल अशा राजसिंहासनावर वसिष्ठांच्या आज्ञेने यथासांग वैदिक संस्कारयुक्त असे राम-सीता सुवर्ण

सिंहासनावर विराजमान झाले. प्रथम राजतिलक करण्याचा मान वसिष्ठांचा होता व त्यानंतर सर्व ऋषी-मुनी पुरोहितांनी टिळक लावला. देवांनी दुदुंभीचा निनाद करुन स्तुती सुमने उधळली. वेदांनी बंदीच्या वेषात स्वत: येऊन रामस्तुती केली. त्यानंतर दिलेल्या अभिवचनानुसार शंकरांनीही भावपूर्ण अशी स्तुती करुन अनपायिनी भक्ती व सत्संग रामांकडे मागीतले व प्रसन्नतेने ते कैलासी गेले. ह्या अभिषेक सोहळ्याचे जे विशेष गान करतात वा ऐकतात त्यांना संपत्ती, सुख, वैराग्य, विवेक भक्ती-मुक्ती ज्याला जे हवे ते मिळते असा इथे तुलसीदास खास उल्लेख करतात.

बिभीषण-सुग्रीवादी सारे सहा महिने अयोध्येत प्रभुंच्या सत्संगात राहीले. त्यानंतर राजा रामांनी सुग्रीव, जांबुवान, नल-नील, अंगद अशा सर्वांची सन्मानपूर्वक पाठवणी केली. फक्त एकटा हनुमान सुग्रीवाची आज्ञा घेऊन रामसेवेत अयोध्येत राहीला.

रामराज्य वर्णन –

राम राजसिंहासनावर बसताच केवळ अयोध्या नव्हे तर संपूर्ण त्रैलोक्यात आनंदाचे साम्राज्य पसरले. शोक-भय हे विश्वातून समूळ नष्टच झाले. रामांच्या प्रभावामुळे कोणीही कोणाशी शत्रुत्व करीत नव्हते. सारेजण एकमेकांवर भरभरुन प्रेम करीत होते. प्रत्येकजण वेदांनी सांगितल्याप्रमाणे आपआपल्या वर्ण व आश्रमाचेच आचरण करीत होते. त्यामुळे सगळे सुखी, निर्भय, निरोगी व शोक रहीत झाले. रामराज्यात आधिभौतिक, आधिदैविक वा आध्यात्मिक कोणताही ताप कोणालाही होत नव्हता. स्वप्नात देखील कुणी पाप करत नसल्याने सगळे परिपूर्ण धर्मशील असे पुण्यात्मे होते. सारेच जण रामभक्तीरत बनल्यामुळे सर्वजण परमगतिचे म्हणजे ज्याच्या त्याच्या आवडीनुसार भक्ती-मुक्तीचे अधिकारी बनले होते. सर्वांचे देह निरोगी, सुंदर असून कोणाला कसलीही पीडा नव्हती की अल्पमृत्युही नव्हता. रामराज्यात कोणी दीन, दु:खी, दरिद्री, लक्षणहीन वा अज्ञानी नव्हता. सारेच जण अंतर्बाह्य शुध्द, धर्मरत असलेने अंत:करणाने सरळ व गुणी व ज्ञानी होते. धूर्तता शोधूनही सापडत नव्हती.

संपूर्ण चराचरात काल (त्रेतायुगानुसार) कर्म वा प्रकृती व त्रिगुण यानुसार कोठेही 'दु:ख' नव्हते. त्रेतायुगात कृतयुगाचे परिणाम सारे अनुभवत होते.

सप्तव्दिपाचे एक सम्राट 'रघुपती राजाराम' शोभायमान होते. रामराज्यातील सुख व संपदा किंवा वैभव, ऐश्वर्य काय वर्णावे ! त्यांचे परिपूर्ण वर्णन शेष व शारदा देखील करुं शकणार नाहीत. इतके सारे उदार व विप्रांची सेवा करणारे होते. स्त्रिया पतिव्रता तर पुरुषही एक पत्नीव्रती होते.

'भेद' शब्द नृत्यात, 'दंड' संन्याशांचे हातात, 'जिंका' हे शब्द मनाचे बाबतीत असे रामराज्यात होते. सगळीकडे सदा-सर्वदा सारे वृक्ष लतावेली फळाफुलांनी लगडलेल्या, बहरलेल्या होत्या. वैर विरहित वृत्तीने पशू-पक्षीदेखील वनातून सर्वत्र एकत्र हत्ती, वाघ, सिंह इ. असे हिंडत होते. वैर तर सोडाच, सारे पशू-पक्षी एका कुटुंबातले असल्याप्रमाणे एकमेकांशी प्रेमाने रहात होते. सगळीकडे निर्भयपणे सारे पशु विचरण करीत तर पक्षी मधुर किलबिलाट करीत. सर्वत्र मंद, शीतल, सुगंधी वारे वहात असे. त्यामुळे सर्व फुलांचा सुवास सगळीकडे भरुन राही व कमळांच्या सुवासाने सदैव भुंगे त्यावर गुंजारव करीत असत. मानवाला हवा असेल तेव्हा हवा तेवढा मध वृक्ष देत असत, तसेच गायी देखील माणसांना हवे तेवढे हवे तेव्हा समोर येऊन पान्हा सोडून दूध देत असत. (धार काढावीच लागत नसे) सारी धरणी धान्यरुपी धनाने नेहमी संपन्न अशीच होती. पर्वतावर रत्न, मणी-माणकांच्या खाणी उघडपणे सहजी हाती लागत. सर्वत्र नद्या ह्या अत्यंत शुध्द, मधुर, शीतल, सुखदायक असेच जीवन (पाणी) सर्वांना देत असत. सागर आपल्या मर्यादेत राहून रत्नाकर बनून तीरावर रत्नांची पखरण करीत. सगळीकडचे तलाव विविधरंगी सुवासिक कमळांनी गच्च भरलेले असत, त्यामुळे त्या कमळांच्या मंद मधुर सुखदायी परिमलाने सारा आसमंत, साऱ्या दिशा भरुन रहात असत. चंद्र दररोज पौर्णिमेप्रमाणे आपली आल्हाददायक व शीतल किरणे पसरीत असे तर सूर्य जेवढी पाहीजे तेवढीच उष्णता देत असत, आणि मेघ सुध्दा हवा तेवढाच व हवा तेव्हाच पाऊस रामराज्यात देत असे.

अयोध्येच्या चारही दिशांना पक्के कोट म्हणजे तटबंदी असून त्यावर रंगीत बुरुज होते. गगनचुंबी महाल, वाडे, घरे होती. गच्च्यांवर विविधरंगी फरशा होत्या अन् राजप्रासादापासून ते सामान्य घरापर्यंत सर्वत्र रत्न-मणी यांनी साऱ्या वास्तू सुशोभित केलेल्या होत्या. प्रत्येक घरामध्ये रामचरित्रांचे (wall paper) चित्रे काढलेल्या तसबिरी व भिंतीवर रंगाने रामचरित्रे काढलेली दिसत. प्रत्येकाच्या घरी फुलांची बाग प्रयत्नपूर्वक विशेष सजविलेली असे, म्हणजे रंगसंगती व सुवासांचा विचार करुन. बहुतेकांच्या घरी मोर, हंस, सारस, पोपट, कबुतरे असे पक्षी पाळले जात व त्यांचे तोंडी रामगुण यश हेच असे, कारण दररोज प्रत्येकाच्या घरात रामकथा सांगितली जाई व लहान मुलांवर ते संस्कार असल्याने ती मुले पक्ष्यांना तेच म्हणायला शिकवत असत.

राजव्दारापासून ते अंत:पुरापर्यंत राजमहाल तर इतका वैभवशाली व सौंदर्यपूर्ण सजविलेला असा भक्कम व बंदिस्त-सुरक्षित होता की ते सारे वर्णनातीतच होते. सर्वत्र भले मोठे व स्वच्छ, सुंदर रस्ते, बाजार, चौक यांची उत्तम नगररचना देखणी अशी होती. अयोध्येच्या उत्तरेस स्वच्छ, शीतल गोड पाण्याने वाहणारी शरयू नदी होती. तिच्या काठी उत्तमोत्तम असे घाट बांधलेले होते. सर्वात दूर हत्ती, घोडे यांचेसाठी घाट, पुरुषांसाठी वेगळा व स्त्रियांसाठी वेगळा असे घाट असून राजघाट तर सर्वात मनोहर असा होता. प्रत्येक घाटावर विविध मंदिरे सोन्याच्या कळसाने तळपत होती. मंदिराभोवती मुद्दाम लावलेल्या बागा-उपवने ज्यात तुळशी, बेल, शमी, सुवासिक व रंगीबेरंगी फुले होती. अयोध्येच्या बाहेर बाहेरुन येणाऱ्या प्रवाशांसाठी सुंदर तलाव व त्याभोवती मंदिरे अन् फळा-फुलांनी लगडलेले वृक्ष-वेली होत्या. रम्य वातावरणात पांथस्थांची राहण्याची सोय देखील करुन ठेवलेली होती.

अशा प्रकारे रामराज्यात रामाच्या राजधानीत कोठूनही प्रवेशणाऱ्या नवागताचे मन रमेल अशी सोय अगदी नगरीच्या बाहेरपासून केलेली होती. असे सर्वार्थाने सुंदर अशी ही रामराज्य-रचना सहजी कोणाचेही अगदी सामान्यजनांपासून ते ज्ञानी विरक्त ऋषी-मुनींपर्यंत मन मोहीत करणारी होती. म्हणून तर नारद दररोज येऊन नगरीचे सौंदर्य व सत्संग मनात साठवीत ब्रह्मलोकांत ब्रह्मदेवांना हा समाचार देत असत. नारद-सनकादिकांसारख्या

वैराग्यसंपन्न ऋषी-मुनींना लुभावणारी ही रामाची राजधानी कशी असेल याची कल्पनाच केलेली बरी!

रामांची दिनचर्या –

दररोज भल्या पहाटे उठून रामांसह तिघेही बंधू शरयूवर स्नान करुन ध्यान-मानस पूजा संध्यादि आन्हिके उरकून राजप्रासादात मातांसह सर्व वडिलधाऱ्यांना **दररोज साष्टांग प्रणमन** करीत असत. राजसभेत दररोज वसिष्ठांकडून वेद-उपनिषदांचे श्रवण करीत. दुपारी मित्र व अनुजांसह भोजन करताना मातेच्या वा पत्नीच्या स्वयंपाकाचे पोटभर कौतुक करीत, एकत्र भोजन करीत. सायंकाळी दररोज हनुमानासह सर्व बंधूंना घेऊन उपवनात जाऊन सत्संग करीत आणि सर्व देशाची हाल-हवाल हेरांकडून विचारीत असत.

सीता स्वहस्ते स्वयंपाक व मातांसह राम-सेवा करीत असे. कोट्यवधी अश्वमेधांसारखी पवित्र यज्ञकर्मे रामांनी सीतेसह संपन्न केली व त्या निमित्तें अपार असा दानधर्म केला. तिन्ही भावांना दोन दोन पुत्र झाले. सीतेलाही लव-कुश हे रामांचे रुप-गुण शीलाबाबत प्रतिबिंब असे पुत्र झाले. (सीता परित्याग लोक-रंजनार्थ केल्याने त्याचा उघड उल्लेख नाही.)

दररोज सायंकाळच्या सत्संगात कधी सनकादिक, कधी नारदमुनी तर कधी भरत यांचेबरोबर ज्ञान-भक्ती यांवर चर्चा वा प्रश्नोत्तरे होत असत.

रामांचा अयोध्यावासीयांना खास संदेश (भक्तीगीता) –

एकदा राजारामांनी खास आपल्या प्रजाजनांच्या कल्याणार्थ एक विशेष सभा आयोजित केली व त्यात स्वत: सर्वांना मानवदेहाची इतिकर्तव्यता वा कृतार्थता केवळ अन् केवळ गुरुशरण्य व भगवंताची भक्ती असण्याचे प्रतिपादन केले. अन् जो अत्यंत सरळ मनाने हरिनाम सतत घेत राहतो तो खरा भाग्यवान अन् विशेष भक्तीचे सूत्र सांगताना राम म्हणतात, **'विष्णू व शिव दोघांची ही भक्ती करतो तो सर्वश्रेष्ठ असा भगवद्भक्त होय.'**

त्या विशेष सभेनंतर समस्त जनतेने राजारामांचे अभिनंदन स्तुती-गान केले. रामावतार समापन समीप आल्याचे जाणून वसिष्ठांनी रामांची स्तुती केली व प्रेमाश्रूंनी भगवंतास अभिषेक करुन आपले हृदय सदैव निर्मल ठेवावे हा

अतिशय महत्वाचा सिध्दांत सांगितला. अवतार समाप्तीपूर्वी रामांनी पुन्हा हनुमंतांची स्वमुखे अनिवार स्तुती केली अन् त्यावेळी नारदांनी रामस्तुती करताच प्रभूंनी आपली अवतार-लीला लगेचच आवरती घेतली.

अशा तऱ्हेने संपूर्ण रामचरित्र शंकरांनी पार्वतीस, याज्ञवल्क्यांनी भरव्दाजास सांगीतले त्याचा हा पूर्वार्ध इथे संपला.

उत्तरार्धात पार्वतीचे प्रश्न –

(१) कावळ्याला ही रामकथा कशी मिळाली? (२) आपण ती त्याचेकडून कशी ऐकलीत ? (३) गरुड भगवान विष्णू वाहन असून त्याच्यात व कावळ्यात हा संवाद कसा घडला?

उत्तरकांड - उत्तरार्ध –

भगवान शंकर पार्वतीला सांगतात- सतीदेहाचा त्याग तुम्ही दक्ष-यज्ञात केल्यानंतर मी विश्वभ्रमण करताना हिमालयाच्या उत्तरेस नीलगिरीवर गेलो. तेथे काकभुशुंडी ही रामकथा सांगताना ऐकली. तेव्हा तेथे मी हंसरुपाने ती कथा श्रवण केली. राम-रावण युध्दात नागपाशाने बध्द झालेल्या प्रभू रामांना सोडविताना गरुडाला रामांविषयी ते सामान्य मानव असल्याचा मोह झाला होता. तो नाश करण्यासाठी मीच त्याला काकभुशुंडींकडे ही कथाश्रवण करण्याच्या निमित्तें मोहाचा समूळ नाश करण्यासाठी पाठवले.

गरुड काकभुशुंडींकडे जाताच त्यांच्या आश्रमात प्रवेश करण्यापूर्वीच गरुडाचा मोह नाश झाला त्यामुळे विशुध्द मनाने त्याने ही रामकथा अथपासून इति पर्यंत प्रेमादरपूर्वक काकभुशुंडींकडून ऐकली व नंतर त्याला प्रश्न विचारले की अत्यंत तुच्छ असा कावळ्याचा देह आपणांस कसा मिळाला, अन् अशा हीन देहांत ही रामकथा जी सांगता व भगवान शंकरांनी जी आपली स्तुती करुन मला आपणाकडे पाठवले – ते आपले योग-ज्ञान-भक्तीबल या पैकी आपले रहस्य काय?

गरुडाच्या अत्यंत सरळ, सहज व कुतूहल वा जिज्ञासापूर्वक प्रश्नांनी

काकभुशुंडी अति प्रसन्न झाले व सारे आपले जन्मरहस्य त्यांनी सहजी सांगितले कारण जेव्हा श्रोता अत्यंत शुध्द अंत:करणाने हरिभक्त बनून रसिकपणे शुध्द बुध्दिने वक्त्याला प्रश्न विचारतो तेव्हा तो वक्ताही आपले सारे 'गुप्तधन' श्रोत्याला अति उदारपणे प्रदान करतो.

## काकभुशुंडींचे जन्मरहस्य –

या जगात ज्ञानी, योगी, भक्त ऋषी-मुनी कोणीही असो, अगदी ब्रह्मदेव-शंकर सुध्दा एकदा ना एकदा तरी मोहग्रस्त झालेच आहेत. तसेच काकभुशुंडी गरुडाला म्हणतात, मलाही एकदा मोह झाला होता. अयोध्येमध्ये एका त्रेतायुगात रामजन्म झाल्यानंतर मी त्यांच्या बाललीला पाहण्यासाठी गेलो असता, त्या रत्नखचित अंगणात बालराम माझ्याबरोबर खेळत होते. आपल्याच सावलीकडे पाहून नाचत होते. मी जवळ गेलो की ते हसत व लांब गेलो की रडत. मी जवळ यावे म्हणून मला एक अनरश्याचा तुकडा दाखवून माझे मागे पळत होते. त्यावेळी मला वाटले हे कुठले परब्रह्म राम, हे तर सामान्य मानवी बालकाप्रमाणे बाललीला करीत आहेत. इतके मी मनांत म्हटले मात्र.... प्रभुंनी मजवर मायेचे आवरण घातले, हसतां क्षणी मी प्रभुंच्या मुखातून उदरात प्रवेश केला. अन् काय चमत्कार! तेथे मला अगणित ब्रह्मांडे दिसली. त्या प्रत्येक ब्रह्मांडात मी १०१ वर्षे राहीलो, ब्रह्मलोक, शिवलोक, गंधर्वलोक करत करत मी प्रत्येक ब्रह्मांडात रामावतार पाहीला व रामांच्या शिशु लीलांचा आनंद लुटत पुन्हा माझ्या त्या आश्रमात (हिमालयाच्या उत्तरेस) आलो तेथून रामजन्मोत्सवाची वार्ता कळताच अयोध्येत गेलो. पुन्हा रघुवीर माझ्याशी तीच लीला करुं लागले अन् माझी बुध्दि मोहाने भ्रमली व मी व्याकुळ झाल्याचे पाहताच प्रभुंच्या मुखातून मी बाहेर पडलो व पुन्हा प्रभू माझ्याशी बालक्रीडा करुं लागले तेव्हा मी 'त्राहि माम् त्राहि माम्' म्हणत त्यांना शरण गेलो, तेव्हा रामांनी माझ्या मस्तकावर आपला करकमल ठेवला व मला मोहमुक्त केले आणि भक्तवत्सलतेने मजवर कृपा करीत मला वर माग म्हणाले अन् अनेक अष्टसिध्दी, ऋध्दी, ज्ञान, मोक्ष इ. देऊं केले पण त्यात भक्ती नव्हती तेव्हा मी प्रभूंकडे 'भक्तीच' मागीतली. भक्ती मागितल्याने प्रभू माझ्यावर अतिप्रसन्न झाले

व त्यांनी भक्तीसह 'काळ तुला कधीही व्यापणार नाही' असेही वरदान दिले. अनेक प्रकारांनी मला ज्ञान सांगून मला सुखानंदात चिंब भिजवले. खरेच, गरुडा तेव्हापासून क्लेश, दु:ख ते काय हे माझ्या कोशातून कायमचे नष्ट झाले आणि सतत भजनात मला आनंद, खरे सुख मिळू लागले म्हणून तेव्हापासून **पहाटे ध्यान, मानस-पूजा, जप आणि दररोज रामकथा हीच माझी दिनचर्या झाली.**

आता पहिल्या जन्मापासूनची माझी आत्मकथा मी तुला सांगतो, कारण आजवर माझे अगणित जन्म झाले आहेत. माझा प्रथम जन्म कलियुगात शूद्र योनीत पण अयोध्येत झाला बरं का ! पण तेव्हा अयोध्येचा महिमा मला कळलाच नव्हता. त्यावेळी मी शिवभक्त होतो. पण त्याच वेळी विष्णूसह इतर देवांची निंदा करीत होतो. कलीच्या प्रभावामुळे तेथे दुष्काळ पडला म्हणून अनेक वर्षांच्या अयोध्या निवासानंतर मी उज्जयिनीत रहायला गेलो. तेथे एक वैदिक सज्जन ब्राह्मण मला भेटला. अत्यंत दयाळु असल्याने माझ्या बाह्यांगावर भूलून त्यांने मला शिवमंत्र दिला पण हरिनिंदा करु नको उलट शिव हे रामभक्त आहेत तेव्हा विष्णूद्रोहाचे घोर पाप करु नको असे मला त्यांनी परोपरीने सांगितले. पण मी ते मनावर घेतलेच नाही. असेच एकदा ते माझे मंत्रगुरु त्या शिवमंदिरात मी जप करीत असताना आले तरी मी उठून त्यांना प्रणाम केला नाही. हे त्यांनी मनावर घेतले नाही पण प्रत्यक्ष भगवान शंकरांना मी केलेला गुरु अपमान सहन झाला नाही अन् मंदिरात आकाशवाणी झाली– "हे पाप्या, गुरु आले तरी आळशासारखा बसूनच आहेस, जा घोर अशा अरण्यात अजगर बनून राहशील आणि दहा हजार वर्षे क्षूद्र योनीतून भटकत राहशील." ही शापवाणी ऐकून माझे गुरुच घाबरले अन् अत्यंत भावविभोर होऊन गद्गदल्या वाणीने त्यांनी रुद्राष्टकाने-शिवस्तुतीने शंकरांना शांतविण्याचा, प्रसन्न करण्याचा प्रयत्न केला. त्या विप्रस्तुतीने आशुतोष प्रसन्न झाले व विप्राला वर माग म्हणाले. तेव्हा त्यांनी भक्ती मागितली व मजवर कृपा करण्यास सांगितले, तेव्हा शंकरांनी मजवर वरदानांची बरसातच केली. (१) मी सांगीतल्याप्रमाणे यास हजार जन्म मिळतील, पण प्रत्येक जन्म व मृत्युचे याला अजिबात दु:ख

होणार नाही. (२) कोणत्याही जन्मात याचे अध्यात्म-ज्ञान नाश पावणार नाही (३) याच्या हृदयात रामभक्तीचा उद्भव होईल-कारण याचा जन्म अयोध्येत झाला आहे म्हणून. (४) तसेच याला सर्वत्र जाता येईल. कोणत्याही लोकात-ब्रह्मांडात हा सहज प्रवेश करु शकेल. (अप्रतिहतगति)

यानंतर गुरुंनी मला अनेक प्रकाराने विशेष ज्ञान दिले व ते शिवचरणांचे ध्यान करीत आपल्या घरी गेले. त्यानंतर विंध्यपर्वतात मी साप (अजगर) बनून काही काळ राहीलो व त्यानंतर अनेक जन्म माझे झाले. पण शिव व गुरुकृपेने माझे ज्ञान अबाधित राहीले. गुरुच्या करुणामयी स्वभावाचा ठसा माझ्या हृदयावर कायमचा कोरला गेला. नंतर अत्यंत पवित्र असा ब्राह्मण देह मला मिळाला. मला वडिलांनी खूप शिकवण्याचा प्रयत्न केला पण माझ्या मनांत रामचरणांशिवाय दुसरे काही शिरतच नव्हते. त्यामुळे मला शिकवण्याचा नाद त्यांनी सोडून दिला. शेवटी माझे माता-पिता कालवश झाले. मग मात्र मी प्रत्येक रानावनात, आश्रमात, ऋषी-मुनींकडे जाऊन सर्वांकडे सगुण-रामभक्तीच मागितली. पण प्रत्येक जण निर्गुण भक्तीच देऊ लागले. ती निर्गुणोपासना मला भावेना. मग मी फिरत फिरत लोमश ऋषींकडे मेरु पर्वत शिखरावर पोचलो. त्यांनाही सगुण ब्रह्मोपासना द्यायला सांगताच त्यांनीही मला निर्गुण-बोधच द्यायला सुरुवात केली. पुन:पुन्हा मी त्यांना सगुणोपासना देण्याचा आग्रह करताच रागाने त्यांनी मला 'कावळा हो' असा शाप दिला. तोही मी आनंदाने शिरोधार्य करुन पुन्हा कावळ्याच्या रुपात रामभक्तीच मागितली. प्रत्यक्ष रामांनीच त्यांच्या-लोमशांच्या मनांत क्रोध निर्माण करुन त्याव्दारे माझी परीक्षा घेतली. त्या परीक्षेत मी खरा उतरलो हे पाहून आपल्या शापवाणीबद्दल ते मनांत दु:ख करुं लागले. त्यानंतर मोठ्या प्रेमादराने त्यांनी मला बोलाविले. रामांनी प्रेमपरीक्षा घेतल्याचे सांगून माझे समाधान करुन अत्यंत प्रसन्नतेने मला **लोमश ऋषींनी 'राममंत्र' व 'बालराम-ध्यान'- दीक्षा दिली तसेच संपूर्ण रामचरितमानस शंकरांकडून प्रसादरुपाने मिळालेले मला ऐकवले.** अन् हे रामचरित्र जो प्रेमादरपूर्वक जिज्ञासेने विचारेल त्यालाच सांग असे सांगून पुन्हा मजवर वरदानांची बरसात केली.

(१) माझे कृपेने ही रामभक्ती तुझ्या हृदयात अखंड, अविरत दृढराहील.

(२) तूं रामप्रिय होशील व अहंकार रहीत सर्व सद्‌गुणांचे आगर होशील.

(३) तूं हवे ते रुप घेऊ शकशील, इच्छामरण तुला प्राप्त होईल.

(४) तूं ज्ञान व वैराग्य संपन्न होशील.

(५) तुझ्या चार कोसांच्या परिघात अविद्या अज्ञान व्यापणार नाही.

(६) काल, कर्म, गुण जनित कोणतेही दोष दु:ख तुला होणार नाही

(७) सर्व रामरहस्ये जी वेद इतिहास पुराणांत गुप्त आहेत ती तुला आपोआप कळतील

(८) रामपदीं नित्य नव्याने तुझे प्रेम वाढत राहील.

(९) तूं मनांत जी इच्छा धरशील ती पूर्ण होईल.

ब्रह्माने आकाशवाणीने या वरदानांवर शिक्कामोर्तब केले. अन् गुरुकृपांकित असा मी या आश्रमात आज सत्तावीस कल्पे राहतो आहे. जेव्हा जेव्हा त्रेतायुगात रामप्रभू नररुपाने अवतरतात तेव्हा तेव्हा मी त्यांच्या बाललीलांचा आनंद मनमुराद लुटत तेथे पांच वर्षे राहतो. अन् तेच सुंदर असे बालरामांचे रुप मनांत साठवीत इथे या आश्रमात पूर्वी सांगितल्याप्रमाणे माझ्या दिनचर्येत रममाण होतो. रामभक्ती व राममंत्र या कावळ्याच्या योनीत मला मिळाल्यामुळे हा देह मी सोडत नाही. ही तनु मला त्यामुळे अतिशय प्रिय झाली आहे.

ही काकभुशुंडींची अनेक जन्मांची कहाणी ऐकल्यानंतर गरुड त्यांना विचारतो ज्ञान व भक्ती यात भेद काय, किंवा ज्ञान श्रेष्ठ व दुर्लभ असे आजवर वेद-पुराणे, संत-मुनी सांगतात तेव्हा हे मला सर्व सविस्तर सांगा.

ज्ञान-वैराग्य याबद्दल सांगणे व ऐकणे हे ज़वळ जवळ अशक्यच आहे कारण हे दोन्हीही अनुभवण्याचे विषय असल्याने ते शब्दांत सांगणे व समजणे फार कठीण आहे. ज्यावर खरी रामकृपा होते, त्यालाच हे रघुनाथ रहस्य

उलगडते. तरीही सांगतो ऐक-जीव हा ईश्वराचा अंशच असल्याने तो अविनाशी (नित्य), चैतन्यस्वरुप, निर्मल व सहज-सुखानंदमय आहे. पण तो जीव मायेला वश झाल्याने मूळ चैतन्याला जडाची निरगांठ पडते. अन् ती सुटता सुटत नाही. परमेश्वराने कृपा केली तरच ही ग्रंथी सुटते. ज्ञानमार्गाने ही गांठ कशी सोडवायची ते पाहूं –

ज्ञानदीप-रुपक –

परमेश्वर कृपेने सात्विक श्रध्दा रुपी धेनुने ह्रदयात ठाण मांडले व तिला वेद प्रणित शुभ धर्माचरण म्हणजे व्रत--जप-तप नियमरुपी हिरवा चारा जर मिळाला तर 'भाव' वत्स (वासरु) पुढे दाखवताच ती पान्हा सोडते. त्यावेळी निवृत्ती दोरीने तिचे मागचे पाय बांधावेत, विश्वासाचे पात्र असावे, निर्मळ मनाच्या गवळ्याने स्ववश राहून परमधर्मरुपी दूध काढावे. निष्काम रुपी अग्नीवर ते तापवावे. क्षमा व संतोषरुपी वाऱ्याने ते निववावे. मग धैर्यरुपी समतेने विरजण लावावे. विचारांची रवी, प्रसन्नतेची माथणी, सत्याची सुरेख वाणीची दोरी, इंद्रिय दमनाची धारण या सर्वांनी त्या दह्याचे मंथन करावे म्हणजे मग विमल पवित्र शुभलक्षणी वैराग्याचे लोणी मिळेल. प्रवृत्ती व निवृत्तीपर कर्मांच्या शुभ शेण्या (गोवऱ्या) नी योगाग्नी प्रगट करुन त्याचे तूप बनवावे. त्यातील ममता (आसक्ती) रुपी मल (बेरी) जळून जावून शुध्द बुध्दीचे गाळीव तूप म्हणजे ज्ञान होय. ते ज्ञानघृत चित्त रुपी पणतीत भरावे. समतेच्या ठाणवईवर ती पणती घट्ट रोवून ठेवावी. आता त्यात घालण्यासाठीची वात कशी पाहिजे ते पहा – त्रिगुणाचे टरफल, जागृत, स्वप्न सुषुतीच्या तीन अवस्थांच्या बोंडांतून पिंजून पिंजून चौथी तुरीया वेगळी काढून त्याची जाड व घट्ट वात वळावी अन् मग त्या घृताच्या पणतीत ती वात पेटवून विज्ञानाचा तेजोमय प्रकाश उजळावा. मदादिक षडविकार त्याच्या जवळ जाताच पतंगाप्रमाणे जळून भस्म होतील. "सो ऽहं" वृत्तीची महाप्रचंड दीपज्योती अखंड तेवत राहावी. मग त्या सोऽहं ज्योतीच्या प्रकाशात आत्म अनुभवाचे सुख उजळून निघेल. अन् त्या प्रकाशात द्वैतबुध्दी, देहबुध्दी, मोहभ्रम यांचा समूळ नाश होइल. त्या प्रकाशात जीव जड चेतनाची गाठ सोडवेल तेव्हा तो जीव ''कृतार्थ'' होईल.

पण.... ती गाठ सोडत असताना 'माया' अनेक विघ्ने आणते. ऋध्दी-सिध्दी अष्टमहासिध्दी इत्यादींची प्रलोभने दाखवून त्या बुध्दिला ती गाठ सोडण्यापासून परावृत्त करते. अनेक प्रकारांनी बुध्दिचा छळवाद मांडते अन् 'माया देवी' नटून थटून शालू पैठणीच्या पदराच्या वाऱ्याने ती ज्ञान-दीप ज्योत विझवून टाकते. पण जर जीवाकडे सदबुध्दी असेल व त्याने या नटव्या मायेकडे दुर्लक्ष केले तरच.

प्रत्येक इंद्रियांच्या देवता त्या बुध्दिला छळून परावृत्त करतात. पंचविषयांचा प्रभंजन ( सोसाट्याचा वारा वा वादळ) एकदम घुसतो अन् तो ज्ञानदिवा विझवतो. मग जो जीव श्रमतो, थकतो अन् पुन्हा मायेच्या जंजाळात पुनरपि जन्म-मरणं.....च्या चक्रात अडकत राहतो. असा हा ज्ञानाचा मार्ग किती कठीण आहे, तलवारीच्या धारेवरुन चालण्यासारखे आहे. या सर्वांवर मात करुन एखादा जीव 'ज्ञानदीप' अखंड तेवत ठेवतो. पण तोही ज्ञानदीप भक्ती शिवाय अखंड प्रकाशत रहात नाही. म्हणून ब्रह्मज्ञानी देखील ज्ञानोत्तर भक्तीसाठी लुब्ध असतात. (शंकराचार्यांनी ब्रह्मसूत्रे, विवेकचूडामणी बरोबर अनेक सुंदर सुंदर भक्तीने रसाळ अशी स्तोत्रे लिहीली ती याच सिध्दांताची पुष्टी करते.) म्हणून या धारदार तलवारीवरुन-ज्ञानमार्गावरुन चालण्यापेक्षा भक्तीचा मार्ग साधा सोपा सुगम होय. कसा ते पहा.

भक्तीचिंतामणी –

भक्ती हा स्वयंप्रकाशित मणी किंवा रत्न आहे. म्हणून याला दिवा, तेल, तूप, वात (बल्ब, इलेक्ट्रिसीटी, बॅटरी) काहीच नको. हा प्रत्येकाच्या हृदयात स्व-प्रकाशाने नित्य तळपणारा मणी आहे. पण हा हिरा प्रथम जसा कोळशाच्या खाणीत असावा तसा सर्वांच्या हृदयात गुप्त वा सुप्त असतो. आत्माराम रुपी चिंतामणी सद्गुरू दाखवून देतात तेव्हा त्याची जाणीव जागी होते. पण ती नुसती जागी होऊन पुन्हा झोपेतच विझली तर त्याचा काय उपयोग? म्हणून सद्गुरु जे देतात त्याला **स-बीज** नाम म्हणतात. त्यांनी या नामबीजाला उत्तम भूमी रुपी निर्मळ हृदय, वारंवार तण विकार दोष काढणे ही मशागत, सत्संगाचे उत्तम खत-पाणी देत राहीले व सूर्य प्रकाशाप्रमाणे अत्यंत

प्रेमादरपूर्वक ध्यान-जप-मानसपूजा, पारायणादि, श्रवणादि भक्तींच्या किरणांचा खरा आहार दिला तर ते बीज अंकुरत त्याचे रोपटे व वृक्ष होईल.

**तेव्हा या भक्ती मणीवर सतत उडणारी विषयांची, विकारांची धूळ पुसत तो नामजपादिंनी उजळत ठेवणे हे जीवाचे कर्तव्य आहे. या रामरत्नाला असे नवविधा भक्ती व गुरुसेवेच्या पैलूंनी कायम वलयांकित करुन प्रकाशत ठेवणे ही जीवाची खरी आराधना (साधना) होय.**

हे रत्न वेदपुराणरुपी पर्वतात लपलेले असते. एखादा मर्मी रत्नपारखी संत-सज्जन सद्‌गुरु आपल्या ज्ञान वैराग्याच्या सूक्ष्म दृष्टीने त्या पर्वतातून शोधून काढतो अन् सद्‌बुध्दिच्या पहारींने खणून त्यातून नेमके साररुप रामकथा वा रामनामरुपाने ते रत्न शिष्याच्या हाती ठेवतो. सत्संग व भक्तीच्या योगे शिष्याने ते रत्न नेहमी आत्मानुभवाच्या सुख व प्रकाशात तेजस्वी राहील हे पाहीले पाहीजे. **यासाठी सदैव प्रेमाने व नेमाने साधना करीत राहीले पाहिजे.**

ब्रह्मरसाच्या अथांग सागराचे एखादा सुजाण संत ज्ञानाच्या मंदर पर्वताने त्याचे मंथन करतो. त्या सागर मंथनातून मग रामकथारुपी (राम-नाम-गुण-यश-लीला) भक्तीचे अमृत निघते. या भक्तीचे अमृत दुर्बुध्दीच्या दानव वा राक्षसांच्या हाती जाऊ नये. ते फक्त सद्‌बुध्दीच्याच शिष्य-साधकांकडे रहावे यासाठी वैराग्याची ढाल, ज्ञानाची सतत पाजळलेली तलवार, हाती घेऊन वारंवार हल्ला करणाऱ्या लोभ मद इ. षड्‌विकारांचा वध करीत राहीले तरच भक्तीचा विजय होऊं शकतो.

याचाच अर्थ भगवंताला त्याच्या अगणित गुणांना, निर्गुण निराकार व व्यापकत्वास जाणून-श्रध्देने ते मानून ते प्रेमाने, आदराने, स्नेहाने भगवंतरुप सतत गात न्याहाळत, कुरवाळत राहणे म्हणजे भक्ती होय. भगवंताखेरीज इतर सर्वांचा जाणीवपूर्वक त्याग करणे म्हणजे वैराग्य व एक भगवंत खरा, बाकी सर्व खोटे हे मानणे-केवळ हृदयातच नव्हे तर प्रत्येक पेशीत रक्ताच्या प्रत्येक कणात हे **ज्ञान रुजून तसे वागणे** म्हणजे भक्ती होय. अनेक रुपाने तोच नटला आहे हे एकदा ठसले की जीव सर्वांवरच प्रेम करेल, मग कोणावरही रागावणार वा कुणाचाही व्देष कसा बरे करेल. असे हे एकमेव अव्दितीय अंतिम सत्य

= प्रेम = भगवंत असा हा राम-आत्माराम प्रत्येकाच्या हृदयात आहेच. फक्त अंतर्मुख होऊन त्याचे दर्शन घेणे हीच भक्ती होय.

सप्तप्रश्न –

त्यानंतर गरुडाने काकभुशुंडीना आणखी सात प्रश्न विचारले आहेत ते असे –

(१) सर्वात दुर्लभ शरीर कोणते? (२) सर्वात मोठे दु:ख कोणते? (३) सर्वात मोठे सुख कोणते? (४) संत कोणाला म्हणावे ? (५) असंत कसे ओळखावे? (६) सर्वात मोठे पुण्य कोणते? (७) सर्वात मोठे पाप कोणते?

(१) सर्वात दुर्लभ मानवी देह – कारण यात मन-बुध्दि आणि हास्य या अलौकिक देणग्यांनी हा देह नटलेला आहे. शिवाय मानव आपल्या कर्मांने याचदेहाव्दारे स्वर्ग, भक्ती, मोक्ष (नरक) प्राप्त करुं शकतो. ही सर्व कर्मयोनी असल्याने ही देवांनादेखील दुर्लभ अशी योनी आहे. आहार, निद्रा, भय, मैथुन यापुढे जाऊन अध्यात्म साधनेने नराचा नारायण होऊ शकतो.

(२) सर्वात मोठे दु:ख देणारी आहे देहबुध्दी वा देहासक्ती- यामुळेच मनुष्य 'मी व माझे' या वर्तुळात राहून या अल्पसंतुष्ट वृत्तीने दु:खाला आपणहून सामोरा जातो. मी भगवंताचाच अंश आहे व तसेच हे सारे विश्वही त्यानेच व्यापले आहे. या विशाल व उदार बुध्दीनेच केवळ हे दु:ख संपू शकते. आणि अगदी सामान्य पातळीवरुन पाहता दारिद्र्यासारखे महान पाप-दु:ख नाही कारण 'बुभुक्षित: किं न करोति पापं?'

(३) संतांचा सहवास, **सत्संगासारखे सुख जगात दुसरे काहीही नाही.** कारण हे संत विषयी जीवाला साधक, सात्विक, सदाचरणी बनवून भगवंताशी जोडून देतात. **भगवंत व जीव यांना जोडणारा दुवा म्हणजे संत वा सद्‌गुरू होय.**

(४) असे संत बाहेरुन ओळखणे फार फार कठीण आहे. जो नेहमी नामात रंगलेला, भक्त-भगवंत-गुण-लीला-गुण-यश यात गुंगलेला असतो, तो खरा संत होय. याची विशेष खूण म्हणजे ज्याच्या सानिध्यात जीवाला 'प्रसन्नता' वाटते व सात्विकतेत रमावे असे वाटते तो संत होय. असा संत परोपकारासाठी, परहितार्थ जीवन जगत असतो.

(५) तर असंत व दुष्ट आजच्या जगात ओळखणे जवळ-जवळ अशक्य आहे. कारण सध्या दांभिकतेने कथा-कीर्तन-प्रवचनादि करणाऱ्या बुवांचा सर्वत्र सुळसुळाट झाला आहे. दुसऱ्याला दु:खी करण्यात, दुसऱ्याचे अनहित, अपमान, हानी करणारा तो असंत अन् शिष्यांकडून धन लुबाडणारा असंत होय.

(६) सर्वात मोठे पुण्य म्हणजे अहिंसा होय. 'अहिंसा परमो धर्म:' । दुसऱ्याचे मनसुध्दा न दुखविणे ही अहिंसा होय. मग प्रत्यक्ष मारणे वगैरे तर फारच दूरची गोष्ट. परदोष न पाहणे, परनिंदा न करणे हे सगळे यात अभिप्रेत आहे.

(७) म्हणून सर्वात मोठे पाप- 'निंदा'. जर प्रत्येक अणूरेणूत तो परमेश्वरच आहे अशी दृढधारणा झाली तर निंदा करणार कोणाची? पण ही धारणा होऊन त्यानुसार वागणे-आचरण हे अत्यंत महत्वाचे आहे.

मानस रोग –

सर्व रोगांचे मूळ आहे मोह. मोह म्हणजे जे खरे आहे ते न समजता खोट्याला वा इतरांस खरे मानणे. वस्तुत: जीव म्हणजे देहातील चैतन्य (सच्चिदानंद स्वरुप) आत्मा हे आपले स्वरुप आहे. ते न मानता देहालाच मी म्हणणे हे विपरीत ज्ञान, हाच मोह होय. यातूनच काम म्हणजे इच्छा मला (देहाला) हे हवे, ते हवे वाटणे, याचीच पुढची पायरी लोभ. रोटी-कपडा-मकान या प्रारंभिक अत्यावश्यक गरजांपुरते द्रव्य हवे हे ठीक, पण लाख मिळाले, करोड हवे, अब्ज हवे- हा आहे लोभ. आणि हा हव्यास पूर्ण झाला नाही किंवा त्यात बाधा आली की येतो क्रोध. आपल्यापेक्षा जास्त द्रव्य असणाऱ्यांचा व्देष, मत्सर करणे हे क्रोधातूनच येते. अहंकार हा तर सर्वांच्या मुळाशी असतो, तोच ह्या मोहाला बळी पाडतो. आज सर्वत्र या अहंकार रूपी कॅन्सर मुळेच भारतातील कुटुंबव्यवस्था बिघडत चालली आहे. एकत्र होती ती विभक्त झाली पण त्याही पुढे जाऊन पती-पत्नींमध्ये देखील या इगोमुळे सध्या घटस्फोटाचे प्रमाण वाढत आहे.

अहंकारामुळे मोह हा सर्वांच्या मूलगामी असतो. तर क्रोध हा पित्तासारखा सतत हृदय जाळीत राहतो. आणि काम-इच्छा-वासना का बात जसा शरीरभर

सूक्ष्मरुपाने असतो तसा हा काम देहाला व्यापून राहतो. अहंकार हा कॅन्सर आहे. तो जन्माबरोबरच येतो पण second, third last stage कधी धारण करतो ते व्यक्ती सत्संगात नसेल तर त्याला कळतही नाहीं. अन् त्याच्या सर्वनाशास ते कारण ठरते. लोभ हा जलोदरासारखा कमी न होणारा रोग आहे. ईर्षेने ग्रासलेली व्यक्ती 'क्षयी' बनून दिवसेंदिवस दुर्बल होत जाते. मग या सर्व रोगांवर उपाय काय?

**रामकृपेने सद्‌गुरु सारखा वैद्य मिळाला तरच या सर्व रोगातून मुक्त होता येते. मात्र सद्‌गुरु-वैद्यांवर दृढविश्वास, निष्ठा, श्रध्दा हवी आणि ते सांगतील ते औषध, पथ्य व अनुपानासह नियमितपणे घ्यायला हवे.**

रघुपतिभक्ती ही संजीवनी मुळी हा यावर रामबाण उपाय आहे. पण त्यासाठी अत्यंत पवित्र अशी सात्विक डोळस श्रध्दा अत्यंत आवश्यक आहे. पथ्य म्हणजे विषय वा विषयी लोकांपासून दूर राहणे. जगण्यासाठी व जगण्याइतकेच भोग आहार-निद्रा घेणे आणि नियमाने हा उपचार करीत राहीले तर आपोआपच सद्‌बुध्दी वाढते, वैराग्य बळावते, विषयांची आशा दुर्बल-कमी होऊं लागते. आता पुरे, इतकी वर्षे खाल्ले, प्याले, ल्यायले- आता बस्स! असे वाटू लागणे हेच वैराग्य, अन् त्या पुढची पायरी इतकी वर्षे स्वत:साठी, कुटुंबासाठी जगलो आता दुसऱ्यांसाठी-इतरांसाठी –भगवंतासाठी जगावेसे वाटणे ही आहे. असा स्वत:त बदल होणे हीच आध्यात्मिक प्रगती वा उन्नती होय.

विश्वाचे देवघर असणाऱ्या भारतात मानवाचा जन्म मिळाला आहे. सुशिक्षित, सुसंस्कारित कुटूंब आहे. खाऊन पिऊन मध्यमवर्गीय का असेना पण सुखी जीवन आहे. ही सारी पूर्वपुण्याई, माता-पिता-गुरु यांचे आशीर्वादच, नाही कां? अशा या पापमूलक कलियुगात जरी जन्म झाला असला तरी सद्‌गुरु, सत्संग व सद्‌ग्रंथ इष्ट दैवत यावर विश्वास-निष्ठा असल्याने सद्‌ग्रंथांचे वारंवार वाचन-मनन करणे याकडे मन वळणे हीच रामकृपा होय. प्रभुगुरुकृपे शिवाय सहजी या सन्मार्गाने जाणारे फारच थोडे.

तेव्हा ज्याला प्रभू श्रीरामचंद्र प्राणप्रिय वाटतात तोच या श्रीरामचरितमानसरुपी मानस सरोवराच्या प्रवासास श्रध्देने, आनंदाने जायला निघतो. असा श्रध्दा-भक्तीयुक्त अंत:करणाने निघालेल्या प्रवाश्याला त्या मानसाचे तीर्थ, कैलास-दर्शन घडतेच घडते.

श्रीरामचरितातले भाव जेव्हा हृदयाला द्रवित करतात तेच या मानसाचे तीर्थ होय. अन् एखादा तरी क्षण लागणारी भावसमाधी, न-मन वा उन्मनी अवस्था हेच कैलास शिखर होय. अन् या सर्वांमुळे मिळणारा आत्मसंतोष स्वान्त:सुख हाच प्रत्यक्ष प्रभु श्रीरामाशी साधलेला संवाद, आत्मनिवेदन होय !

अशी प्रतिक्षणी नव्याने वाढणारी रामभक्ती-राम-अनुराग वा रामरती ही त्या लौकिक कैलास-मानस यात्रेपेक्षा श्रेष्ठ असे श्रीरामचरितमानस यात्रेने मिळते, हे नि:संशय ! हे स्वान्त: सुख प्रत्येक वाचकाला लाभावे ही श्रीरामचरणीं विनीत प्रार्थना !

*(१) सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः।*
*सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखमाप्नुयात्।*
*(२) असतो मा सद्गमय। तमसो मा ज्योतिर्गमयो*
*मृत्योरमा अमृतं गमय।*
*(३) ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते*
*पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।*

श्री सीतारामचंद्रार्पणमस्तु।
श्री सद्गुरुचरणारविंदार्पणमस्तु।

परिशिष्ट १

# श्री रामचरितमानसप्रेमी मंडळ

## ❊ *भाविक भक्तांना विनम्र आवाहन* ❊

''महाराष्ट्राचे तुलसीदास'' प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती यांनी गोस्वामी तुलसीदास यांच्या श्रीरामचरितमानसाचा समवृत समच्छंद अनुवाद केला आहे. भारतीय, विशेषत: महाराष्ट्रीयन धार्मिक, अध्यात्मिक प्रवृत्तीचे असूनही हे आपणांस माहित नाही? आपणास हे माहीत व्हावे व या प्रासादिक अद्भुत सिध्दमंत्रमय ग्रंथाची गोडी उत्पन्न व्हावी यासाठी आपण काय करू शकता? तर-

श्रीरामचरितमानस-मराठी ग्रंथाच्या प्रचार- प्रसारार्थ त्यांच्या शिष्या सौ. राजश्री उर्फ शामला भालचंद्र दिवाकर यांनी १११ सामूहिक पारायणे १०-१२ महिलांसह भारतभर हिंडून केली. त्या पारायण पूर्ती सोहळ्यात मिरज येथील सौ. रेखा नी. पटवर्धन यांच्या मनीही आसाच १११ सामूहिक पारायणाचा संकल्प रूजला. त्या संकल्पपूर्तीसाठी १०-११ महिलांची ७ दिवस चहा-नाश्ता-जेवण-राहणे इ. व्यवस्था आपण करू शकता.

व्यक्ती-संस्था-मंदिर -मठ-आश्रम कोणीही या सामूहिक पारायणांची प्रायोजकता स्वीकारावी ही विनम्र प्रार्थना.

रामरंगी मन रंगावे-रमावे असे वाटत असेल त्याने या उपक्रमास उत्स्फूर्तपणे सहकार्य करावे.

आपल्या विनम्र,

**श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळ**

**(रजि.ट्रस्ट) शाखा मिरज**

**(१) उपाध्यक्षा : सौ. रेखा नी. पटवर्धन**
एम.ए. संस्कृत (प्रज्ञाशिष्या रामदासी)
अक्षय रेस्टॉरंट समोर स्टेशन जवळ,
मिरज - 416 410
फोन : (0233) 2221083 / 09423036119

**(२) सचिव : सौ.राजश्री (श्यामला) भा. दिवाकर**
'मल्हार बंगला' राम मंदिराजवळ,
समर्थ नगर, मु. पो. उस्मानाबाद - 413 501
फोन : (02472) 224989, 09423530318

परिशिष्ट २

# * विनम्र निवेदन *

प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींचे स्मारक रूपाने परांडा येथे 'श्रीराम मंदिर' उभे आहे. आपणा सर्वांना आठवतच असेल की या मंदिरातील राम-मूर्तीची प्राणप्रतिष्ठा प्रख्यात रामकथाकार पू. मुरारीबापू यांचे शुभ हस्ते झाली असून, या मंदिरातच नंदिसह शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा पू. किशोरजी व्यास उर्फ पू. गोविंददेवगिरी स्वामींचे शुभ हस्ते झालेली आहे.

या मंदिराची मूळ संकल्पना प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींच्या अंतरंग शिष्या-सर्वांच्या लाडक्या पू. कमाताई (डॉ. कमल बा. वैद्य) यांची होती. त्यानुसार हे मंदिराचे स्वप्न प्रत्यक्षात साकारणारे याच स्वामींचे अंतरंग शिष्य पू. श्रीरामजी गिल्डा उर्फ पू. भाऊ हे होते. या मंदिर उभारणीसाठी पू. भाऊंनी आणि पू. कमाताईंनी आपल्या तपस्वी जीवनाची आहुती वाहीली आहे. या मंदिरासाठी पू. भाऊंनी भारतभरात आजवर व्यक्तिगत आणि सामूहिक असे सुमारे ५००-७०० "हनुमान यज्ञ" केले आहेत. अन् या हनुमान-यज्ञाद्वारेच श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळाचा पारमार्थिक व आर्थिक पाया भक्कम केला आहे.

या ट्रस्टने या मंदिरातच सुमारे २००० चौ. फू. चा भला मोठा हॉल व स्वयंपाकघर बांधून नुकतेच पूर्ण केले आहे.

आज उभे असलेले हे श्रीराम मंदिर, हॉल इ. सारे वैभव आपणा सारख्या आजवरच्या उदार दात्यांच्या देणगीवरच केवळ उभे आहे. हे या मंदिराचे वैभव असेच कायम वाढावे हे सर्वस्वी आपण नित्य करीत असलेल्या आर्थिक मदतीवरच अवलंबून आहे.

आता लवकरच भक्त निवासाचे काम सुरू होत आहे. आजवर आपण "प. पू. स्वामी शिष्य तपस्वी कै. श्री. श्रीरामजी गिल्डा" यांचे वर विश्वासून जी ट्रस्टला मदत केलीत तशीच कायम करीत रहा.

नुकतेच श्रीराम चरणी विलीन झालेले हे स्वामी शिष्य कै. श्रीरामजी गिल्डा यांचे स्वप्न "भक्त निवास" प्रत्यक्षात साकारणे ही त्यांना खऱ्या अर्थाने श्रद्धांजलि वाहणे आहे.

तरी या 'भक्त निवासांसाठी आपणाकडून भरगोस देणग्यांची अपेक्षा आहे देणगीचे चेक "श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ" या नांवाने खालील नांव पत्यावर पाठवावेत.

(१) सौ. राजश्री (उर्फ) शामल भा. दिवाकर

(२) सौ. रेखा नी. पटवर्धन

## संपर्कासाठी नांव व पत्ता

(१) सचिव : सौ.राजश्री (श्यामला) भा. दिवाकर
'मल्हार बंगला' समर्थ नगर, राम मंदिराजवळ
मु. पो. उस्मानाबाद - 413 501
फोन : (02472) 224989, 9423530318

(२) उपाध्यक्षा : सौ. रेखा नी. पटवर्धन
अक्षय रेस्टॉरंट समोर स्टेशन जवळ,
मिरज - 416 410
फोन : (0233) 2221083 / 9423036119

## आपण आपले योगदान खालील प्रकारे देऊं शकता

(१) भक्त निवासासाठी एका खोलीसाठी रू. १ लाख समर्पण,
(२) अन्नदानासाठी देणगी,
(३) विविध उत्सवांसाठी देणगी,
(४) शाश्वत पूजे प्रीत्यर्थ आपले विशिष्ठ दिवशी अभिषेक करणेसाठी रू. १०००/-.
(५) रू. २५०० देऊन मंडळाचे आजीवन सदस्यत्व स्वीकारणे.
(६) श्रीरामचरितमानस-मराठीचे सामूहिक पारायणाचे आयोजकत्व स्वीकारणे.
(७) "हनुमान-यज्ञ" आयोजकत्व स्वीकारणे.
(८) मंदिरात सेवाभावाने प्रवचन-कीर्तन-भजन-सेवा करणे.
(९) मंदिराचे हॉल मध्ये अध्यात्मिक इ. शिबीराचे आयोजन करणे.
(१०) दररोज एक ठराविक रक्कम स्वामी सेवेसाठी बाजूस काढून ती रक्कम दरवर्षी मंडळास समर्पण करणे.
(११) मंदिरासाठी वा स्वामी कार्या प्रीत्यर्थ तन-मन-धन पूर्वक स्वयंसेवकत्व स्वीकारणे.



परिशिष्ठ ३

## ॥ श्रीहनुमानयज्ञ॥

**अतुलितबलधामं स्वर्णशैलाभदेहं दनुजवनकृशानुं ज्ञानिनामग्रण्यम्।**
**सकलगुणनिधानं वानराणामधीशं रघुपतिप्रियभक्तं वातजातं नमामि॥**

(संत शिरोमणि तुलसीदासजी कृत)

(१) श्रीहनुमानचालिसा पाठ व यज्ञ हिन्दी अथवा मराठी में कर सकते है।

(२) श्रीहनुमानचालिसा का मराठी पद्यानुवाद पू. प्रज्ञानानन्द सरस्वतीजीने किया है - जो प्रासादिक है।

(३) श्रीहनुमानचालिसा का पाठ करनेवाले तथा आहुती देनेवाले (यजमान व अन्य) साधारण तया व्यसनमुक्त अपेक्षित है।

(४) पाठ व हवन के पूर्व अपने माता पिता तथा वडीलों को नमस्कार करें।

(५) अपने कंधेपर एक उपवस्त्र (पंचा, रूमाल या शाल) धारण करें।

(६) पाठ करते समय दुर्भासन, श्वेतासन, अथवा धूलवस्त्र बिछाकर बैठें।

(७) स्नान करते पर शुभ वस्त्र धारणकर मस्तकपर गंध अथवा भस्म धारण करें।




(८) हवन कुंड : १८″ स्वेअर इंच चौकोन (अथवा ९″ इंच की दो इंटे) अंदर अंदर होना चाहिये। इस तरह प्रथम चार इंटे एक पर एक - उसके पीछे दो इंटे एक पर एक और तिसरी लाईन एक इंट की रहेगी। इंट अंदाजा ९० लगती हैं।

| ॥ हनुमानचालीसा यज्ञ ॥ | | |
|---|---|---|
| **पूजा सामान** | | |
| हल्दी | दही+मध+घी+शक्कर | लाल कपडा ७० से.मी. |
| कुंकू | गूळ खोबरे | सुपारिया २५ |
| बुका | खुले पुष्पहार ३/४ हार | कळस तांबेका लोटा |
| मोळी (रंगीत धागा) | फळ ऋतु अनुसार | चावल १/२ कि. |
| जनेऊ (यज्ञोपवीत) | दुर्वा, बेल, तुलसी | पूजा का लोटा |
| घी (=जानवे) | दक्षिणा (नाणे) | हाथ पूछने रुमाल |
| रांगोळी | हळदी खों (हळकुंड) | ३ नारळ |
| खाने के पान (२५) | खारीक | २५ ग्रॅ. पायस (खीर) |
| आम के पान | बदाम | हवन के लिए |
| तोरण के लिए | समई | गोमुत्र |
| अक्षता | निरंजन | गोबर |
| चंदन घसा हुआ | (घी की आरती) | काली मिट्टी |
| उदबत्ती घर | काडी पेटी | |
| दर्भ | पंचपात्र (तांबेका/चांदीका) | |
| गंगाजल | आचमन | |
| अत्तर | हनुमान फोटो | |
| अष्टगंध | सद्गुरु फोटो | |
| पंचामृत | सफेद कपडा ७० से. मी. | |

(९) हवन के लिए सर्वोत्तम स्थान श्रीहनुमान मंदिर – नदी अथवा समुद्र किनारा वनश्री (खेत) घर में, दुकान में अथवा फॅक्टरी में – कही भी कर सकते हैं।

(१०) बांबू की फुंकणी (१) लकडी का चमचा (पळी) घी के लिए। हवन सामुग्री रखने थालीयाँ।

(११) बैठने के लिए आसन – सतरंजी – ताडपत्री आदि।

(१२) पूजा हवन के बाद नैवेद्य – तीर्थ प्रसाद बांटने के लिए।

(१३) यह कार्यक्रम साधारणतया ४ घंटे का समझें। उदाहरण ८ से १२ तक।

(१४) एक लकडी का चमचा घी की आहुती के लिए तथा बांबू की एक फुंकनी।

(१५) तिल आदि हवन सामुग्री छान लें। उसमें जीव जंतु न रहे।

(१६) हवन सामुग्री रखने बरतन तथा पूजा की थाली स्वतंत्र तयार रखे।

परिशिष्ठ ४

| ॥ हनुमानचालीसा यज्ञ ॥ | |
|---|---|
| **हवन सामुग्री** | **समिधा** |
| दर्भ<br>१ कि. गायका घी<br>१ कि. काले तिल<br>१ कि. सफेद तिल<br>१॥ कि. जौ<br>१/२ किलो शक्कर<br>१०० ग्रॅम गुगळ<br>२५ घी की बत्तीयाँ<br>कर्पूर डबा १<br>१५ कि. जलाने की लकडी, नारळ केसर अथवा लकडी का बारीक भुसा | पळस, पिंपल बेल,<br>आंबा, उंबर, रुई,<br>चंदन, तुलसी,<br>समदड, खैर<br>नोट : सभी होना आवश्यक नही<br>(छ : या आठ इंचके काडीयों के गड्डे बांधे) |

नोट : यह हवनसामुग्री और समिधा १५ आदमीयों के हिसाब से है। आदमी बढे तो हवन सामुग्री बढानी होगी।



परिशिष्ठ ५

॥श्री सद्गुरवे नमः॥

॥श्रीराम समर्थ॥

# लेखिकेचा परिचय

**सौ. रेखा नीळकंठ पटवर्धन** एम.ए. (संस्कृत)

- इ. स. १९९४ ची गुरुपौर्णिमा ब्रह्मीभूत परमहंस परिव्राजकाचार्य प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी यांचा अनुग्रह, त्यांच्या अंतरंग शिष्या डॉ. कमल वैद्य (पू.कमाताई) यांचे माध्यमातून. तेव्हापासून 'प्रज्ञाशिष्या रामदासी' हे नामाभिधान घेतले. १९९४ पासून आजवर २०० लेख (हिंदी व मराठीतून अध्यात्मिक मासिकातून) व २०० प्रवचनेही संपन्न (विषेशतः प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामीकृत मराठी भावानुवादित 'श्रीरामचरितमानस' व त्यांच्याच त्यावरील ज्ञानकोश वा विश्वकोश सदृश 'मानस गूढार्थ चंद्रिका' या टिकेचे आधारे) इतरही संत वाङ्मय व सद्ग्रंथांवर लेखन व पूर्वसूचनेनुसार प्रवचने. सांस्कृतिक व प्रवासपर लेखनाचीही आवड आहे.
- सध्या प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतींच्या अध्यात्मिक कार्य प्रकाशनार्थ स्थापन केलेल्या 'श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ' या रजि. ट्रस्टची उपाध्यक्षा म्हणून कार्यरत आहे.
- १९८८ मध्ये पायी गंगोत्री - यमुनोत्री - केदार - नारायणसह गोमुख यात्रा.
- १९९६ मध्ये आदि - कैलास - ओम पर्वत (छोटा कैलास यात्रा).
- २००१ च्या प. पू. स्वामींचे अंतरंग शिष्य पू. श्रीरामजी गिल्डा मार्गदर्शित १०८ सामूहिक हनुमान यज्ञांचे प्रमुख यजमानपद (मिरज)
- राष्ट्रसंत पू. मुरारीबापूंचे हस्ते' प्राणप्रतिष्ठापना सोहळ्यात प्रमुख यजमानपद व सूत्रसंचालन. २८/३/२००३ रोजी. (परांडा)
- २००४ याच राममंदिरात पू. आचार्य किशोरजी व्यास (पू. गोविंददेवगिरी स्वामी) यांचे हस्ते शिवप्रतिष्ठापना सोहळ्यात प्रमुख यजमानपद व सूत्रसंचालन. (परांडा)

- २००५ साली अमरनाथ यात्रा.
- २००६ साली कैलास - मानसरोवर यात्रा.
- २००७ पासून प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती भावानुवादित 'मराठी श्रीराम चरितमानस सामूहिक पारायणात सहभाग' (प.पू. स्वामींच्या अंतरंग शिष्या सौ. राजश्री तथा शामला दिवाकर संकल्पित)
- २००७ सौ. शामला दिवाकरांच्या १०८ मराठी श्रीरामचरित मानस सामूहिक पारायण संकल्पपूर्ती सोहळ्याचे सूत्र-संचालन. (धाराशिव)
- २००८ पासून १११ श्रीरामचरितमानस मराठी सामूहिक पारायण संकल्प प्रारंभ. (पैकी ७५ पारायणे संपन्न २०११ अखेर) (भारतभर प्रवास करीत)
- फेब्रू २०१० : नर्मदा परिक्रमा. (बसने)
- जून २०१० : चारधाम यात्रा.
- प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी लिखित मराठी मानस गूढार्थ चंद्रिकेच्या १५ खंडांच्या प्रस्तावनांचे लेखन संपन्न.
- लेखन प्रवचन व पारायणाव्दारे गुरूसेवेतून प. पू. प्रज्ञानानंद सरस्वतींच्या अध्यात्मिक समग्र साहित्याचा प्रचार प्रसार करण्याचे जीवनध्येय. या निमित्ते पू. तेजोमयानंदस्वामी (विश्वव्यापी संस्था चिन्मय मिशन), पू. किशोरजी व्यास, पू. शंकराचार्य - करवीरपीठ, पू. मुरारीबापू यांसारख्या संत-महंतांचे विशेष कृपाशीर्वाद प्राप्त.
- 'धर्मयज्ञ' या मासिकातून लेखाद्वारे : 'श्री राम चरितमानस' वरील लेख आणि प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती कृत 'वेदांतसार अभंग रामायण' व त्यावरील लेख अशी दोन पुस्तके लवकरच प्रसिध्द होतील. प. पू. स्वामी प्रज्ञानानंद कायम स्वरूपी कॅलेंडरची संकल्पना २००७-८ मध्ये साकारली.

*****